# अहिराणी

लोकसाहित्य दर्शन

खंड २रा



अहिराणी बोलीच्या इतिहासासह

# नाती-गोती

लेखक : कृष्णा पाटील



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# अहिराणी लोक साहित्य दर्शन
# खंड दुसरा

## 'नाती-गोती'

(अहिराणी बोलीच्या इतिहासासह)

लेखक
कृष्णा पाटील

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई–४०० ०३२

**प्रथमावृत्ती**

"भाऊबीज"
२० ऑक्टोबर १९९०
यम-द्वितिया कार्तिक शुद्ध २
सौर १९१२.

मुल्य रु. ८५
मुखपृष्ठ आवरण : शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.
आकार : मेट्रिक ए/५, ६" × ८½"


३८१२, कल्पना-निवास,
तांबेपुरा, अमळनेर-४२५ ४०१.
जिल्हा जळगाव (महाराष्ट्र).

**प्रकाशक—**
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
नवीन प्रशासन भवन, पहिला मजला, मुंबई-४०० ०३२.
प्रकाशन
मंजुरी क्रमांक मंईप्र १०८७/११४४, दिनांक ६ एप्रिल १९८७.

**मुद्रक—**
व्यवस्थापक,
शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार,
सिव्हिल लाईन्स, नागपूर-४४० ००१.

# निवेदन

"प्रत्येक भाषेच्या अंतर्गत अनेक बोली असतात. या बोलींपैकी काही बोलीच भाषेचे रूप घेतात. त्यामुळेच तर पाच कोसावर भाषा बदलते असे म्हटले जाते. महाराष्ट्रातही नागपूरी, वऱ्हाडी, कोल्हापूरी, मराठवाडी, कोकणी अशा अनेक बोली आहेत. या बोलींचेही उप-प्रकार आहेत. खानदेशात बोलली जाणारी अहिराणी बोली पण एक महत्त्वाची बोली आहे. या बोलीत अनेक गुजराती आणि मराठी शब्दांची सरमिसळ झालेली आहे. नादमधूर अशी ही अहिराणी बोली महाराष्ट्राच्या इतर भागातील सामान्य सुशिक्षित माणसाला कळण्याला कठीण. या बोलीचा असा एक प्रत्यय खानदेशात राहत असताना मला आला होता. अहिराणी बोलीत फार मोठे साहित्य सामावले आहे. अहिराणीतील गीत आणि ओव्या मानवी भावनांना सहजपणे आकार देतात. त्यात झालेले सामाजिक चित्रण तेथल्या समाजांचे मूर्तिमंत चित्रच उभे करू शकते. खानदेशातील सारे वैशिष्टच—सण, उत्सवापासून तर कौटुंबिक वात्सल्यापर्यंत—अहिराणी बोलीत प्रगट होतात. हे पुस्तक भाषा शास्त्र व लोक साहित्याच्या अभ्यासाला निश्चितच उपयुक्त ठरावे.

श्री. कृष्णा पाटील हे एक एस. टी. कामगार. पण अहिराणी लोक साहित्याचे मोठे मनोज्ञ दर्शन त्यांनी या पुस्तकाच्या रुपाने घडविले आहे."

"त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन."

सुरेन्द्र बारलिंगे

(डॉ. सुरेन्द्र बार्लिंगे)
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि
संस्कृती मंडळ, मुंबई-३२.

४२, 'यशोधन'
मुंबई :
८ एप्रिल १९८८.

# अहिराणी लोक साहित्य दर्शन : खंड २ रा
## ‘नाती–गोती’

(अहिराणी बोली व परिसराच्या इतिहासासह)

या संग्रहातील पूर्व प्रसिद्धी नोंद—

साप्ताहिक बातमीदार, दैनिक जनशक्ती–दिवाळी अंक, दैनिक लोकमत, दैनिक गांवकरी–जळगांव.

या सुहृदांचे कृतज्ञतापूर्वक आभार—

- डॉ. सुरेंद्रजी बार्रालिंगे, सु. द्वा. देशमुख, पं. रा. पाटील, डॉ. वा. ना. कुबेर डॉ. सरोजिनी बाबर, ना. धों. महानोर, डॉ. आनंद यादव, डॉ. गंगाधर मोरजे डॉ. शंकरराव खरात, डॉ. गंगाधर पाणतावणे, तर्कतीर्थ लक्ष्मण शास्त्री जोशी;
- प्रा. पुरूषोत्तम पाटील, प्रा. गजमल माळी, प्रा. सदाशिवराव माळी, प्रा. राजा महाजन, प्रा. शा. न. पाटील, डॉ. प्रभाकर चौधरी, प्रा. दि. के. देशपांडे, प्रा. ब. लु. सोनार, प्रा. भा. ज. कविमंडन, . नारायण शिरसाळे, उत्तम कोळगांवकर, डॉ. विठ्ठल वाघ, डॉ. प्रभाकर मांडे, डॉ. तारा भवाळकर, गणेश हाके, निळकंठ महाजन, द. शं. बडगुजर, प्रा. रमेश लाहोटी.
- ब्रिजलाल भाऊ पाटील, शरद नेहते, गुलाबराव पाटील, श्रीकृष्ण जळूकर, पी. ई. तात्या पाटील, वा. रा. सोनार, धो. वे. जोगी, दाजिबा पाटील, स. सो. सुतार, ज्ञानेश मोरे, दे. पु. कुळकर्णी, श्री. प. नांदेडकर, एम. ओ. शेलकर, नामदेव पाटील;
- प्रा. उषा सावंत, सौ. कल्पना बोराडे, सौ. सुशिला पगारीया, श्रीमती इंदिरा पाटील, सौ. कलावती सोनवणे, सौ. कल्पना पाटील, सौ. नलिनी भदाणे, सौ. पद्मा जावळे, सौ. सुमन पाटील, सौ. कुसुम पाटील, सौ. शशिकला सोनवणे, सौ. विमल पाटील

असंख्य अज्ञात अहिराणी बोली, संस्कृती व जोपासणाऱ्या अडाणी खेडूत माया-बहिणी !

व

मौलिक सूचना केल्याबद्दल अध्यक्ष डॉ. यशवंत मनोहर, आकर्षक मुखपृष्ठ व ब्लॉक्स केल्याबद्दल संचालक, शासन मुद्रण व लेखन सामग्री, सुबक छपाई व आकर्षक मांडणी केल्याबद्दल व्यवस्थापक व कर्मचारीवृंद, शासकीय मुद्रणालय यांचा ऋणी आहे. कोरीव अक्षरांत नकला करणारी कु. मनिषा पाटील, मुद्रीते तपासतांना मोलाची मदत करणारे राजेंद्र पाटील, संजय पाटील यांचे कौतुक करावे तेवढे थोडे !

वाचकांच्या स्नेह, सौहार्दाचे ऋण वाढत राहो !!

# अनुक्रमणिका

# अर्पणपत्रिका

....आयुष्याच्या सुरवातीपासून भगिनी प्रेमाचा ज्यांनी माझ्यावर वर्षाव सुरू ठेवला त्या माझ्या सर्व धाकट्या बहिणी--

**चि. सौ. गीता, चि. सौ. मथुरा, चि. सौ. मंजु,**
**चि. सौ. कमा, चि. सौ. ईमा**

व

बंधू प्रेमाची फुले उधळणाऱ्या--

**चि. भास्कर, चि. अशोक**

**या गोतावळ्यास....**

## —ऋणनिर्देश—

आतील चित्रे—

संपादक, "गौराई"–स्मरणिका, ५८ वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन, जळगांव–(जानेवारी १९८४).

संपादक, "एस. टी. समाचार" दिवाळी अंक–(मुंबई)–१९८७

संपादक, "बाशिंग" दिवाळी अंक – (धुळे)–१९८८

संपादक, "अनघा" दिवाळी अंक – (ठाणे)–१९८८

अध्यक्ष, राजवाडे संशोधन मंडळ, धुळे (पश्चिम–खान्देश)

—यांच्या सौजन्याने !

व

आतील नकाशे—

अध्यक्ष / संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, पुणे-४११००१

—यांच्या सौजन्याने !!

## अहिराणी लोक साहित्य दर्शन : खंड २ रा, 'नाती-गोती'

### चित्र नामावली

'' यशोदायिनी, कुलदेवता,
त्रिवार नमितो तुला ।
' यशश्री ' येऊ दे मला,
' भवानीमाय, ' नवस करतो तुला '' ।।

कृष्णा पाटील



खान्देशचे तीर्थक्षेत्र–एकविरादेवी–धुळे (पश्चिमखान्देश).

' सत्वर पाव गे याला,
' भवानी आई ' रोडगा वाहीन तुला. '

–संत एकनाथ.



भरगड्यावर दळणारी अहिराणी स्त्री.

# अहिराणीशी जुळले नाते !

अहिराणी लोकसाहित्य दर्शन, खंड-भाग दुसरा (नाती-गोती) साहित्यप्रेमी रसिकांच्या हाती देताना मला अत्यानंद होत आहे. अहिराणी संस्कृतीकडे, खान्देशी बोली परंपरेकडे रसिकांचे लक्ष वेधावे हा एक उद्देश हे पुस्तक लिहिण्यामागे आहे. या पुस्तकाद्वारे अहिराणी भाषिक प्रदेशातील संपन्न, समृद्ध, प्राचीन परंपरेचे दर्शन वाचकांना घडावे असा अल्पसा प्रयत्न मी केलेला आहे. लेखक-वाचक-समीक्षक यांना जिव्हाळा असलेली 'नाती-गोती' अभ्यासपूर्ण व विचारपूर्वक यात समाविष्ट केलेली आहेत. या संदर्भ ग्रंथात अहिराणी बोलीतील ओव्या परिश्रमपूर्वकरीतीने संग्रहीत करुन त्यावरील अभ्यासपूण भाष्य करण्याचा अत्यल्प प्रयत्न करण्यात आलेला आहे.

जगातील वांशिक, भाषिक, धार्मिक, आर्थिक, राजकीय आणि सांस्कृतिक गटांमुळे अनेक संस्कृती जन्माला आल्या आहेत. विशिष्ट संस्कृतीच्या लोकांचे विशिष्ट गट बनलेले आहेत. त्यातून कुटुंब संस्था जन्माला आली. परंतु आपआपसातील भेदभावामुळे मानवी ऐक्याला तडा गेला. कुटुंब संस्थेतील 'नाती-गोती' या संज्ञेमुळे विविध नात्यांद्वारा असे संघर्ष मिटवून, परस्परांना मदत करून त्यातून शांतता आणि सुसंवाद साधण्याचा 'नाते-गोते' ही संज्ञा प्रयत्न करीत असते. 'नाती-गोती' मुळे माणसामाणसात तसेच मानव व निसर्ग यांच्यातही सुसंवाद प्रस्थापित होऊ शकतो. माणूस निसर्ग निर्मित असला तरी 'नाती-गोती' स्वनिर्मित आहेत. नात्या-गोत्यापासून दूर गेल्यास जीवनात दुःख निर्माण होते, विषमता येते. एकनिष्ठ राहील्यास माणसाच्या जीवनात शुद्धता, पवित्रता, परिपूर्णता येते. 'नाते-गोते' यांचा पाश तोडल्यास माणूस जीवनात भरकटतो. त्याच्या जीवनात अपूर्णता, भ्रष्टता, कृत्रिमता जास्त येते व तो मूळ स्वरुपापासून दूर जावू लागतो. सामाजिक चालीरीतीनुसार जरी अंतर पडत असले तरी रक्ताचे नाते मात्र तुटता तुटत नाही. त्यात मायेचा, प्रेमाचा ओलावा सतत झिरपत राहतो—हाच ओलावा अहिराणी लोकगीतातील नात्या-गोत्याच्या व्यक्तींच्या हृदयात डोकावल्यास आपणास स्पष्ट नजरेस येतो.

शेकडो लेखकांनी मराठी भाषेत साहित्य निर्मिती केली आहे. वाचकांचा एक विशिष्ट वर्ग त्या साहित्यास आवडीने वाचत असतो. अहिराणी साहित्य सर्व थरात रुजले पाहिजे, रुचले पाहिजे. या एका विशिष्ट ध्येयाने प्रेरीत होवून मी "अहिराणी लोक साहित्य दर्शन" –भाग १ (सण आणि उत्सव) हे पुस्तक सन १९८३ मध्ये लिहिले असून ते मेहता पब्लिसिंग हाऊस, सदाशिव पेठ, पुणे–३०, यांनी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाच्या अनुदानाने प्रकाशित केले आहे. अहिराणी बोलीभाषेचे वातावरण संपूर्ण महाराष्ट्रभर नसूनही

अहिराणी बोली प्रदेशाबाहेर "अहिराणी लोकसाहित्य दर्शन", भाग दुसरा 'नाती-गोती' वाचकांना जवळच्या नात्याचे वाटणार नाही, असे नाही आणि आज ही वस्तुस्थिती आहे ती मी नाकारण्यात हूंशील नाही.

नोकरी व इतर रिकामे सामाजिक उद्योगधंदे सांभाळून वाङ्मय निर्मिती करणाऱ्या महाराष्ट्रातील इतर जुन्या लेखकांच्या परंपरेतील मी एक पाईक आहे. माझ्यासारखे डिग्री, डिप्लोमा नसलेले अव्यावसायिक लेखक, संशोधक, अभ्यासक कनिष्ठ प्रतीचे मानणे ही आजकाल उच्चभ्रू लेखकांमध्ये रूढ झालेली समजूत आहे असे माझे मानणे आहे. अहिराणी बोलीभाषेवरील सर्वप्रथम ललित वैचारिक संदर्भ ग्रंथ लिहिण्याचे माझे औचित्य रसिकांना व मराठी वाचकांना रुचले. त्याच्या पुढचे एक धाडसी पाऊल मी टाकीत आहे.

अहिराणी बोलीभाषेवरील "अहिराणी लोकसाहित्य दर्शन", खंड-भाग दुसरा—'नाती-गोती' हे पुस्तक वाचकांच्या हाती सोपवताना, माझी भूमिका वाचकांसमोर मांडताना त्यांना ती रुचावी इतकी ती रुचकर आहे. वाचक आणि लेखक यांचे जे नाते आहे ते सुदृढ व्हावे. अहिराणी माझी जन्मबोली, मायबोली. मायबोलीत लिहणं हे काही वेळा प्रतिष्ठित-पणाचं मानलं जात नसलं तरी अहिराणी ओव्या गोळा करणे, त्या मिळविणे, त्यावर संशोधन करून, भाष्य करून ललित वैचारिक लेख लिहिणे हे मी आजवर माझ्या निहीत कर्तव्यांपैकी एक समजत आलो आहे व यापुढेही समजत राहीन, काळाच्या ओघात !

दुर्लभ, दुर्मिळ, कालबाह्य झालेल्या अशा असंख्य अहिराणी ओव्या, अलिखित, मौखिक, अपौरुषेय अहिराणी ओव्या गोळा करून त्यावर लिखाण करताना मला नाना प्रकारच्या अडीअडचणींना तोंड द्यावे लागले आहे. त्यापैकी काही व्यावहारिक होत्या, काही आर्थिक होत्या. त्याबाबतचा सविस्तर खुलासा मी माझ्या 'अहिराणी लोकसाहित्य दर्शन खंड १, 'सण आणि उत्सव' या पुस्तकाच्या पृष्ठ १ ते १८ मध्ये मनोरंजक, रोचक पद्धतीने केलेला आहे (प्रकरण 'सण व उत्सव' साजरे करण्यापूर्वी). म्हणून वस्तुस्थितीविषयक वाङ्मय निर्माण करताना मला माझ्या कलाने जावे लागले आहे. त्यात काही उणिवा, त्रुटचा जरूर राहिल्या आहेत, हे मी मान्य करतो. सर्वसाधारण अहिराणी भाषेतील वाचक-वर्ग विद्वान नाही (?) त्यांच्या करमणुकीसाठी काही खाद्य हवं आहे हे लक्षात घेवून माय-बोलीची सेवा हा मुख्य उद्देश डोळ्यासमोर ठेवून तिचे ऋण फेडण्याच्या उदात्त हेतूने प्रेरीत होवून अहिराणीतील लिखित साहित्याची चणचण भासणारी उणीव लक्षात घेऊन मी हे पुस्तक लिहिण्याचा अल्पसा प्रयत्न करीत आहे. सेतुबंधनातील खारीचा तो वाटा ठरावा. विद्याभ्यास, जड ग्रंथ, विशिष्ट वृत्ती आणि दर्जा असलेल्या वाचकांसाठी असतात, असे माझे मत आहे. साक्षर वाचकवर्ग करमणुकीसाठी विरंगुळा म्हणून पुस्तके वाचतात. त्यांना त्यांच्याच बोलीतून त्यांची रूढी, परंपरा, संस्कृती याचा इतिहास, त्याच्याशी असलेले अतूट 'नाते-गोते' लक्षात घेऊन देण्याचा प्रयत्न "अहिराणी लोकसाहित्य दर्शन"—भाग दुसरा, 'नाती-गोती' या ललित वैचारिक संदर्भ ग्रंथात मी केलेला आहे.

मी बोलूनचालून महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या जळगांव विभागातील विभागीय कार्यालयात खरडेशाही करणारा कनिष्ठ सहाय्यक (बोलूनचालून 'कारकून' शेवटी !) साहित्य सेवेत आपणास सहाय्य करून आपल्याशी 'नाते' जुळवू पाहत आहे. मला लोकप्रियतेची कांस नाही वा अथवा केवळ त्याचसाठी मी अहिराणी बोलीभाषेतील 'धनसंपदा' गोळा करण्याचे काम हाती घेतलेले नाही किंवा केवळ त्याच वेडया ध्येयानं प्रेरीत होऊन, लेखणी हाती घेऊन वाङ्मय निर्मिती केलेली नाही. केवळ लोकप्रियता व लाखो रुपये यासाठी लालचावलेल्या लेखकांपैकी मी मुळीच नाही, हे पुन्हा आवर्जून उल्लेखावेसे वाटते, मायबोलीचा नम्र सेवक या नात्यानेच.

स्वभाषेच्या उद्धारासाठी स्वतःला वाहून घेणाऱ्या कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचा आदर्श डोळ्यासमोर ठेवून, स्वतःच्या बोलीभाषेच्या अभ्यासाची कल्पना माझ्या मनी-मानसी घर करून बसली. खान्देशातील काळ्या मातीइतकीच कसदार व प्रत्येक अहिराणी बोली बोलणाऱ्या व्यक्तीस ज्याबद्दल सार्थ अभिमान वाटावा अशी खान्देशातील लोकगीते, लोककथा जमवून प्रसिद्ध करण्याचे व्रत घेतलेले समकालीन संपादक व रसिक साहित्यिकांची लोकगीते जमवून ती "स्त्री जीवन" म्हणून प्रसिद्ध करणाऱ्या कै. साने गुरुजी यांची प्रेरणा घेवून "अहिराणीची कुळकथा" लिहिणाऱ्या डॉ. श्री. दा. गो. बोरसे यांच्या-प्रमाणे मी अहिराणी भाषेचा पद्धतशीर, शास्त्रशुद्ध अभ्यास सुरू केला. 'अहिराणी भाषा आणि संस्कृती' लिहिणाऱ्या कै. भा. रं. कुळकर्णी सारखे संशोधनाचे कार्य खान्देशात चिकाटीने सुरू ठेवले व निष्ठेने या कार्याला वाहून घेतले.

"तापी थडीवरील अलिखित अहिराणी साहित्याकडे अहिराणी साहित्य–सेवकांनी लक्ष पुरवावे. अहिराणी लोकसाहित्य क्षेत्र खऱ्या अर्थाने दुर्लक्षित आहे. त्यासाठी, विशेषतः खान्देशातील संशोधकांनी व अहिराणी भाषाभिमान्यांनी लक्ष पुरवावे". या श्रीमती आनंदीबाई शिर्के यांच्या लक्षवेधी सूचना व आवाहनास अनुसरून "दुर्मिळ होत चाललेल्या अहिराणी ओव्या, काळाच्या भक्ष्यस्थानी पडण्यापूर्वी त्याचे संकलन, संशोधन, संरक्षण, संवर्धन करण्याची योजना आखली गेली पाहिजे व ती मार्गी लागली पाहिजे. खान्देशातील माझ्या साहित्यिक बांधवांनी उपेक्षावृत्ती टाकून, अहिराणी वाङ्मय धनाचे काजी लावून संशोधन, लेखन, मुद्रणाचे कार्य हाती घेतले पाहिजे". या उद्देशपूर्तीसाठीच पायातील हा दुसरा दगड !

अहिराणी लोकसाहित्याकडे विशिष्ट नजरेने पहावयास वाचकाने शिकले पाहिजे. असा मी या 'अहिराणी लोकसाहित्य दर्शन', भाग दुसरा 'नाती-गोती' या पुस्तकाचे निमित्ताने या प्रसंगी अपेक्षा करतो. आजवरच्या पुस्तकातील अहिराणी ओव्याव्यतिरिक्त विपूल ओव्या व इतर लोकसाहित्य अहिराणी बोलीत दडले आहे, ही अतिशयोक्ती ठरू नये ! या विपूल साहित्याच्या कामी माझ्यासारख्या अन्य होतकरू लेखकाने चिकाटीने पुढे येऊन

धडाडीने मराठी वाङ्मयाच्या समृद्धीत भर टाकणारे असे हे अहिराणी लोकसाहित्य, अहिराणी वाङ्मय लिखित स्वरुपात वाचकांपुढे मांडून ते अभिजात वाङ्मय ठरावे व त्या निमित्ताने कां होईना अहिराणी लेखकांमध्ये चढाओढ लागावी. प्रत्येकाचे कानी घुमावे 'अहिराणीशी जुळले नाते !'

तांबेपुरा–अमळनेर.
भाऊबीज :
४ नोव्हेंबर १९८६/सौर १९०८.

**कृष्णा पाटील**




अहिराणी बोली याही जिल्ह्यांत बोलली जाते.




महाराष्ट्रातील अहिराणी बोली भाषिक जिल्हे.

# नमो कान्हदेशा ! अहिराणी देशा !!

**कान्हदेशी भाषा—**

**जी आहे अमुची राणी**
**ती भाषा अमुची अहिराणी**
**अनेक जाती एकच भाषा ही प्रेमाची नाती ।**
**नमो कान्हदेशा, अहिराणी देशा सोन तुझी माती ।**

खान्देशातील अजिंठा-वेरूळच्या मनमोहक कलाविष्काराइतकेच जगाचे लक्ष वेधून घेणाऱ्या खान्देशच्या संस्कृतीचे अहिराणी भाषा हे एक अविभाज्य अंग आहे. अहिराणी (खान्देशी) खान्देशचं मधाळ लेणं. खान्देशच्या संस्कृतीत तिचा सर्वात मोठा वाटा. अहिराणी भाषेतून खान्देशी माणूस, संस्कृती, मन प्रतिबिंबित झालेले खान्देशच्या सर्वसाधारण मनमानसाची भाषा अहिराणी. जळगांव, धुळे, नासिक जिल्ह्यांच्या परिसरात खान्देशी बोली नांदत आहे. अहिराणी लोक साहित्य दर्शन 'सण आणि उत्सव' व प्रस्तुत 'नाती-गोती' पुस्तकात उध्दृत केलेल्या अमृततुल्य अहिराणी ओव्या ज्या खाणीत मिळाल्या त्या भूप्रदेशाचा भौगोलिक, ऐतिहासिक, सांस्कृतिक, साहित्यिक परिचय होवून जळगांव जिल्ह्याचे संपन्न, समृद्ध, परंपराचे दर्शनासाठी हा टी. व्ही. प्रपंच.

**कान्हदेस—भौगोलिक :**

'महाराष्ट्र भूमी शिरोभागी साजे, तुझे स्थान तेथे सदा तू विराजे' असा ज्याचा उल्लेख आपली कर्मभूमी असलेल्या साने गुरुजींनी 'खान्देश स्तोत्रात' केला आहे. त्या खान्देशाचा भूभाग उत्तर व दक्षिण भारताच्या सीमेवर व महाराष्ट्र राज्याच्या उत्तर भागात स्थानापन्न झालेला आहे. जात्याच निसर्ग सुंदर दुआबात स्थित खान्देशाच्या उत्तरेला ३ कि. मी. ऊंचीच्या सातपुडा पर्वताच्या विस्तीर्ण रांगा व पायांशी मध्य-प्रदेशाचा भाग आहे. दक्षिणेस जग प्रसिद्ध लेण्यांना आपल्या कुशीत बाळगणाऱ्या अजिठ्याचा विलोभनीय डोंगर, सातमाळा व औरंगाबाद जिल्हा, आग्नेयेस हस्तीचे डोंगरांना जवळीक करणारे पूर्वेकडील विदर्भाचा बुलढाणा तालुका व मध्यप्रदेशाचा निमाड जिल्हा. सूर्यास्ताला सह्याद्रीचा काही भाग, धुळे जिल्हा व नासिक जिल्हा मैत्री करतो. पृथ्वीच्या नकाशात २० ते २० अंश उत्तर अक्षांश व ७३ ते ७६ अंश पूर्व रेखांश भाग व्यापून सुमारे १६० मैल लांब आणि ९० मैल रुंदीच्या प्रदेशावर खान्देशाने आपले साम्राज्य कायम ठेवले आहे. अलिकडे पूर्व खान्देश म्हणून जगाला ज्ञात असणाऱ्या जळगांव जिल्ह्यातील अमळनेर, एदलाबाद, एरंडोल, चोपडा,

चाळीसगाव, जळगाव, जामनेर, पाचोरा, पारोळा, भडगाव, भुसावल, यावल, रावेर तालुके अहोरात्र पहारा करीत असून, तापी खोऱ्याचा अत्यंत सूपिक प्रदेश ही उपाधी कायम टिकविण्यासाठी तापी, गिरणा या आपल्या भगिनींसह सुकी, गुळी, खडकी, मोर, वाघुर, तितुर, पूर्णा, भोर, भोगावती, रत्नावती, अंजनी, अनेर अशा आपल्या सईबहिणींसह अहोरात्र वाहून कार्यरत आहेत. ११,६३,९८१ चौरस किलोमिटर क्षेत्रात फतकल मारुन बसलेल्या पूर्व खान्देशाला जामदा, दहिगाव, गिरणा, बोरी, मन्याड, सुकी हे मध्यवयीन पाणके व हतनूर हा वयस्कर माळी अधून मधून पाणीपुरवठा करून २६,१८,८८४ जीव असलेल्या ८,६५,२९० हेक्टर मध्ये डोळयाच्या मोती बिंदुतून निघणारे दृष्टीकिरण स्थिरावतात व आपल्या जन्माचे सार्थक म्हणून उभ्या असलेल्या केळी, कपाशी, ऊस पिकविणाऱ्या 'तुझी भूमी काळी मृदू भुस भुसित' खान्देशाला फुलवतात. ज्वारी, गहू, बाजरी, मूग, उडीद, चवळी, तूर, तीळ ही त्याच्या तालावर नाचून साथ करतात. उबदार वाऱ्यावर नाचणारी ही पिके केव्हा केव्हा बोर, जांभूळ, पेरू यांना जवळ करतात. नद्यांचा पावन सहवास व निर्मळ जलाने शेती जीवनात हरित क्रांती येवून १२ विधानसभा मतदार संघ व २ लोकसभा मतदार संघाने ४ साखर कारखाने आपल्या पोटात सामावून घेतले आहेत.

**कान्हदेस—ऐतिहासिक :**

प्राचीन इतिहासापासून खान्देश भारताच्या, महाराष्ट्राच्या सांस्कृतिक परंपरेत स्वतःचे असे स्थान महात्म्य मिळवून आहे. या अहिराणीच्या देशाचा स्वतंत्र इतिहास संस्कृती परंपरा ठकळपणे डोळयात भरते. कान्हदेस उर्फ खान्देश उर्फ जळगाव जिल्हा हा भाग रामायणाच्या काळात 'ऋषिक' या नावाने ओळखला जात असे. 'रामायण' महाकाव्य जगाला देणारे आद्य कवी 'वाल्मिकी' हे चाळीसगाव तालुक्यातील 'वालझरी' येथे राहत होते. पूर्व काळात माणसे मारून सात रांझण खडे त्यांनी जेथे जमविले ते 'रांजनगांव' येथे जवळच आहे. 'प्रभु रामचंद्र' रामायण काळात हल्लीच्या अमळनेर तालुक्यातील 'नारणे-घुरखेडे' गावाजवळ रामेश्वर या तापी-गिरणेच्या संगमावर येवून एकाच वेळी बाण मारून सातपुडा पर्वतात उनपदेव, सुनपदेव, निझरदेव हे रोगनिवारक उष्णादिकाचे झरे निर्मित झाले. रामाला उष्टे बोरे (मेहरूणची बोर) देणारी शबरी भिल्लीण सातपुडा पर्वतातच राहात होती. खान्देशात त्यावेळी 'दण्डकारण्य' होते. महाभारतकार 'व्यास' मुनींची समाधी हडकाई खडकाई नदीच्या काठावर असलेल्या हल्लीच्या यावल या तालुक्याच्या गावी आहे. महा-भारतातील पाडवाचे वास्तव्य एकचक्रा नगरी (हल्लीचे एरंडोल हे तालुक्याचे गाव) येथे होते. तेथे आजही पांडव वाडयाचे अवशेष उपलब्ध आहेत. येथून १३ कि. मी. अंतरावर पद्मालय या ठिकाणी भिमाने बकासुराचा वध केला होता. आजही तेथे असलेले माणसाच्या पावलाच्या आकाराचे कुंड 'भिमकुंड' म्हणून ओळखले

जाते. कानळदा, ता. जळगांव येथे कण्वमुनीचे वास्तव्य होते. आजही तेथे कण्वाश्रम आहे. वरील विधानाच्या सत्यतेसाठी दंतकथा, आख्यायिका सोडून भरभक्कम पुरावे पुराणात मिळाले आहेत.

त्यानंतरच्या काळाचा इतिहास उपलब्ध नसला तरी सुमारे इ. स. १५० ते २०० या काळात अहिराणी भाषिक प्रदेशात असलेली भिल्ल व गौंड ही येथील मूळ वस्ती असावी. आज ठिकठिकाणी असलेल्या भिल्ल वस्तीवरुन असे म्हणता येईल की, भिल्ल आणि **गौंड** जमातीच्या गणराज्यांचे त्यावेळी खान्देशावर अधिपत्य असावे. याच काळात उत्तर भारतातून खाली दक्षिणेकडे धाव घेतलेल्या अहिर व आभिर लोकांनी आपली मालकी या भागावर सिद्ध केली असावी. इ. स. पूर्व ३०० ते ४०० च्या काळात पश्चिमेकडून आलेल्या यादवांनी या भू-भागावर १२ व्या शतकापर्यंत राज्य केल्याचा इतिहास अभ्यासकांना दिसतो. 'देवगिरी' हे त्यांचे राजव्यवहाराचे केंद्र होते. १६ व्या शतकाच्या उत्तरार्धात आणि त्यापुढे बौद्ध धर्माच्या दृष्टीने असलेल्या भरभराटीच्या काळात अनेक बौद्ध धर्मीय राजे 'महामंडलेश्वर' ही पदवी धारण करून पैठणहून येत व या खान्देशावर राज्य करित असत. (संयुक्त खान्देश डिरेक्टरी-- श्री. डी. एम. भनसाळी) असा उल्लेख आढळतो.

खान्देश परिसरात यादवाचे राज्य सुरू होते त्याच १४ व्या शतकात उत्तरेकडे मोगलांचे वर्चस्व होते. १६ व्या शतकापर्यंत मोगल आपला विस्तार वाढवित वाढवित खान्देशापर्यंत आले. 'फरुकी' राजाचे राज्य असलेल्या या भागात पुढे मोगल सम्राट 'अकबर' यांचा अंमल सुरू झाला. त्यानंतर अकबराने आपला मुलगा दानियल याला हा भाग देवून त्यांचे नाव 'दानदेश' असे ठेवले; परंतु ते फार काळ टिकले नाही. खान्देश हा शेवटी खान्देशच राहिला व आजही आहे. शहाजहानच्या काळात खान्देशात भयंकर दुष्काळ पडला होता. त्यावेळी अतोनात प्राणहानी झाली होती. वित्त हानीही झाली होती. इ. स. १६७० मध्ये शिवाजी महाराजांनी दुसऱ्या वेळेस 'सुरत' शहरावर मोहीम केली व परततांना ते खान्देशातून दक्षिणेकडे गेले. १६७५ मध्ये त्यांनी चोपडा, धरणगांव, पाचोरा येथे मोहीम केली त्यावेळी धरणगांवची वखार, बाजारपेठ मोठी व तलम कापडासाठी प्रसिद्ध होती. बऱ्हाणपूरचा सुभेदार हुसेन अलीखान यांने खंडेराव दाभाडे (पारधी) यांचे वर्चस्व करण्याचा प्रयत्न केला होता. पेशवाईच्या काळात काही काळ खान्देशावर होळकरांचा अंमल होता. खान्देशाला हा काळ कृषि क्षेत्राचे बाबतीत वैभवाचा होता. नगर, बिदर, विजापूर, वगैरे दुष्काळी जिल्ह्यातून अनेक कुटुंबे खान्देशात येवून स्थायिक झाली. पुढे औरंगजेबाच्या धर्मांतराला मदत करण्याच्या दृष्टीने अनेक 'अरब' लोक उत्तरेकडून खान्देशात येवून वस्तीला राहिले.

सन १७०० च्या सुमारास या भागात हिंदूचा अंमल होता. त्या काळात खान्देशात भरभराट व धामधूम होती सन १८०३ च्या भयंकर दुष्काळाचे वेळी मात्र खान्देशातील हजारो माणसे मृत्युमुखी पडली आणि अनेक कुटुंबे बेघर होवून देशोधडीला लागली. १८७६ च्या दक्षिणेकडील दुष्काळ प्रसंगी पुन्हा एक लाट आली, दक्षिणेकडील बरेच लोक खान्देशात वस्तीला आले.

खान्देशचा प्राचीन इतिहास ‘तोरणमाळ’ व ‘अशिरगड’ या दोन डोंगरी किल्ल्यांशी निगडीत आहे. इ. स. पूर्व १ ते २ शतकापासून ख्रिस्ती शतकाच्या सुरवातीपर्यंत खान्देश बौद्ध धर्मीय राजाच्या छत्राखाली होता. पुढे ‘आंध्रभृत्य’ राजांनी येथे काही दिवस राज्य केले. परंतु त्यांनाही साहसत्रप किंवा क्षहराट घराण्यांतील नहपान राजाने पिटाळून लावले. पुढे गुजराथचा राजा रुद्रदामन याने येथल्या राजांना आपले मांडलिक बनविले होते. ४ थ्या शतकाच्या उत्तरार्धात नासिक येथे ‘वीरसेन’ नावाचा अहिर राजा राज्य करीत असल्याची नोंद आहे. त्यामुळे या भागात ‘अहिर’ संस्कृतीची पाळे मुळे रुजली. ५ व्या शतकात वाकाटक या गुप्तांच्या मांडलिक यवन राजाचे या भागावर स्वामित्व होते. इ. स. ४८९ मध्ये चालुक्य राजा गुजराथकडून इकडे आला. त्यानंतर यादव घराण्याचे राज्य सुरू ठाकले.

इ. स. १००० ते १२०० या काळात अशीरगडचा परमार वंशीय ‘तक’ आडनावाच्या रजपूत राजाचे व पुढे ‘पाटण’ येथील निकुंभ वंशीय राजाचे येथे राज्य होते. हा राजा शिवभक्त होता. त्याच्या अखत्यारीत १६०० गावे होती. निकुंभ वंशीय ‘सोनाळदेव’ राजाच्या कारकिर्दीत इ. स. १२०६ मध्ये भामरे येथील जैन गुहा, मनमाड जवळील ‘अंकाई’ डोंगरातील जैन गुहा व चाळीसगाव तालुक्यातील पाटणा येथे ‘ब्राह्मण गुहाय’ खोदली गेली.

१२१६ मध्ये निकुंभ वंश संपला आणि देवगिरीच्या यादवांची कारकीर्द सुरू झाली. खान्देशातील हेमांडपंथी देवालये त्याच काळात उभारली गेली. १३ व्या शतकात अशिरगडच्या राजाचा पराभव करून चौहाण राजे खान्देशवर राज्य करू लागले. स्वतःस खान्देशचे राजे म्हणून घेत.

देवगीरीवर स्वारी करून अल्लाउद्दीन खिलजीने सन १२२५ मध्ये खान्देशची लट केली व चौहाण घराण्याचा नायनाट केला. १३२३ पासून खान्देशवर महंमद तुघलघ यांचे वर्चस्व होते. त्याने आपली राजधानी दिल्लीहून दौलताबादेस नेली तेव्हा ‘पाल’ (जिल्हा जळगांव) येथे विश्रांती घेतली होती. १३४६ मध्ये दक्षिणेकडील सरदारांनी बंड केले. तेव्हा वऱ्हाड व खान्देशचा सरदार ‘इमादड मुल्क’ हा नंदुरबार येथे पळून गेला. इ. स. १३७० (इ. स. १३७० ते १३९९) साली दिल्लीचा बादशहा फिरोझशहा तघलघ याने मलिकराज फरुकी याला खान्देशचा सेनापती नेमले. माळव्याचा राजा दिलावरखान याच्या मुलीशी मलिक अहमद उर्फ मलिक राजा याचा मुलगा मलीनसीर



थाळनेरचा भुईकोट किल्ला.
थाळनेर (पश्चिम-खान्देश)



फारुकी राजा मीरा मुबारक खान स्मरणार्थ,
थडग्याच्या दरवाज्यावर कोरलेला शिलालेख-
लिपी-पर्शीयन, अरेबीयन. काळ- ५ जून १४५७.



थडग्यांचा कलात्मक दरवाजा, थाळनेर.



' वास्तू शिल्पाचा प्रतिकात्मक नमुना '
मलिक राजा, मलिकनसीर मीरा आदिलखाँन, ची थडगी थाळनेर.

(इ. स. १३९९ ते १४३७) यांचे लग्न झाल्याने खान्देशात मलीक राजाचे महत्त्व वाढीस लागले. मलिक हा 'फारुकी' घराण्यातील पहिला राजा होय. मलिकने अशिरगडच्या राजाला फसवून ताब्यात घेतला. तापीनदीवरील थाळनेर (ता. शिरपूर, जि. धुळे) (जुने 'तियातुरा' Tiatura ताहीनीयरे) जिंकले आणि सुलतानपूरवर स्वारी केली. गुजराथच्या अहमद राजाने त्याला खान ही सन्मानदर्शक पदवी बहाल केली. या नसीरला बहामनी सेनेने लळींग (ता. धुळे) च्या किल्ल्यापर्यंत पिटाळून लावले. नंतरच्या काळात मीरान, आदिलाखान, मीरान मुबारिक, आदिलखान, दाऊदखान, गझनीखान, दुसरा आदिलखान, मीरान मुहम्मदखान, मुबारिकखान, दुसरा मीरान मुंहमद, राजा अलीखान, बहादूर खान अशा प्रमुखांनी खान्देशच्या प्रदेशावर १५ व्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत राज्य चालविले.

इ. स. १४१७ मध्ये फरुकी राजाच्या (खान्देशच्या राजाचा) मालिक नासीर या दुसऱ्या मुलास खान ही पदवी गुजराथच्या पहिला अहमद या राजाने दिली. अबूल फजलच्या 'ऐने अकबरी' प्रमाणे खान्देश म्हणजे खानाचा देश अशी उपपत्ती आहे. परंतु ज्याअर्थी फेरिस्तानेही आपल्या वर्णनात खान्देशचा उल्लेख केलेला आहे त्याअर्थी हे नाव त्याही (वर उल्लेख केल्याकाळाच्या) पेक्षाही जुने असावे. 'मिसिक्लेर' चा नावाचे एक इतिहास संशोधक, श्री. के. बी. मराठे व मिस्टर विल्सन ह्यांचे मते 'खान्देश' हे नाव 'खांडव वन' यावरून आले असावे. महाभारतात 'तोरण माळ' (धुळे जिल्हा) च्या राजाशी पांडवाचे युद्ध झाल्याचा उल्लेख आहे. अर्जुनाने खांडव वन जाळून ही भूमी लागवडीस व वसाहतीस योग्य अशी केली. एंरडोल (जिल्हा जळगांव) येथे आजही पांडव वाडयाचे अवशेष आढळतात. इतिहास संशोधक कर्नल साईक्स ह्याचे मते खान्देश म्हणजे 'खांड-खिड' जवळील देश अशी उत्पत्ती आहे. खान्देशच्या उत्पत्तीवर विद्वानांचे एकमत नाही.

आज अस्तित्वात असलेले जळगाव व धुळे जिल्हा हे पूर्वी एकच होते. यालाच खान्देश असे नाव होते. सन १९०६ साली त्याचे दोन विभाग करण्यात आले. पूर्व खान्देश (जळगांव) व पश्चिम खान्देश (धुळे) अशी नावे त्यांना देण्यात आली. महाराष्ट्र राज्य निर्मितीनंतर पूर्व खान्देशला जळगाव व पश्चिमेला धुळे अशी नावे देण्यात आली. ब्रिशीश अमदानीत वऱ्हाड व निज़ाम राज्यांतील बरेच लोक येथे वस्तीला आले व कायमचे स्थायिक झाले.

खान्देशात पूर्वी अभिर लोकांची वस्ती होती. अहिराणी बोली भाषिक प्रदेशाला खान्देश नाव कसे पडले याबाबत विद्वानात दुमत असले तरी रामायणाच्या काळात हा भाग "कृषिक" या नावाने उल्लेखिलेला आहे. अहिर हे शककुशणाप्रमाणे परकीय आहेत व ते भारताबाहेरून भारतात आले आहेत. आभीरपासून आहिर या शब्दांची उत्पत्ती झाली आहे असे कृ. पां. कुळकर्णी यांचे मत आहे. अहिर हे यदुवंशीय आर्य असावेत. कारण ते

"कृष्णाची" पूजा करीत. कन्हेर म्हणजे कृष्ण. कन्हेरदेश म्हणजेच खानदेश. कानबाईचा उत्सव फक्त खानदेशात साजरा करतात. म्हणून वरील मत ग्राह्य वाटते. नंदुरबार (नंदरबार), कन्हेरेगांव (ता. अमळनेर), कानळदे गांव (ता. जळगांव), हा त्याचा पुरावा होय. आभीर हे नेमके कुठून आले याचा सबळ पुरावा नसला तरी "अहिराणी" ही आर्योद्भव भाषा आहे. खानदेशावर अहिरांनी राज्य केले. काही काळ देवगीरीच्या यादवांनी पेशवाईच्या काळात होळकरांनी सत्ता गाजविली, छत्रपती शिवाजी महाराजांनीही खानदेशवर मोहिमा केल्याचा उल्लेख आपण वर पाहिला. त्या काळच्या जनरितीचा अहिराणीवर परिणाम झालेला आढळतो. खानदेशात बऱ्याच ऐतिहासिक उलाढाली झाल्याचे आपण वर पाहिले. राजकीय जयापराजयाच्या विविध प्रक्रीया व आघात सहन करूनही खान्देशने आपली लाडकी आवडती अहिराणी भाषा सातत्याने जतन करून वृद्धींगत करून समृद्ध केली आहे हे एक विशेष म्हणता येईल. अहिराणी भाषिक प्रदेशाची ऐतिहासिक व भौगोलिक परंपरा गौरवास्पद आहे.

**कान्हदेस—सांस्कृतिक :**

संस्कृती म्हणजे मानवी प्रज्ञा, कर्तृत्व, मन (आत्मा) यांचा आविष्कार, संस्कृती ही मानवी कृती असून ती त्या जीवनातील प्रगतीचे निर्देशक आहे. मानवी कर्तृत्व संस्कृतीचा मानदंड होय. भाषा हे संस्कृतीचे अविभाज्य अंग आहे. त्या भाषेवरून ती ती संस्कृती ओळखता येते. मानवी विकासात भाषेचा मोठा सहभाग आहे. जशी संस्कृती तसे साहित्य. खान्देशी भाषेची व खान्देशाची स्वतःची अशी एक पारंपारिक संस्कृती आहे. खान्देशाची संस्कृती आभीर संस्कृती होय. आजवर अनेक वंशांचे, जातीचे, धर्माचे लोक येथे येवून स्थायिक झाल्याचा इतिहास आपण पाहिला. नवीन येणारे मूळच्या खान्देशी लोकांमध्ये पूर्णपणे मिसळून गेले असावेत असाही तर्क काढला जातो. राम, शबरी भिल्लीण, वाल्मिकी, पांडव,व्यास, गुप्तराजे, भास्कराचार्य, कोळी, भिल्ल राजे, मुक्ताबाई, चांगदेव, संत सखाराम महाराज, अशा अनेक वीर्यवंत, शौर्यवंत, धैर्यवंतांनी पुनित होवून खान्देश गुणवंत, भाग्यवंत झाला आहे. रोट, गौराई गुलाबाई, कानबाई, रानबाई, जाऊळ, आसरा, बोणे उत्सव फक्त खान्देशातच साजरा करतात. गुढीपाडवा, अक्षय तृतीया, आषाढी एकादशी, पोळा, दसरा, दिवाळी, सक्रांत, होळी असे अन्य सण त्यांच्या साथीला असतात. त्यातून खान्देशाची परंपरा, किर्ती, प्राचीनता यांचे उल्लेख सापडतात. सती अहिल्याबाई होळकरने बांधलेले घाट, देवळे, धर्मशाळा, यांचे अवशेष आजही गतकाळात नेतात. पारोळ्याचा किल्ला, थाळनेरचा किल्ला, चौगांवचा किल्ला, लळींगचा किल्ला, बहाळची गढी, यावलचा किल्ला आजही भूप्रदेशाची ग्वाही देत भग्न अवस्थेत उभे आहेत. ते लाडकूबाई, मन्साराम, तंट्या भिल्ल व अनेक ज्ञात अज्ञातांचा पराक्रम सांगतात. वाचक भूतकाळात रममाण होतो. संपन्न संस्कृती इतिहास परंपरेत खान्देशाची ही बोली अति प्राचीन आहे. तिच्या समोर अनेक सांस्कृतिक उलाढाली झालेल्या आहेत. आजही



'कानबाई-रानबाई' रोटचा सण.



'कानबाई-रानबाई (रोट) विसर्जन मिरवणुक.



जग प्रसिद्ध अंजिठा लेणी
लेण, क्र. १९ ' दर्शनी भाग '



संत सखाराम महाराज समाधी, अमळनेर.

दुसऱ्या राज्यातील लोक खान्देशात येतात, राहतात. अठरापगड जातीचे लोक खान्देशात आहेत. बारा कोसांवर भाषा बदलते. कुणबी व बारा बलूतेदार, गुर्जर, रेवापाटीदार (पांजणे) खान्देशात आहेत. भिल्ल, पावरा, गोंड, कोतील, तडवी हे आजही आदिवासी भागात सातपुड्यात राहतात. त्यांची प्रत्येकांची वेगळी बोली भाषा आहे, तरी ती अहिराणीच आहे. विशेष म्हणजे तडवी, पिंजारी मुसलमान धर्माचे आहेत. वंजारी ही भटकी विमुक्त जमात आहे. त्याची वेगळी बोली आहे. तिचा अहिराणीवर संस्कार झाला आहे.

खान्देशच्या वरील अहिराणी बोलितील अहिराणी ओव्या, लोकगीते, लोककथा, उखाणे, म्हणी, कानबाईच्या वह्या, आख्यायिका यांनी काळ्या मातीतील पिकाइतकाच खान्देशला वाव दिला आहे, भाव दिला आहे. मातेला अपत्य जननीपासून मिळालेल्या सुखाइतका किंबहुना कांकणभर जास्त आहिराणीचा साहित्य सहवास खान्देश संस्कृतीला व इतर मराठी वाचकांना सुखावह ठरावा असा आहे. अहिराणीतील या ओव्या जानपत स्त्रियांनी गाईल्या असल्यातरी शाळेची पायरी न चढता स्वानुभवातून त्या जन्माला आल्या आहेत. आज खान्देशातील हे स्त्रीधन मनाला भुरळ पाडते. सासर-माहेरची हृदयंगम वर्णने ओतप्रोत आहे. त्यागमय, कष्टमय, सेवामय, प्रेममय व सोशिक अशा अहिराणी स्त्रीच्या संस्कृतीचा तिच्या काव्यांवर फार मोठा प्रभाव पडलेला आहे.

निसर्गातील रसाळ, टवटवीत, रसिली वर्णने ही आहिराणी ओव्यात आढळतात. जीवनातील दुःख, कष्टाला खान्देशी संस्कृतीत अहिराणी संस्कृतीत थारा आहे. अहिराणी स्त्रीच्या प्रतिभेची उंची पाहून मराठी रसिकांनी, वाचकांनी, समीक्षकांनी थक्क व्हावे एवढी ती ऊंच आहे. येथेच खान्देशी संस्कृतीचे सार सामावलेले आहे.

काही सांस्कृतिक, ऐतिहासिक स्थळे येणेप्रमाणे—तुम्ही बघा म्हणे !

**अंजिठा लेणी.**—जळगांव पासून ६४ कि. मी. अंतरावरील विलोभनीय अंजिठा डोंगरांच्या कुशीत जग प्रसिद्ध 'अंजिठा लेणी' पहुडली आहे.

**अमळनेर.**—जळगांव पासून ७० कि. मी. अंतरावरील महाराष्ट्राचे प्रति पंढरपूर, संत सखाराम महाराजांची पुण्यभूमी व मातृहृदय, साने गुरूजींची कर्मभूमी. येथे अंबर ऋषीची समाधी आहे, तत्त्वज्ञान मंदिर भारतात प्रसिद्ध. दरवर्षी वैशाख पौर्णिमेला मोठी यात्रा भरते.

**ऊनपदेव.**—चोपड्यापासून अडावदमार्गे २३ कि. मी. व अडावद गावापासून ५ कि. मी. अंतरावरील सुप्रसिद्ध उष्णोदक झरा. ऊनपदेवाच्या तलावाला भूगर्भातून झऱ्याच्या रुपाने पाणी मिळते. हा भाग डोंगराळ असून सिताफळे व रामफळे यांची झाडे भरपूर

आहेत. गोमुखातून पडणाऱ्या पाण्याचे उष्णतामान ७०° फॅ. चे वर असते. येथील पाण्यात सोडियम, पोटॅशियम, मॅग्नेशियम व कॅलशियम या धातूचे क्लोराईडस् सापडतात. काही सिलीकेटस्सुद्धा आहेत.

**एरंडोल.**—जळगांव येथून ३४ कि. मी. अंतरावरील अंजनी नदीच्या काठी वसलेले तालुक्याचे गाव. पांडव काळातील 'एकचक्रानगरी'. काही काळ पांडवाचे वास्तव्य या नगरीत होते. येथून १३ कि. मी. अंतरावर भिमाने बकासूराला ठार मारल्याची आख्यायिका प्रसिद्ध आहे. पद्मालय येथील 'भिमकुंड' म्हणून ती जागा प्रसिद्ध आहे. आजही पांडववाडा एरंडोल येथे भग्न अवस्थेत असून त्याचे रुपांतर एका मशिदीत झालेले आहे असे म्हणतात. एंरडोल हे मोगल काळात व्यापारी पेठ म्हणून प्रसिद्ध होते. कागद, नीळ, धान्य यांची ती मोठी पेठ होती. आजही तेथे हात कागद (एंरडोली कागद) तयार होतो. तेथील न्यायपद्धतीवरून "एंरडोली न्याय" अशी "फ्रेज" अहिराणी भाषेत आहे.

**कनासी.**—भडगांव तालुक्यातील गाव. कजगाव स्टेशन पासून ४ मैल अंतरावर असून या ठिकाणी महानुभाव पंथीय लोकांचे २०० वर्षे वयाचे जुने कृष्णनाथाचे मंदिर आहे.

**कानळदा.**—जळगांव पासून उत्तरेकडे १६ कि. मी. अंतरावर गिरणा नदीच्या काठी वसलेले पुरातन गाव. येथे एका टेकडीवर काळ्या खोदीव अशा दगडाचे देऊळ आहे. या देवळाशेजारी एक मठ आहे. त्याच्या तळघरात काही पायऱ्या उतरून गेले म्हणजे एक दरवाजा लागतो. त्या दरवाजातून आत गेले म्हणजे पुन्हा पायऱ्या लागतात. पुन्हा एक भुयार लागते. त्या भुयारात ४ गुहा आहेत. गुहात देवी वगैरेच्या मूर्ति आजही आहेत असे संशोधक सांगतात. ही टेकडी भुसभुसीत मातीची आहे. हिच्या खाली महर्षी कण्वऋषींची गुहा आहे अशी आख्यायिका आहे. हल्ली येथे एक कण्वाश्रम आहे. ऐतिहासिक अवशेष निघण्याचा दाट संभव आहे.

**कोथळी.**—एदलाबाद गावापासून १ कि. मी. अंतरावर संत ज्ञानोबाची भगिनी संत मुक्ताईचे देवस्थान आहे. अभंगाची संख्या कमी असली तरी ते ताटीचे अभंग' म्हणून अमर झालेत. आळंदीहून आल्यावर त्यांनी येथे समाधी घेतली आहे. माघ वद्य एकादशीला मोठी यात्रा भरते.

**खाचण.**—चोपडे तहसीलपासून दक्षिणेस १४·४ कि. मि. अंतरावर तापी नदीच्या उत्तरतीरी असलेले जुनेगांव पूर्वेस 'लाखी', पश्चिमेस 'महाद्याभट' ही वस्ती होती. श्री. छत्रपती शिवाजी महाराज उत्तर आयुष्यात 'धरणगांव–चोपडा' या मोहिमेवर आले होते. पुढ ते खाचणे मार्गे मोठ्या वाटेने चोपडे येथे गेले. ते काही काळ 'खाचणे' येथ विश्रांतीसाठी थांबल्याची दंत-कथा आहे. कै. कवी दगडूचे जन्मगाव



मुळ मुक्ताबाई मंदिर मेहुण ता. एदलाबाद.



संत मुक्ताबाई मंदिर (जुने) कोथळी, ता. एदलाबाद.



चांगदेव महाराज समाधी चांगदेव ता. एदलाबाद



संत चांगदेव मंदिर चांगदेव, ता. एदलाबाद.



गणेश मंदिर (जागृतदेवस्थान) पद्मालय, ता. एरंडोल.

प्रसिद्ध 'कटाव' कार कै. पुंडलीक बाबांचे दिर्घ काळ वास्तव्य होते. सुप्रसिद्ध अहिराणी लोक साहित्य संशोधक, कवी कृष्णा पाटील इथलेच. संत शितलनाथ बाबा महाराज समाधी व मठ येथे आहे.

**गारखेडा (बु॥).**—जामनेर तालुक्यातील गाव जामनेर-भुसावळ रस्त्यावर पाताळेश्वर शिवमंदिर, खुजराहो व लिंगराज शिल्पांची आठवण करून देते. मंदिरावरील कोरीव काम अप्रतिम.

**चांगदेव.**—एदलाबाद पासून ८ कि. मी. अंतरावर पूर्णा व तापी नदीच्या संगमावर वसलेले एक तीर्थक्षेत्र "तत्वसार" ग्रंथ लिहिणाऱ्या हटयोगी चांगदेवाच्या वास्तव्याने पुनीत झाले आहे. चांगदेवाची समाधी, संगमावरील काळ्या संगमरवरी पाषाणाने बांधलेले महादेव मंदिर, दत्तात्रयाचे देवालय ही स्थळे परिसराला शोभा आणतात. महा-शिवारात्रीस मोठी यात्रा भरते.

**चोरवड.**—पारोळ्याहून १३ कि. मी. अंतरावर. जुने जागृत दत्त मंदिर, दत्त जयंतीस मोठी यात्रा भरते. येथे दर्शन घेतल्याने चुरड, भुतबाधा नष्ट होते असा समज रूढ आहे.

**नगरदेवळा.**—भडगावजवळ असलेले ऐतिहासिक गाव. संगमेश्वर हे हेमाडपंथी शिवमंदिर भग्नावस्थेत आहे. मंदिराचे शिल्प अप्रतिम आहे. येथे एक सूत गिरणी आहे.

**नागझिरी.**—सुकी नदीच्या काठी एक भूमिगत झरा आहे. त्यावर चिरेबंदी कुंडे बांधलेले आहे. पाणी कुंडा समोरील दहा गोमुखातून वाहते.

**निझरदेव.**—सातपुडा पर्वताच्या पायथ्याशी सुनपदेवपासून ३ कि. मी. अंतरावर असलेला गरम पाण्याचा झरा. याचे उष्णतामान दुपारी १००° ते १०३° फॅ. इतके असते. पाणी रोग निवारक आहे.

**पद्मालय.**—एरंडोल पासून १३ कि. मी. अंतरावर असलेले एक प्राचिन तीर्थक्षेत्र सदैव निसर्गरम्य तळे कमळ पुष्पांनी मंदिरास शोभा आणते. काठावर गणपतीचे जागृत मंदिर. येथील घंटा फार मोठी आहे. गोविंद बुवा नावाच्या साधुने पेशवाईच्या काळात पैसे जमवून बांधले. ऋद्धीसिद्धी देवालय आहे. येथे दरवर्षी मोठी यात्रा भरते. जवळच भिमकुंड नावाचे ठिकाण आहे. भिमाने बकासूराला ठार मारल्यावर तहान लागली असता तेथील खडकात हाताचा कोपरा मारला व हे कुंड उत्पन्न झाले (केले). अशी दंत-कथा प्रचलित आहे.

**पाल.**—जळगाव पासून ८० कि. मी. अंतरावरील सातपुडा पर्वतातील सुप्रसिद्ध थंड हवेचे ठिकाण. फॉरेस्ट ट्रेनिंग सेंटर, अभय अरण्य व भोवतालची वनश्री डोळ्याचे पारणे फेडते. मोगल सम्राट महंमद तघलघ दिल्लीहून दक्षिणेकडे जाताना येथे विश्रांतीस थांबला होता. एक मशिदही येथे आहे.

**पाटणा.**—चाळीसगांव पासून १५ कि. मी. अंतरावरील एक अति पुरातन गाव. जवळच पितळपुरा येथे पितळ खोटे लेणी असून डोंगराळ प्रदेश व वनश्री प्रेक्षणीय आहे. खानदेशातील पहिली महत्त्वाची वसाहत. सुप्रसिद्ध गणिताचार्य भास्कराचार्य ह्यांचा नातू चांगदेव ह्यांनी येथे शके १२०६ मध्ये एक विद्यालय स्थापले. त्यात आजोबांचे गणित व ज्योतिष्यविषयक ग्रंथाच्या अभ्यासाची सोय केली होती. ह्या गावात् व परिसरात दोन-तीन लेण्या आहेत. एका लेण्यामधील सभामंडप वेरूळ येथील कैलास मंदिराच्या धर्तीवर तयार केला आहे. त्याच्या खांबावरील कोरीव काम अति सुंदर आहे. या लेण्यात अनेक देवतांच्या मूर्ती आहेत. गावाच्या दक्षिणेस १ कि. मी. वर टेकडीच्या पायथ्याशी एक लेणं आहे त्यास "शृंगारचावडी" व थोडे वर गेल्यावर लागणाऱ्या लेणीस "सीता न्हाणी" असे नाव आहे. शिखरावर देवीचे प्राचीन देवूळ आहे. शिल्प प्रेक्षणीय आहे. वाटेवर एक लेणं लागते त्यास नागार्जुन असे म्हणतात. त्याची गॅलरीसुद्धा एकेकाळी कोरीव खांबाची असावी. मराठी अहिराणीचा पहिला शिलालेख पाटणादेवी येथेच आहे. येथील पुराण वस्तु अवशेष खानदेशातील प्राचीन आहेत.

**पारोळा.**—जळगांवहून ५६ कि. मी. अंतरावर स्वातंत्र्य लक्ष्मी, महाराणी लक्ष्मीचे माहेर घर. येथे एक भुईकोट किल्ला आहे. कै. ह. ना. आपटे यांचे जन्मगांव.

**फरकांडे**—एरंडोल पासून २० कि. मी. अंतरावर "झुलते मनोरे" प्रसिद्ध. मुसलमान अमदानीतील बांधकाम. एका मशिदीला दोन मनोरे आहेत. एका मनोऱ्यावर चढून हलविला की दुसरा आपोआप हलतो. प्राचीन वास्तुकलेचा एक अप्रतिम नमुना.

**बहाळ.**—चाळीसगाव तालुक्यातील गिरणेच्या उत्तर काठावर वसलेले एक अति प्राचीन गाव. या गावाचा इतिहास अति प्राचीन आहे. बहाळजवळ पुरातन काळातील अवशेष सापडले आहेत. शके ११४४ (इ. स. १२२२) चा एक कोरीव लेख मिळाला आहे. पुराणवस्तु संशोधकांनी त्याची नुकतीच पाहणी केली असून त्यांच्यामते हे अवशेष म्हणजे नद्याखोऱ्यांतील ज्या प्राचीन संस्कृती होऊन गेल्या त्यापैकी ही एक आहे. या संशोधनाने अति प्राचीन संस्कृतीवर नवा प्रकाश पडेल असे तज्ञ म्हणतात.

**मेहरूण.**—जळगाव जवळ १ कि. मी. अंतरावरील गाव. जग प्रसिद्ध "मेहरूणची बोरे" इथलीच. त्याची अविट गोडी अवर्णनीय आहे. त्यांना कीड लागत नाही. या ठिकाणी एक तलाव आहे. दण्डकारण्य असताना शबरी भिल्लीणीने रामाला उष्टी बोरं दिलीत ते हे ठिकाण असल्याची दंत कथा आहे. 'इच्छादेवी' मंदिर येथे आहे.

**यावल.**—तालुक्याचे ठिकाण. हडकाई व खडकाई या नद्याच्या संगमावर वसलेले व्यासालय यावल अशी आख्यायिका आहे. गाव पुरातन आहे. व्यास मुनीचे पुरातन



पाटणादेवी मंदिर, पाटणा तहसिल चाळीसगांव.



पाटणादेवी, पाटणा ता. चाळीसगांव.



स्वातंत्र्य लक्ष्मी-झाशींची राणी-लक्ष्मीबाई.



स्वातंत्र्य लक्ष्मी, झांशीच्याराणीचा किल्ला, पारोळा.



खान्देशरत्न—कांदबरीकार कै. ह. ना. आपटे.



'झुलते मनोरे' फरकांडे, ता. एंरडोल.



नवी 'मुक्ताई देवी' एदलाबाद.



नवे मुक्ताई मंदिर एदलाबाद.

मंदिर आहे. त्यात त्यांची समाधी आहे. कागद व नीळसाठी एकेकाळी प्रसिद्ध होते. येथे मराठे सरदार निबांळकर यांचा प्रसिद्ध वाडा होता. एक पडका भुईकोट किल्लाही येथे आहे.

**लोहारे.**—पाचोरा तालुक्यातील एक गाव. माहिजी स्टेशनच्या आग्नेयेस १५ कि. मी. अंतरावरील ऐतिहासिक गाव. अकबराच्या कारकीर्दीत खानदेश विभागातील हा एक पेटा होता. १८१८ साली ब्रिटीशांनी हे गाव शिद्यांकडून मिळविले. येथे तपेश्वर महादेवाचे एक जुने हेमाडपंथी मंदिर आहे. येथील अडकित्ते पूर्वी प्रसिद्ध होते.

**सुनपदेव.**—चोपडे तालुक्यातील सुप्रसिद्ध गरम पाण्याच्या झऱ्यांपैकी एक. डोंगराळ भागात सातपुडा पर्वताच्या दोन सूळक्याच्या पायथ्याशी आहे. याला रामतलाव असेही म्हणतात. उनपदेव पासून ६ कि. मी. दूर आहे. जुन्या तलावाचे अवशेष येथे दिसतात. झऱ्यातून येणाऱ्या पाण्याचे उष्णतामान ७०° फॅ. चे वर असते. भूगर्भातून झऱ्याच्या रुपाने पाणी मिळते. येथील पाण्यात थोड्या प्रमाणात गंधक आहे. त्यामुळे त्वचा-रोग दुरुस्त होतात.

**सावळतबारा.**—जामनेरहून ४७ कि. मी. दूर डोंगरावर महानुभाव पंथाचे प्रसिद्ध दत्त मंदिर. येथे चैत्र पौर्णिमेस मोठी यात्रा भरते.

संस्कृतीचे ओझरते दर्शन घेताना आपल्याला त्यातील साहित्याची प्रकर्षाने ओढ जाणवते. "जशी संस्कृती तसे साहित्य" प्राचीन साहित्य कृतीचा आढावा पुढील प्रकरणी पहाणे योग्य ठरेल.

## कान्हदेस साहित्यिक

खान्देश साहित्य परंपरा गौरवास्पद आहे. त्यात भावना व हृदयाचा ओलावा आहे. या मातीत अनेक साहित्यिक साहित्यसेवा करीत होते व करीत आहेत. "केळी, कपासी व काव्य" पिकविणारा कान्हदेस उर्फ खान्देश म्हणून तो आजवर जगला आहे व यापुढेही जगेन. त्याचा इतिहास इतरांना स्फूर्तीदायी ठरावा.

### —प्राचीन युग—

फार प्राचीन काळापासून जळगाव जिल्ह्याने मराठी अहिराणी भाषा व साहित्य-निर्मितीला मोठा हातभार लावलेला आहे.

**महाकवि वाल्मिकी—**

वालझिरी, ता. चाळीसगाव हे जर महाकवी वाल्मिकीचं जन्मगाव व रांजणगाव येथे वास्तव्य होते. ही दंत-कथा सत्य असेल तर भारतातीलच नव्हे जगातील आद्य कवीला जन्म दिलाचं सारं श्रेय खान्देशच्या मातीलाच येते.

व्यास—

यावल येथे व्यासाची समाधी आहे. तेथे त्याचा जन्म झाला व काही काळ वास्तव्य होते म्हणजे पुन्हा दुसऱ्या महाकविला जन्म दिल्याने महाभारतादी काव्याने खान्देश पुनित होतो.

## मध्ययुग

खान्देशचा प्राचीन युग वैभवशाली होता तसा मध्य युग भरभराटीचा आहे.

मुक्ताबाई :

ज्ञानोबाची लहान बहीण मुक्ताई उर्फ मुक्ताबाई आपल्या अंगच्या गुणांनी यादव कालीन सांस्कृतिक इतिहासात तेजस्वी व्यक्तीमत्व ठरले. आपल्या पोरकेपणावर मात करून आत्मज्ञानाच्या क्षेत्रात तिने मोठा अधिकार मिळविला. निवृत्तीनाथ हा थोरला भाऊ तिचा गुरू होता. त्याच्याकडून तिने साम्राज्य प्राप्त करून घेतले. एक अलौकीक योगीनी म्हणून तिची तेजोमयी मूर्ति महाराष्ट्राच्या मनःपटलावर कायमची विराजमान झाली आहे. तिच्या उपलब्ध अभंगांची संख्या ५० हून कमी आहे. पण तेवढ्याच अल्परचनेतून तिच्या दिव्य अनुभवाची झळाळी प्रतीत होते. ज्ञानोबा-सोपानच्या महानिर्वाणानंतर मुक्ताबाईला जग उदास झाले. तिला आपला स्वतःचा देह त्याग करावासा वाटला. परब्रह्मात विलीन होण्यापूर्वी ती आळंदीहून निघून फिरत फिरत तापी तीरावरील सोमेश्वर (कोथडी, ता. एदलाबाद) येथे आली. वैशाख वद्य द्वादशीच्या दिवशी मध्यान्ही एकाएकी अदृष्य झाली. कोथडी, ता. एदलाबाद येथे आजही तिची समाधी आहे. तिथे दरवर्षी मोठी यात्रा भरते.

चांगदेव :

"चांग्या कोरा रे कोरा" म्हणून अहिराणी जनमानसात स्थान मिळविलेला एक महाराष्ट्रीयन हट योगी. कान्हदेशातील एदलाबाद तालुक्यातील चांगदेव या गावी त्याचा जन्म झाला. या गावाला पूर्वी सुंदर पूरम असे नाव होते. सध्या चांगदेव गावी चांगदेवाचे देऊळ आहे. गोदावरीतीरी पुणतांबे या गावीही त्यांची समाधी आहे. हा दर १०० वर्षांनी योग सामर्थ्याने देह टाकून नवा देह धारण करीत असे, असे सांगण्यात येते. त्याने "तत्त्वसार" ग्रंथ लिहिला आहे. एकूण त्याची १४ समाधी स्थळे व १४ नावे अलग अलग आहेत. त्यापैकी चांगावटेश्वर चक्रपाणी ही दोन नावे होत.

**भास्कराचार्य :**

खान्देशाचे नाव जगात आपल्या विद्वत्तेने अमर करणारा महामानव असाच श्री भास्कराचार्य यांचा उल्लेख करावा लागेल. जगविख्यात भारतीय गणित व ज्योतिष शास्त्रज्ञ. हा सह्य पर्वताजवळच्या बिज्जल बीड गावी रहात असे. हे गाव हल्ली खान्देशातील चाळीसगाव तालुक्यातील पाटण गावाचे आसपास असावे असा तर्क तेथील शिलालेखावरून तज्ञांनी केला आहे. त्याचे सिद्धान्त शिरोमणी व करण कुतुहल हे दोन ज्योतिष गणित ग्रंथ आहेत. शिवाय वासना भाष्य हा टीकाग्रंथ आहे. भास्कर व्यवहार व विवाहपटल हे ग्रंथही त्यांचेच असावेत. पहिला ग्रंथ त्याने शके १०७२ साली आपल्या वयाच्या ३६ व्या वर्षी लिहिला व दुसरा वयाच्या ६९ व्या वर्षी लिहिला. सिद्धान्त शिरोमणी ग्रंथाचा पहिला खंड 'पाटीगणित' किंवा 'लिलावती' हा अंकगणित व महत्त्वमापन यावरील स्वतंत्र ग्रंथ आहे. दुसरा खंड बीजगणित यात एकवर्ण समीकरण, अनेकवर्ण समीकरण, एकानेकवर्ण समीकरण, वर्णादी समीकरणे इत्यादी विषयांचा समावेश आहे. गणित अध्याय,गोलाध्याय, यात ज्योतिष शास्त्र आहे. पहिल्यात ग्रह गणित हा विषय आहे. दुसऱ्यात ग्रहगणितातील सर्व विषयांची उत्पत्ती, त्रैलोक्यसंख्यावर्णन, यंत्राध्याय, इत्यादी अनेक विषयांचा समावेश आढळतो. सिद्धान्त शिरोमणी हा शतक उत्कृष्ट ग्रंथ आहे. या ग्रंथावरून भारतीय ज्योतिष शास्त्रासंबधी संपूर्ण माहिती कळते. करणकुतुहल ग्रंथात अहर्गण्तवरून मध्यम ग्रहसाधन केलेले आहे. या ग्रंथाची फारशी व इंग्रजीत भाषांतरे झालेली आहे. पाटण, तालुका चाळीसगाव येथे यांचे नावाचा एक शिलालेख आहे.

**नारायण व्यास बहालिये :**

खान्देशातील बहाळ, तालुका चाळीसगांव हे ह्याचे जन्मगाव. गिरणातिरावरील उल्लेखनीय कवी. त्याने "श्री ऋद्धिपूर वर्णन" नावाचा ग्रंथ लिहिला आहे. हा ग्रंथ महानुभावाच्या "साती ग्रंथा" पैकी एक ग्रंथ मानला जातो. बहाळ गावावरून बहालिये या आडनावाने ओळखला जातो. या ग्रंथाच्या सातव्या प्रकरणात त्याने "स्वात्मनिरोपण" (ओवी ३१ ते ४३) केले असून त्यात नमूद केल्याप्रमाणे त्याचे पूर्वायुष्य अनाचाराने व हिंसेने डागाळलेले दिसते. नारोबासाचे वडील खान्देशातील बहाळ या गिरणेच्या उत्तर तीरावरील गावाच्या अधिष्ठात्या राजाचे पुरोहित असून त्यांच्या ज्योतिष नैपुण्यामुळे राजाची त्याच्यावर विशेष मर्जी होती. त्यामुळे इतर ज्योतिर्विद त्याचा द्वेष करीत. "जो मेणाची मेख खडकात गाडून दाखवीन तो खरा ज्योतिषी, इतर सारे ज्योतिषी व्यर्थ होत" अशी त्याने एकदा दरबारात प्रतिज्ञा केली. मात्र ती तो सिद्ध करू शकला नाही. कारण त्याच्या शत्रुंनी कपटकारस्थान करून राजसेवकाला लाच देवून वश करून घेतले. ज्या क्षणी ती मेख

ठोकावयाची होती तो "मुहूर्ताचा क्षण" राजसेवकाने चुकवला. प्रतिज्ञा भंगाच्या परिणामापायी नारोबासाच्या पित्यास प्राणास मुकावे लागले. त्यावेळी नारोबास आपल्या आईच्या गर्भात होते. पुढे ते जेव्हा १२ वर्षाचे झाले तेव्हा त्यांना आपल्या आईकडून पूर्ववृत्तांत कळला. तेव्हा त्यांनी आपल्या पित्याच्या वधाचा सूड घेण्याची प्रतिज्ञा केली. त्यासाठी बंगाल देशात जावून तेथे "बंगाली विद्या" (मंत्र+तंत्र, ई.) शिकून परत आले. नंतर त्यांनी आपली प्रतिज्ञा पूर्ण केली. पण या सर्व गोष्टींबद्दल त्यांना पश्चाताप होवून त्याने 'अचल मालोबास' या महानुभाव आचार्याकडून पंथाची दिक्षा घेतली व महानुभाव पंथ स्विकारला. विश्वनाथ बास यांच्या सांगण्यावरून नारोब्यास यांनी शके १२८५ त "ऋद्धीपूर वर्णन" हा काव्यमय ग्रंथ लिहिला. डॉ. श. गो. तुळपुळे यांच्या मते हा ग्रंथ १२५३ मध्ये लिहिला असवा [ काही तज्ञांच्या मते याचा लेखनकाळ शके १३३५ (इ. स. १४१३) होय. ] या ग्रंथाची ओवी संख्या ६४१ आहे. ग्रंथ केवळ वर्णन-पर नसून त्यात काव्य भक्ती, तत्त्वज्ञान, श्री. गोंविदप्रभू स्तुती, ऋद्धिपूर महात्म्य या विशेष गोष्टींचा त्यात संगम झालेला आढळतो. हा ग्रंथ समविषय काव्य-ग्रंथात सर्वश्रेष्ठ असून महानुभावाच्या "साती ग्रंथा" मध्ये त्याचे स्थान वैशिष्टयपूर्ण आहे.

**महालिंगदास :**

'अहिरराव' हे क्षत्रीय आडनाव व घराण्यात 'पाटीलकी' **असणारा** हा व्यावहारिक 'मराठा' कवी, वाडे (गुढे), तालुका भडगांव या खान्देशातील **गिरणा** नदीच्या दक्षिण तीरावरील गावी १६०० व्या शतकात जन्माला आला. त्याच्या वडिलाचे नाव विक्रमदेव असे होते. 'वाडे' गावाचा कवीला फार अभिमान होता. त्याला त्यानी गहन, थोर, पवित्र अशी विशेषणे लावली आहेत. त्यांच्या नावावर (१) पंचोपाख्यान, (२) सिंहासन बत्तिशी, (३) वेताळ पंचविशी, (४) चाणक्य निती, (५) विक्रम-बत्तिशी व (६) शालीहोत्र अशा ग्रंथांची नोंद आहे. पैकी पहिले पाच कथारूप आहेत. त्याला कथा निवेदनाची आवड होती. तो वेसदेव परंपरेतील आहे. त्याचे वाङ्मय अद्याप अप्रकाशित आहे. महालिंगदास व त्यांची ग्रंथरचना या विषयीची माहिती महाराष्ट्र सारस्वतकार वि. ल. भावे व त्यानंतर कै. ल. रा. पांगारकरांनी मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड २, पृष्ठे ५८५ ते ५८८ मध्ये दिली आहे. हा कवी पुढे महानुभाव पंथात शिरला असावा. 'पंचोख्याने' संपादक वि. भि. कोलते, प्रस्तावना, पृष्ठे ३२ ते ३६ यात ही बरीच माहिती मिळते. त्यांच्या ग्रंथात खान्देश-ची बोलीभाषा (अहिराणी), खान्देशाच्या सामाजिक, धार्मिक परिस्थितीचे वर्णन केलेले आहे. अहिराणीच्या खुणा त्यात सापडतात. पंचोख्यानात तो म्हणतो— **"संस्कृत नकळे, आरजा जना। म्हणोनी मराठी केली रचना। ते आणिजे मना · बांध जनी।।,"** संस्कृत न जाणणाऱ्या लोकांसाठी मराठी रचना करीत आहे.

## अर्वाचीन युग

अर्वाचीन काळाचा इतिहास सांगताना एक खान्देशपुत्र देवकीनंदन सारस्वत आपल्या कवितेत बरच काही सांगून जातात—

'ती साने गुरुजींची गाणी । ती बालकविची फुलराणी ।
केशवसुत, बहिणाई, तिवारी स्फूर्ती आम्हाला देती ।।
ही खान्देशची माती, मातीतून पिकती मोती ।।'

खान्देश समृद्ध, सकस मानवी मुल्यांना जोपासणाऱ्या साहित्यलेखनाने पावन झाला आहे.

### केशवसुत :

कृष्णाजी केशव दामले, भडगांव, जि. जळगांव येथे शिक्षक होते. भडगाव-फैजपूर येथे वास्तव्य. क्रांती काव्याची तुतारी फुंकून मराठी कवितेला सामाजिक जाणीवाचे भान देणारे आधुनिक कवितेचे जनक, अग्रदूत कवीकुलगुरु येथे अनेक वर्ष होते—

" मी संध्यासमयी खुशाल गिरणा तीरावरी बैसुनी ।
कालक्षेप करीन उन्मन असा वेडयापरी गाऊनी ।।"

असा भडगांवच्या गिरणा नदीचा त्यांनी आपल्या कवितेत उल्लेख केला आहे.

### बालकवि ठोंबरे :

त्र्यंबक बापुजी ठोंबरे यांचा जन्म धरणगाव, तालुका एरंडोल येथे १३ ऑगस्ट १८९० रोजी झाला. १९०७ साली जळगाव येथील कवी संमेलनात 'बाल कवी' पदवी मिळाली. बाल कविची नितांत सुंदर, अम्लान, भावगर्भ अशी निसर्ग कविता चंद्रकोरी प्रमाणे या जिल्हयात वृद्धींगत होत गेली व कविता फुलांचा गंध महाराष्ट्रात पसरला. एरंडोल, यावल, जामनेर येथे वास्तव्य करून मे १९१८ मध्ये भादली, तालुका जळगांव येथे रेल्वेखाली अपघाती निधन झाले.

### नारायणराव फडणीस :

नानासाहेब फडणीस नावाने प्रसिद्ध. 'काव्य रत्नावली' हे कवितेला वाहिलेले मासिक प्रथमच काढले. अर्धे शतक महाराष्ट्रात काव्यक्षेत्रात मोलाची कामगिरी केली. विशिष्ट ध्येय निष्ठेने प्रेरीत होवून 'दोन लाख' मराठी कविता छापल्या व तापी तीरावर मराठी काव्याची जोपासना करून संवर्धन केले. हे कवीही होते. यांची नोंद मराठी साहित्य इतिहासात झालेली आहे.

**दु. आ. तिवारी :**

'मराठ्याचे संग्रामगीते' स्फूर्ती प्रसंग जीवंत करणारे स्वतःच्या उच्च आवाजात गाणारे दुर्गाप्रसाद आसाराम तिवारी, धरणगांव येथील रहिवासी होते. मुक्ताई परंपरेतले अभंगमालाकर्ते आधुनिक कवी, काही दिवस शेंदुर्णी येथे रहात असत.

**बहिणाबाई चौधरी :**

शाळेची पायरी न चढता अहिराणी बोलीतून रसाळ कविता लिहिणारी बहिणाबाई असोदा येथे जन्मली व जळगावला सासरी राहिली. खान्देशची माती-माणसे हवामान-पाऊसपाणी-पिके, झाडे-झोपड्या, रस्ते-वाटा, माड्या-बंगले, जनजीवन-रुढी, परंपरा, सण-उत्सव, ऋतुमान याच्या माध्यमातून मानवी मुल्यांचे संदेश सोप्या भाषेतून देत येथूनच त्यांची कविता महाराष्ट्रात सर्वमुखी झाली.

**साने गुरुजी :**

मातृहृदयाचे थोर कवी पांडुरंग सदाशिव साने, अमळनेर (जिल्हा जळगांव) येथे रहात होते. मुलासाठी गोष्टीची पुस्तके लिहली. 'पत्री' काव्यसंग्रह 'खान्देशचे स्तोत्र' ५८ श्लोकांत लिहले. त्यांच्या कल्पना व भावनामध्ये खान्देशचा श्रमीत त्यागाचा आनंद मानणाऱ्या परोपकारी सेवाभावी स्नेहशीलता, कर्तव्य हीच जीवन-शक्ती, खान्देशातील भक्ती, पराक्रम या संस्कृतीचे दर्शन घडते.

खान्देशच्या काळ्या मातीत पिकाबरोबर साहित्यही फोफावले आहे. आजही साहित्य गंध या मातीत दरवळतो आहे. कित्येक साहित्यिक मराठी शारदेच्या अंगणी नाचून नाचून दमले आहेत, श्रमले आहेत, दमछाक झाले आहेत. पायांना छाले आले, शेवटी मेले. तर माझ्यासारखे एक वेगळी चाल घेवून पाऊले टाकीत आहेत. त्या पाऊलांना आता रट्टे-घट्टे पडत आहेत. स्थळकाळ परत्वे, नकळत काही मान्यवर दिवगंत साहित्यिकांची इतिहासात नोंद घेतली गेली नसेल तर वाचकांनी 'न्युनते पुरते' करून घ्यावे व लेखकास, संशोधकास क्षमा करावी, ही विनंती.

● ● ●

# 'अहिराणी बोली लोक साहित्यात आली'

जगात माय अन् मायबोली इतर कोणत्याही गोष्टींपेक्षा प्रत्येकाला जीवापाड आवडते. मायबोली ही बोली भाषाच असते. जळगांव, धुळे, नासिक जिल्ह्याची मायबोली अहिराणी आहे. जगप्रसिद्ध भाषातज्ञ "सर जॉर्ज ग्रिअर्स" ने नमूद केलेल्या भारतातील ८७२ बोलीभाषा व उपभाषांपैकी अहिराणी ही एक जुनी बोलीभाषा आहे. ती महाराष्ट्रातील प्रमुख बोलींपैकी एक आहे. अहिराणी माझी भाषा आहे असे स्वाभिमानाने सांगणाऱ्यांची संख्या अगणित आहे.

अहिराणी बोली भाषेचा इतिहास सांगावयाचा म्हणजे जरा अवघड गोष्ट आहे. कारण इतिहास म्हटला की, त्यात विधाने ही आलीच. विधाने मांडतांना त्याला मताची पुष्टी द्यावी लागते. त्यासाठी विचार मंथन होणे आवश्यक असते. अहिराणीची बखर. . . दस्तूर खुद्. . . कोण हा शोध आम्हास अद्याप लागावयाचा आहे. या बोलीचे एक स्वतंत्र कसब आहे. या बोलीचा उद्गम, विकास, इतिहास, स्वरूप, भौगोलिक वैशिष्टये, त्यातील व्याकरण इत्यादिंचे अजून अभ्यास संशोधन झालेले नाही. तथापि अहिराणी बोली व लोक साहित्याची इतिहास परंपरा या विषयी काही पाश्चिमात्य पौर्वात्य संशोधकांनी आप-आपली मते प्रकट केलेली आहेत. थोर विचारवंत व अभ्यासक यांनी बोली विषयक विचारांची गुंतागुत, उकल प्रखरपणे मांडून विस्तृतपणे वाचकांचे समोर मांडले आहेत. खान्देशाची ही बोली, अहिराणी भाषा अतिशय मधाळ, रसाळ आहे. तिच्यात उदंड लोकगीते, ओव्या, म्हणी, वाक्प्रचार, गाणी, उखाणे भरलेली आहेत. भावनिक अभिव्यक्ती ही बोली अत्यंत प्रभावीपणे करू शकते. या लोक साहित्यात समाजजीवन सामावलेले आहे. अहिराणी भाषा आंतरिक जिव्हाळा प्रेम यांचे प्रकटीकरण समर्थपणे करते. तिच्यातील शब्दसंपदा समृद्ध आहे. ती विविध अंगाने नटलेली फुललेली आहे. म्हणून आजवर टिकून राहिलेली आहे. तिच्या शब्दा-शब्दात वाक्या-वाक्यांत आशय घणता आढळते. उपमा-उत्प्रेक्षा, दृष्टान्त, कल्पना आदी अलंकारांनी ती सजलेली असल्याने संशोधन संकलनाचे काम मनोरंजक व उद्बोधक वाटते.

अशा या अहिराणी भाषेविषयी काही संदर्भ पहाणे उचित वाटते. डॉ. श्री. व्य. केतकर महाराष्ट्रीय ज्ञान कोश, शरीर खंड, विभाग सातवा (अ), पृष्ठ ६८२-६८३ वर नमूद करतात, "खान्देशी अथवा अहिराणी भाषा जरी गुजराथी सारखी किंवा मराठी सारखी दिसते तरी ती मागधी, सौराष्ट्री, शौरसेनी, महाराष्ट्री, पैशांची इ. प्राकृत भाषांमधून निघाली आहे." डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांच्या महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, सदाशिवपेठ, पुणे-३० तर्फे प्रकाशित "मराठी विश्व कोश", खंड १, पान ६८७ वर असे

नमूद केले आहे. " महाराष्ट्रात—धुळे, जळगांव व नासिक या जिल्ह्यांत बोलली जाणारी ही एक भारतीय आर्य बोली आहे. तिला खान्देशीही म्हणतात. मराठीची पोटभाषा म्हणून समजली जाणारी ही बोली " गिअर्सन् " च्या मते एक भिल्ली बोली असून त्याने " लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया " च्या नवव्या खंडाच्या तिसऱ्या भागांत इतर भिल्ली बोली बरोबर ती दिली आहे. भारतीय जनगणनेच्या भाषा विषयक खंडात अजूनही हीच प्रथा पाडण्यांत आली आहे. अहिराणीची काही वैशिष्टये ही मराठीहून पूर्णपणे भिन्न असून काही बाबतीत ती मराठीशी व काही बाबतीत गुजराथीशी मिळती जुळती आहेत. या बाबतीत आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही. कारण या दोन मोठ्या भाषांच्या दरम्यान पसरलेली ही एक संक्रमक बोली आहे. तिच्यात आढळणारे, अनेक संस्कृतेतर शब्द खान्देशी लोक पूर्वी कोणीतरी आर्येतर (उदा.आस्ट्रीय वंशीय) भाषा बोलत असावेत असे दर्शवितात. अहिराणी भाषिकांची संख्या सन १९६१ च्या जनगणनेप्रमाणे ३, ६७, ४७२ अशी होती. परंतु हा आकडा ग्राह्य मानता येत नाही कारण घरांत अहिराणी बोलणारे सुशिक्षित लोक आपली भाषा मराठी आहे असे सांगतात. त्यामुळे अहिराणी बोलणारे बरेच अधिक असावेत असे वाटते."

" खान्देशी बोली भाषा अहिराणी ही वर करणी संस्कृत, मराठी, गुजराथी या भाषेच्या सहयोगाने पुढे आली असली असे असले तरी तिच्यातील धातु नामे पाहाता ती प्राकृताच्याही पूर्वीची बोली भाषा आहे असे वाटते." अहिराणी बोलीचा निर्लेप मनाने अभ्यास केल्यास ती कल्पनेपेक्षा अद्भूत असून मनाची शेवटपर्यंत पकड घेते. अहिराणी बोलीतील लोक साहित्य हे अर्थशुद्ध आहे. कागद काळे करणारे नसून ते टिकावू साहित्य आहे.

अहिराणी बोली भाषेच्या प्रदेशाचा आपण विचार केल्यास जळगांव, धुळे, नासिक व ब्ऱ्हाणपुरचा काही भाग चटकन आपल्या डोळ्यासमोर येतो. त्यांतही स्थळपरत्वे फरक जाणवतो. " दर बारा कोसांवर भाषा बदलते " या तत्वास अनुसरून हेल, उच्चार यांच्यात किंचित फरक जाणवतो. पूर्व खानदेशात " खेवाये " शब्द पश्चिमखान-देशात 'रवाये' या उच्चाराने वापरला जातो. दोघांचा अर्थ एकच 'खेळवित आहे' धुळे जिल्ह्यात तळोदे, शहादा, नंदुरबार, नवापूर येथील अहिराणीवर 'गुजरात राज्य' सानिध्यामुळे गुजराथीची दाट छाया पडली आहे. 'रवाये' म्हणजे 'केम रमता नथी' यातील 'रमता' वरून अपभ्रंश अहिराणीत आला आहे. धुळे जिल्हा तापी काठांवरील लोकांचे उच्चार सूर वेगळेच असतात. वन्हया, पन्हया, सुक्कयना इत्यादी शब्दाच्या, उच्चारावरून आपणास जाण येते. जळगांव जिल्ह्यात रावेर, यावल, जामनेर हे तालुके वऱ्हाड (विदर्भ) शी जोडून असल्याने तेथील सीमावर्ती अहिराणीवर वऱ्हाडी बोलीचे पडसाद उमटलेले आढळतात. खास करून लेवा पाटीदाराची जी पांझणी उर्फ पांजनी बोली आहे. तिचेही परिणाम आढळतात. तुहे, माहे, काबे, 'तुह्या लेवं हूँ', इत्यादीच्या उच्चारावरून ते जाणवते. चाळीसगांव, मालेगांव, बागलाण, सटाणा हे नासिकला

जवळ असल्याने कोकणीची छाप अहिराणीवर आढळते. अमळनेर, चोपडा, पारोळा एरंडोल, पाचोरा, धुळे, शिंदखेडा, शिरपूर या तालुक्यात शुद्ध अहिराणी अस्तित्वात आहे असे तज्ञ म्हणतात. वरील सर्व प्रदेशाला मिळून 'आभिर' म्हटले गेले आहे.

आभिर ही एक प्राचीन भारतीय जमात. तिचा तपशीलवार सुसंगत इतिहास जुळविण्या-इतका भरभक्कम पुरावा आज उपलब्ध नाही. तथापि, शिल्पलेखांचा आधार व साहित्याचा समुच्चय इतिहासांत अंतर्भूत असतो. 'ऑरकियालॉजिकल सर्व्हे' व उपलब्ध नोंदीचे अभ्यासू व्यक्तीने परिशिलन केल्यास पूर्वग्रह आपोआप दूर होवून इतिहासाचे सम्यक ज्ञान प्राप्त होते. त्याप्रमाणे प्राचीन साहित्यातील व कोरीवलेखां-वरून काही महत्त्वाची माहिती हाती लागते. केवळ कोरीव लेखांचा पुरावा ग्राह्य धरला तरही जमात इसवी सनाच्या पहिल्या व दुसऱ्या शतकापासून चौथ्या शतकापर्यंत भारतातील राजकीय उलाढालीत सक्रीयपणे सहभागी होती असे दिसते. खान्देशात तर अभिरांचे राज्य १३ व्या शतकापर्यंत टिकून होते. महाभारत, पुराणे वगैरे मधून मिळणारा पारंपारिक इतिहास लक्षात घेतला तर अगदी भारतीय युद्धाच्या काळापासून 'आभिर ही एक राजकीय शक्ती होती असे दिसते. पौराणिक साहित्याच्या जोडीला पतंजलीच्या महाभाष्यासारख्या ग्रंथातही आभिरांचा उल्लेख येतो. 'आभिर' या मूळ संज्ञेची विविध अपभ्रष्ट रूपांतरे 'पेरिप्लस ऑफ दी इरीथ्रिअन्सी', 'बायबल' आणि 'टालेमीचे लेखन' यांतून येतात. ही जमात भारताच्या वायव्येकडून हेरात आणि कंदहारच्या बाजूने, प्रथम पंजाबात आली असावी. अभिरांच्या द्वेषामुळे सरस्वती नदी विनशत येथे अदृश्य झाली असे महाभारतात म्हटले आहे. त्यानंतर आभिरांनी सध्याच्या सिंध, गुजराथ, राजस्थान, महाराष्ट्र वगैरे प्रदेशातून वस्ती करून राजसत्ताही स्थापली असावी.

कांही पुराणातून दहा आभिर राजांनी ६७ (काहीच्या मते १६७) वर्षे राज्य केले असे म्हटले आहे. पण त्यांची नावे दिली नाहीत तिसऱ्या व चौथ्या शतकात आभिरांचे उत्तर कोकणात व नासिक प्रदेशात राज्य होते. समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद येथील स्तंभ लेखावरून त्याने आभिरांना जिंकले होते असे दिसते. नासिक येथील शिलालेखात शिव-दत्तपुत्र ईश्वरसेन याचा उल्लेख आहे. त्याने २४८/२४९ मध्ये एक संवत स्थापन केला होता असे दिसते. त्याला पुढे कलचुरी किंवा चेदिसंवत असे नाव पडले.

अभिरांना काही ठिकाणी क्षत्रिय म्हटले आहे तर अनेक ठिकाणी त्यांची शूद्रातही गणना केलेली आहे. सर्व सामान्यत: आभिर हे गो-पालन व कृषी व्यवसाय करीत असत. त्यांच्यापैकी काही लुटालुटी व दरोडेखोरीही करीत असावेत. संध्याचे अहिर हे प्राचीन आभिरांचे वंशज आहेत. धुळे जिल्ह्यातील साक्री, नंदुरबार तालुक्यातील संध्या अहिराणी बोलणाचा काही जातींना अहिर म्हणून निर्दिष्ट करतात. हेही या संदर्भात लक्षात ठेवणे जरुरीचे आहे. हे कृष्णाला देव मानतात

(तथापि यादवाच्या अंतानंतर कृष्णाच्या स्त्रियांना घेवून जाणाऱ्या अर्जुनावर आभिरांनीच हल्ला करून त्या पळविल्या होत्या अशा पौराणिक कथा आहेत.)

आभिर हे प्रदेश नामही होते. मुळात हा प्रदेश निश्चितपणे कोणता हे खात्रीने सांगता येणार नाही. परंतु साहित्यातील बरेचसे निर्देश हा भारताचा पश्चिम भागातला एक प्रदेश असावा असे सूचवितात. टॉलेमीच्या भूगोलात उल्लेखिलेला सिंधच्या नैऋत्य भागातील "अबिरिया" म्हणजे आभिर देश असण्याचा बराच संभव आहे. मध्य प्रदेशातील सध्याच्या रेवा जिल्ह्यात रेवा नदीकाठी "आभिरपल्ली" नावाचे एक गाव होते. हेही या संदर्भात लक्षात घेण्यासारखे आहे. [टॉलेमी (Ptolemy) जग–प्रवासी इ. स. १५०.]

पूर्वापार सांगितला गेलेला इतिहासच सत्य असावा हा निव्वळ बुद्धीभ्रम आहे. त्याकरिता सत्याच्या मुळाशी जाणे व असत्य घटनांची चिकित्सा करून वस्तुस्थिती सार्वजनिक म्हणून जनमानसासमोर मांडणे हे इतिहासकाराचे आद्य ध्येय असते ही स्थायी अपेक्षा अनुसरून "आभिर" यांचे पुढे "अहिर" झाले. अहिर हा अपभ्रंश होय. अन् अहिराची जी बोली ती अहिराणी होय. उगम कालापासून अहिराणी आजतागायत बोलीच्या स्वरुपात असल्याचे आढळते. तिचे मूळ रुप, विकास, आजचे स्वरुप याविषयी प्रमाणित अनुमान, विधाने आज उपलब्ध नाहीत. "खान्देशी भाषा" असेही तिचे दुसरे नाव प्रचलित आहे. हे नाव सुमारे १५० वर्षापूर्वी पडले असावे. तिच्यात काही शब्द भरला. हा गुजराथीचा असल्याने तिला "धेडगुजरी" असेही संबोधले गेल्याचा पुरावा मिळतो. सुरवातीचे नाव आहे "अभिराणी", अलीकडे तिला अहिराणी हे नाव प्राप्त झालेले असून त्याच नावाने ही बोली भाषा सर्वदूर भाषेच्या प्रांतात ओळखली जाते. अहिराणी हा आभिरी या शब्दाचा अपभ्रंश आहे. "आभिर" लोकांची जी भाषा ती "आभिरी" उर्फ "अहिरी" अन अभिरी म्हणजेच "गवळी" लोक. गवळी म्हणजे हल्ली समाजात असणारी "गवळी" जात नव्हे. गवळी म्हणजे त्या काळी जे कोणी गाई, गुरं पाळण्याचा धंदा करीत होते ते लोक होत. ते "आभिर" जी भाषा बोलीत असत तीच "आभिरी" भाषा होय. आभीरच्या जागी 'अभिल्ल' असे नामाभिधान करून खान्देशला "अभिल्ल देश" व खान्देशी भाषेला "अभिल्लाणी" असेही कोणी कोणी म्हणतात. परंतु हे मत इतिहास मान्य नाही. कारण खान्देशावर अनेक वर्षे "अभिर" राजांनी राज्य केले. याचा पुरावा इतिहासात सापडतो. सुरसेन देशातील भाषेला शौरसेनी म्हणत त्याप्रमाणे "आभिर" देशातील लोकांच्या भाषेला "आभिरी" उर्फ अहिराणी म्हणतात. कोणी कोणी "अहिर" या शब्दाचा अर्थ "नाग" यापासून निघाला आहे असे समजून "अहिर" ही नाग लोकांची भाषा आहे असे समजतात. पण हे म्हणणे चुकीचे आहे. कारण "आभीर" हा संस्कृत शब्द आहे अन् त्यातून "अहिर" रूप तयार झाले आहे. तेव्हा संस्कृत "अहि" म्हणजे नाग ह्या शब्दापासून प्राकृत "अहिर" झाला असे म्हणणे चुकीचे आहे.

आभिर देशवाचक, लोकवाचक नाव आहे. ते जाती वाचक नाही. हे नाव महाभारत, रामायण व इतर अन्य पुराणात आढळते. महाभारताचा काळ इसवी सन पूर्व ३००० वर्ष असा आहे. कृष्णदेवाने ज्याठिकाणी बालपण घालविले तो राजानद हा "गोप" राजा होता. सौतीकृत महाभारत व व्यासकृत महाभारत यांच्या उपसंहारात भारताचार्य वैद्य ह्यांनी मान्य केले आहे. गोकुळात मोठ्या प्रमाणात उलथापालथ व्हावयास लागली त्या वेळेस हा नंदाचा गौळीवाडा वृदावनास आला असे वर्णन "हरीवंश" यात आढळते. या यादवांच्या बरोबर मत्स्य, विराट, आवर्त, अभीर, गोप आले व ते पुढच्या काळात "मावळ" प्रांतात व दख्खनच्या बाजुला पसरले. "गोप" हे क्षत्रीय असल्याचा पुरावा आपणास "हरीवंश" यात आढळतो.

आर्यावर्तात सर्वाधी सूर्यवंशी व चांद्रवंशी आर्यांनी वस्ती केल्याचा पुरावा ऋगवेदात सापडतो. ह्या चांद्रवंशीयाचा मूळ पुरुष "इलबर्वा म्हादला" "चंद्र" हा होता. त्याचा मुलगा "बुध" याला देव म्हणत होते. बुधच्या सुनेचे नाव "इला" असे होते. हिमालयाच्या पलीकडे हेमकुट नावाच्या पर्वताच्या बाजुला "इलावर्ष" हा देश होता असे महाभारतात नमूद केलेले आढळते. ह्या इलाराणीचा मुलगा "पुरुरवा" हा चंद्रवंशाचा पहिला राजा समजला जातो. त्याची पत्नी ऊर्वशी होती. पुरुरवाचे नाव व्हपा असेही होते त्याचा पुत्र ययाती होय. वृषवर्षा असुरराजाची कन्या र्शामिला व असुरांचा गुरु शुक्राचार्याचा मुलगा देवयानी ह्यांचा विवाह झाला होता. ययातीला पाच मुले होती. ते सूर्यवंशी राज्याच्या काळात गंगा व सरस्वती नदीच्या खोऱ्यात आले. ते आले त्यावेळेस सूर्यवंशी आर्यापेक्षा चंद्रवंशीय आर्य यांची भाषा भिन्न होती. ययातीचे ऐकले नाही म्हणून त्याने आपला मुलगा "यदु" याला शाप दिला व त्यावरून यदूची राजगादी गेली व त्याला गाई गुरढोर बाळगून सांभाळून रहावे लागले. तेच गवळ्याचा धंदा करणारे यादव होत. क्षत्रीय यादव होत. "गोपही गाणे गात फिरे" गोप ही जात नसून यादवांना शापामुळे वाटचास आलेला धंदा होता. अशी झाली "आभिर" यांची उत्पत्ती मनुस्मृती, ब्रम्हपुराण व भागवत आदी पुराणे वेगवेगळ्या कथा सांगत असले तरी "आभिर" यांचा धंदा याबाबत सर्वत्र एकमत आढळून आले आहे. फार फार वर्षापूर्वी आभिर लोकांची अहिराणी ही भाषा होती. भारतीय युद्धात भाग घेतल्याच्या उल्लेखावरून आभिर सिंधुतीरी राहत होते. ते लढवैय्ये होते. वायु, मत्स्य, ब्रह्म पुराणात तस उल्लेख आढळतो. आभिर देश नेमका कुठे होता याबाबत तज्ञांमध्ये एकमत नाही. यादवाची पहिली वसाहत सुरसेन या देशात होती. कृष्णाचा चुलत मामा कंस हा शूरसेनचा राजा होता. हस्तिनापूर-मरू-सौवीर-आन असा प्रवास हळूहळू करीत करीत आभिर सरस्वती व रेवा नदीच्या काठाकाठाने खाली उतरले. "आभिर" नावाचा बलाढ्य लोकसमूह व राजवंश फार प्राचीन काळापासून खान्देशात रहात होता. असा उल्लेख अनेक ग्रंथामधून व उपलब्ध शिलालेखांमधून आढळतो. महाभारताच्या भिम

पर्वात देशाची जो यादी दिलेली आहे त्यात " वाल्हिका वाटघाताश्च अभीरः कालतोयकः " असा उल्लेख आढळतो. रामायणातही आभिर प्रदेशाचा म्हणजे खान्देशाचा " कृषिक " या नावाने उल्लेख आढळतो. वायु पुराणात आभिर असं नाव दिलेलं नसलं तरी ज्या देशाच वर्णन त्यात आहे ते तंतोतंत खान्देशलाच लागू पडते. ब्रम्हपुराणात " आभीराः रूदचौषिका ' असे म्हटले आहे. आभिर देश उत्तर बाजुला होता असे पद्मपुराण व मत्स्यपुराणात म्हटले आहे. आजचा भूगोल पाहाता वरील वर्णनावरून आभिर देश हाच आजचा खान्देश आहे याला सबळ पुरावा मिळतो. आभिर अतिप्राचीन लोकसमुह असल्याचे इतिहासकारही मान्य करतात. आर्यपूर्व काळात अभिरांची वस्ती होती. आर्यांच्या आगमनानंतर वर्ण, जाती यांचा उदय झाला. आभिर लोकसमूहावर आर्यांची जीवन पद्धती, रूढी, परंपरा यांचा परिणाम झाला असावा. खान्देशात ज्या आहिर लोकांची वस्ती होती ते शुद्ध अहिर होते. आभिरपासून अहिर शब्दांची व्युत्पत्ती झाली असे प्रा. कृ. पां. कुळकर्णी यांचे मत आहे.

ज्यावेळी श्रीकृष्ण दख्खन बाजुला आले त्यांचे बरोबर आभिरही इकडे आले. हळूहळू काठेवाड, भडोच, सुरत, नवापूर या मार्गे खान्देशांत उतरले. हे व्हावयास सुमारे ५००० वर्षे लागलीत. अभिरसेनी उर्फ अभिराणी हीच अहिराणी भाषा होय. आजही खान्देशात अहिरसोनार, अहिरशिंपी, अहिर-ब्राम्हण, अहिर कुणबी अशा जाती सापडतात. अहिरराव, अहिरे अशी कुळे आजही विविध जातीत आढळतात. खासकरून क्षत्रीय मराठा जातीत आढळतात. अहिराणीची कूळपरंपरा शोधतांना या गोष्टीकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. आभिर हे बाहेरचे की, भारतातील याबाबत संशोधकात व इतिहासकारांमध्ये मतभेद आहेत. बेबर, टॉलेमी, डॉ. भांडारकर यासारखे इतिहास संशोधक त्यांना परकीय मानतात प्रा. कृ. पां. कुळकर्णी व एन्थोव्हेनच्या मतेही अहिर हे शक हुणांप्रमाणे परकीय असून बाहेरून भारतात आले. तर डॉ. सरकार, डॉ. केतकर, डॉ. सिद्धेश्वर शास्त्री, चित्राव यासारख्या संशोधकांनी त्यांना भारतीय मानले आहे. डॉ. केतकर त्यांना द्रविडवंशीय मानतात.

प्राचीन साहित्यात या आहिर लोकांची नामांतरे खालीलप्रमाणे आढळतात. (१) टॉलेमी-अबिरीय, (२) पेरिप्लिस-अबेरीय, (३) बायबल-ओफिर, (४) वायुपुराण-अभिर डॉ. सरकार यांचे मते आभिर लोक हे मूळचे वायव्य हेरांत आणि कंदाहार यांच्या दरम्यान-च्या "अबिरवन" स्थानी राहणारे होते. सिंधू नदीच्या पश्चिमेस वायव्य भारतात हे लोक राहात असल्याचा निर्देश टॉलेमीच्या ग्रंथसंग्रहात आढळतो. शक लोकांसमवेत अथवा त्या आधी थोडे दिवस (ख्रिस्त शक पूर्व २०० इ. स. पूर्वी २रे शतक) हे भारतात आले. आणि पंजाबातील हिस्सार जिल्ह्यामध्ये आपली आद्यवसाहत त्यांनी स्थापली. (आय. एच. क्यू-१-३०२.) उत्तर काळामध्ये भारताच्या उत्तर, पश्चिम आणि दक्षिणेकडील विभिन्न भागांमध्ये अभिर लोकांनी आपली वसाहत स्थापल्याचे विविध ग्रंथ पाहता नोंदीवरून खात्री होते.

ते यदुवंशीय आर्य असावेत कारण ते कृष्णाची पूजा करीत. कन्हेर म्हणजेच कृष्ण व कृष्ण कन्हेर म्हणजेच कान्हदेश—आजचा खान्देश. कानबाई व गौराईचे सण फक्त खान्देशातच साजरे केले जातात. इ. १४ व्या शतकात आभिर लोकांची अन्य एक वसाहत महाराष्ट्रातील खान्देशात असल्याचे तत्कालिन शिलालेखावरून दिसते (एपि. इंडि. २५-२०३). जयसिंह सुरीच्या कुमारचरित मते (इ. स. १३५६) अनहिलवाड येथील चालुक्य राजाने अवंती देश जिंकल्यावर रेवा नदी ओलांडली. गुप्तकाळात शौरसेन प्रांतातले ओहर खाली उतरून खान्देश व बागलाणात स्थायिक झाले. 'रेवा पाटीदार' रेवा नदीच्या काठी १२ व्या शतकात आले. ते पांजणे व रेवा गुजर नावाने प्रसिद्ध आहेत. रेवा नदी ओलांडल्यावर आभिर राजाची राजधानी प्रकाशनगरी (पश्चिम खान्देश, हल्लीच्या धुळे जिल्हयातील शहादा तालुक्यातील प्रकाशे ?) जिंकून घेतली. (डी. एच. एन. आय-२-९८५-९८६.)

अहिराणी ही भाषा आर्योद्भव भाषा आहे. तिच्यातील दिध, लिध, किध ही रूपे शौरसेनी वळणावर आहेत. हिचे पूर्वीचे नाव अभिरोबती अथवा अभिरी अशी संशोधकांनी नोंद केलेली आहे. काही संशोधक आर्यांना यादव वंशीय मानतात. काही आभिर राजांनी राजसत्ता मिळविली असली तरी मांडलिक स्वरूपाची होती. पशुपालन, शेती करण हाच त्यांचा मुख्य व्यवसाय राहिला. शक, हूण, इत्यादिच्या स्वाऱ्यांमुळे ते पंजाब, सिंध, मारवाड, माळवा, मध्य भारत , गुजराथ, नासिक, कोकण, खान्देश अशा अनेकविध प्रदेशांत विखरले गेले असे इतिहास सांगतो. वीरसेन अथवा ईश्वरसेन या 'आभिर' राजाचे वर्चस्व शके ३४१ मध्ये खान्देशवर होते असे नासिक येथे सापडलेल्या शिलालेखावरून स्पष्ट होते.

श्रीकृष्णाच्या काळी यादवाची भाषा कोणती होती याबाबत वाद आहे. यादव हे संस्कृत भाषा बोलणारे होते असे अनेक विद्वानांचे मत आहे. ते ज्यावेळी हिमालय पर्वतावरून खाली मथुरेकडे उतरले त्यावेळी त्यांनी सोबत त्यांच्या बायका पण आणल्या होत्या. परंतु दुर्दैवाने त्या संख्येने इतक्या अल्प होत्या की, त्यांना असूर कन्या, द्रविड कन्या यांच्याबरोबर विवाह लावावे लागले. या मुलींची मूळ भाषा व यादवांची भाषा यात फरक होता. यादवांची भाषा त्या बायकांना बोलणे भाग होते परंतु ती भाषा त्यांना जमत नव्हती. म्हणून त्या जमेल तशी भाषा बोलत होत्या. परंतु त्याचबरोबर त्या त्यांची मूळ भाषा विसरल्या नव्हत्या. ती बोलीभाषा संस्कृतमध्ये मिसळली. हिलाच 'प्राकृत' भाषा म्हणत. मूळ भाषेत कालांतराने अनेक भाषा मिसळल्या गेल्या. महाराष्ट्री, शौरसेनी, मागधी या अपभ्रष्ट भाषा अहिराणीत मिसळल्या गेल्या त्या तिन्ही भाषा म्हणजेच अहिराणी भाषा होय. महाराष्ट्र, शुरसेन व मगध या राज्यांवर सर्वाधी सोमवंशी आर्य राजांचे राज्य होते. ह्यांचेपासूनच यादव वंश तयार झाला. या तिन्ही भाषा व्यतिरिक्त एक अर्ध मागधी भाषा आहे परंतु तिचा इतिहास उपलब्ध नाही. हिच्यात अनेक पोटभाषा मिसळल्या गेल्या आहेत. आजच्या अहिराणीवर अर्धमागधीची छाप

पडलेली आहे. या भाषा अहिराणी भाषेला पोषक आहेत. ह्याचा उगम 'पाणीनी' पूर्व झालेला आहे. पाणीनीचा काळ इ. स. पूर्व ७०० असा होता. त्याआधि १०० वर्षे या भाषेचा उदय झाला आहे असे इतिहासाचार्य कै. वि. का. राजवाडे यांचे मत आहे. या प्राकृत भाषेचा उदगम केव्हाही धरला तरी त्यांच्यावर अहिराणीचे प्रभुत्त्व होते असे म्हणण्यास वाव आहे.

महाराष्ट्री लोप पावल्यावर शके १५० ते ४०० पर्यंत ज्या अपभ्रष्ट भाषा प्रचारात होत्या त्या काळीच अहिराणी बोलीचा उगम झाला असे कै. वि. का. राजवाडे यांचे मत आहे. दोन्ही भाषेच्या मधून (महाराष्ट्री+अर्धमागधी) इ. स. २५० मध्ये अहिराणी भाषेचा जन्म झाला असावा असे एक मत आहे. जुनी अहिराणी व आजची अहिराणी यात ही देशकाल-परत्त्वे, परिस्थितीपरत्त्वे फरक पडणे स्वाभाविक आहे. आजची मराठी डोळ्यासमोर ठेवून ती मराठीचीच बोली आहे असे मानणे हे इतिहास, भाषाशास्त्र, व्याकरणशास्त्र, इत्यादीच्या कसोटीवर न घासता फक्त व्यावहारिक सोय पाहण्यासारखे होईल.

मार्कंडेय यांनी प्राकृत प्रकाशात अभिरी ही अपभ्रशाहून अगदी निराळी भाषा आहे असे म्हटले आहे. अभिरी ही प्रमुख अपभ्रंश आहे असे 'दण्डी' म्हणतो. 'गिअर्सन' ने तिला चक्क भिल्लोडी भाषेच्या मालिकेत टाकले आहे. भरत, हेमचंद्र यांच्या ग्रंथातही आभिरी-चा स्पष्ट उल्लेख आढळतो. याचाच अर्थ असा की, अहिराणी बोली रुपाने प्राचीन काळा-पासून अस्तित्वात होती. तिचे मूळ रुप काय आणि कसे हे समजण्यास आज पुरावे मात्र नाहीत. आभिर हा एक स्वतंत्र लोकसमूह होता, त्याची एक शाखा पुराण-इतिहास काळात खान्देशात राहात होती, हे मात्र पुराव्यानिशी सिद्ध झालेले आहे. अहिराणी अपभ्रंशाची वारस आहे. 'ळ' अपभ्रंशात नाही, अहिराणीतही नाही. अपभ्रशात 'ळ' चा उच्चार 'य' असा करतात. अहिराणीने अपभ्रंशाची परंपरा पुढे चालविली आहे. अपभ्रंशात दैवचा उच्चार दईव, कैकेयीचा उच्चार कईकई व कौरवचा उच्चार कवरव तसेच इंद्रचा उच्चार इंदर असा करतात. अस्तुरी, तुन्हा इत्यादि अपभ्रंशातले शब्द आजही अहिराणीत सापडतात. भाषा जिवंत असल्याने तिला भाषाशास्त्रीय मूल्य आहे. काहीच्या मते ती मराठीची भ्रष्ट भाषाही नाही व अपभ्रंश ही नाही किंवा त्याची पोटभाषा नाही १०० वर्षा पूर्वीच्या पहिल्या 'Linguistic Survey of India' या ग्रंथात एक भाषेचा नकाशा दिला आहे,. त्यात अहिराणी भाषा बोलणारा स्वतंत्र प्रांत दाखविण्यात आला असून अहिराणीच्या पोटभाषा म्हणून खान्देशीच्या, पोटभाषा, कोकणी, बागलाणी, घोडिया, चौधरी (लेवा), पांजणी, भागरी, पावरी, वारेल, राऊबी, अनार्य, बागडी, भिल्ली, मागरी, निचार अशा चौदा भाषा त्यात आहेत.

केतकर, चांदोरकर इत्यादी संशोधक अहिराणी ही मराठीपेक्षा वेगळी व प्राचीन असल्याचे सूचवितात. इसवी सनाच्या सुरुवातीपासून आभिर देश सुमारे दोन हजार वर्षापासून

परिचित आहे. ज्यांनी त्यावर राज्य केले ते दुसऱ्याचे मांडलिक असत व त्यांचीच भाषा वापरत. त्याच्या भाषेवर अहिराणीची छाप उमटत असे. ऐश्वर्याच्या काळांतही तिला राज भाषेचा दर्जा मिळालेला नाही. गुजराथीशी असलेलं तिच साम्य पाहून कुणी तिला गुजराथीची बोली ठरवितात. तर कुणी मराठीशी साम्य पाहून मराठीची बोली ठरवितात (मानतात). तर कोणी तिला भिल्ल-भिर-आभिर या परंपरेने केवळ भिल्लांची बोली मानतात परंतु इतिहास, परंपरा, भाषाशास्त्र, व्याकरण उत्पत्ती, इत्यादी बाजूने विचार केला तर अहिराणी ही मराठी पेक्षा वेगळी, सरस व प्राचीन असल्याचे दिसून येते.

आजचे अहिराणी भाषेचे रुप लक्षात घेता ती मराठीची बोली आहे असा निष्कर्ष काढणे अशास्त्रीय दृष्टीचे म्हणावे लागेल. मग आपणास असे ही मत मांडता येईल की, मराठीत आज किती तरी शब्द, व्याकरणाची रुपे इत्यादी गोष्टी अरबी,फारसी, उर्दु, इंग्रजी या बोलीतील सराईतपणे सर्रास वापरात आहेत. तसेच शब्द अहिराणी भाषेत आज वापरात आहेत (१) अरबी शब्द उदा.—इतबार, राजी, मियकत, हयवान, गबर इ., (२) फारशी शब्द उदा.—अलवार, आब, तोफांडी, बिमारी, असामी इ., (३) इंग्रजी शब्द उदा.—ऑफेस, इंजेक्शन, कंडाक्टर, केस, खून, गल्लास, जंगल, जॅक, डॉक्टर, ठेसन, बूक, बायसिकल बॅलिस्टर, फाईल, इत्यादी. वरील अनेक शब्द अहिराणी बोली भाषेत इतके मिसळले, एकरुप झाले आहेत की, ती रुपे आता परकीय वाटत नाहीत मग अरबी, फारशी, इंग्रजी यांना अहिराणीच्या पोट-भाषा समजावयास काय हरकत आहे.

महानुभाव वाङ्मय, तसेच ज्ञानेश्वरीतही अहिराणी शब्द आढळतात. उदा.—साईखेडा, उपेग, वावर, बिढार, ऊन, इ. शब्दांचा उपयोग ज्ञानेश्वरीत केलेला आहे. संस्कृत, प्राकृत व मराठी यांच्या प्रभावाने अहिराणीचे स्वरुप बदलत गेले असे 'फारतर आपण म्हणू शकू. संस्कृत शब्द उदा. देव, गुरू, नदी, दान, संस्कृत मधून येवून विकृती निर्माण झालेले शब्द उदा. रूसी, परसाद, सर्ग, न्याव, इत्यादी आज अहिराणी वापरात आहेत. बोली भाषा ही प्रमाण भाषे पेक्षा प्राचीन असते हा अलिखित नियम आहे. अहिराणी ही एवढी जुनी आहे की, तिच्यातील काही शब्दांची उत्पत्ती भाषा शास्त्रज्ञांना व पंडितांना लागत नाही. त्याचा मूळ धातू सापडत नाही. आजच्या मराठी, गुजराथी, संस्कृतमध्ये त्याचा संदर्भ मिळत नाही. उदा. अखोर (आणखी), आंडोर (मुलगा), इबाक (इकडे), तिबाक (तिकडे), मिचुक (शिवाय), लोंग (लवंग), बोंगान (मुलांचा घोळका), धंडेल (शेवटचा), वरील शब्दांची उत्पत्ती संस्कृत भाषे व्यतीरिक्त असावी असे दिसते. त्याचे मूळ द्रविड भाषेत आहे किंवा कसे? याचा शोध घेणे जरुरीचे आहे.

अहिराणीचा उगम इ.स. २०० च्या आसपास झाला असावा व ती खान्देशातच जन्माला आली. चंद्रवंशीय यादव, गोप, यांची इ. स. पांच हजार वर्षापूर्वीची जुनी ईलावर्षी भाषा व आजची नवीन भाषा यांचा संगम होवून आजची अहिराणी भाषा तयार झाली आहे. अहिराणीचा युगारंभ वैभवशाली होता. कोणतीही भाषा सुश्लिष्ट स्वरुपात, प्रमाण

स्वरुपात सुसंस्कृत स्वरुपात यायला राजसत्ता आणि ग्रंथसत्ता ही महत्वाची कारणे ठरतात. परंतु समाजसत्ता अहिराणीच्या उगमापासून असल्याने आजही ती बोलीच्या रुपाने टिकून आहे. आजचे महत्प्रयासे उपलब्ध लोक साहित्य परंपरीत होत आलेले आहे. आज तागायत दुर्दैवाने अहिराणी बोली बोलणाऱ्यांच्या राजदरबारी दरारा, वैभव वाढलेले नाही अथवा त्या बोली भाषेत प्रज्ञावंत, प्रतिभासंपन्न लेखक व कवी निर्माण झालेले नाहीत. अहिराणीचा संसार पुढे सन्मानास्पद व्हावयाचा आहे. एवढे असले तरी जनसामान्यांनी तिला हृदयस्थ, कंठस्थ करून जतन केलेले दिसते. आजही तिच्यात गोष्टी, गाणी, उखाणे, पहेली, कुटरचना, लोककथा, लोकगीते, ओव्या, लग्नादी विविध समारंभाची गीते, कानबाईच्या वह्या असे विविध प्रकारचे लोकसाहित्य विपुल प्रमाणात सापडते.

अहिराणी कोणत्या प्रमुख भाषेची पोटभाषा आहे याविषयी "अहिराणी बोली और उसके लोकसाहित्य का अध्ययन" या प्रबंधात डॉ. विजयचंद्र यांनी विविध मतप्रणालीचा परामर्श घेतला आहे. भिल्लोडी, राजस्थानी, निमाडी, शिंदी यांचेशी तुलना करुन १२ व्या शतकात इतर सर्व भारतीय भाषा समवेत अहिराणी या स्वतंत्र भाषेचा जन्म झाला. मराठी, गुजराथी, हिंदी बरोबरीने तिचा जन्म झाला असल्याने तिचे स्वतंत्र आस्तित्व आहे. त्यांच्या मते मराठी, गुजराथी, हिंदीची अहिराणी ही पोटभाषा नसून ऐतिहासिक परंपरा व सांस्कृतिक वारसा व भाषा विज्ञान कसोटीवर घासल्याने अहिराणी भाषा हिंदीशी निगडीत आहे असा निष्कर्ष त्यांनी मांडला आहे.

इ. स. २०० ते इ. स. ११०० पर्यंत या भाषेचा आपणास पुरावा मिळतो. परंतु त्याचे सलग धागेदोरे हाती लागत नाही. अडाणी लोकांची भाषा अशी इतरांची समजून असली तरी ती ज्या पद्धतीने बोलली जाते ती पद्धती व १२ कोसावर बदलणारे तिचे उच्चार, हेल यावरुन व्याकरणाचे नियम तिला लागू नसतात व ती पूर्ण भाषा आहे याला पुरावा मिळतो. आभिरी भाषेच्या स्वरुपाचा उल्लेख "वररुची" या व्याकरणकाराने आपल्या ग्रंथात केलेला आढळतो. त्यात त्याने आभिरीला अपभ्रंश भाषेत टाकले आहे. आभिरी विषयी सर्वात जुना पुरावा उल्लेख भरत मुनीच्या "भारतीय नाटयशास्त्रम्" या ग्रंथात सापडतो. यात महाराष्ट्रीचा पत्ता नाही पुढे हिच भाषा महाराष्ट्रीची प्राकृत म्हणून ओळखली गेली. पहिल्या आणि दुसऱ्या शतकात प्रायोगिक स्वरूपांत अहिराणी अस्तित्वात होती.

अहिराणीत लिखित साहित्य नाही अशी अनेकांची समजूत आहे पण ती चुकीची आहे. अन् वरील विधानास सबळ पुरावा मिळतो. ज्ञानेश्वराचे म्हणून एक घडावाचे गीत (अहिराणी) उपलब्ध आहे. उदाहरणादाखल देत आहे :—

**यसोदेना बाय तान्हा, माले म्हने हाई ले वो ।**
**मी त बाई साधी भोई, गऊ त्यान्हा जवई ।।**
**यईसन बिलगना, फाडी मन्ही चोयी ।।१।।**

वरील गीतात एकूण ४ कडवे आहेत. गीताची भाषा ही पूर्णतः अहिराणी नसली तरी ७० ते ८० टक्के शब्द त्यात अस्सल अहिराणी आहेत. बागलाणी ही अहिराणीची उपभाषा आहे. बागलाणीत ही ज्ञानेश्वरांची काही पदे आहेत त्यातही अहिराणी शब्दांचा भरणा आहे.

"मी दुरथीन हात जोडू । तुम्ही सेवा ना सोडू" ।।१।।

जयराम पंड्याकृत "राधामाधव विलासचंपू" या चंपू काव्यांत मोरीर भाटाची म्हणून जी बागलाणी गीते आढळतात त्यात अहिराणी शब्द आहेत. काही बागलाणी पदात शहाजीराजांचा गौरव आढळतो. त्यातही अहिराणी शब्द व भाषा आहे. त्या पदातील खालील उतारे पहा.—

जठे जठे धाडतेस तठे तठे जायतेस कोन्हा नही कर्जेत हेवा ।

किंवा

विनंती असे तुम पास मी मोरीरना भाट शौ, शाह झणी तुम हास बागलाणन्हा बोला ले ।।

या सारख्या ओळीतून खास अहिराणी शब्द नामे, क्रियापदे, सर्वनामे, अव्यये, विभक्ती प्रत्यय योजिलेली दिसून येतात.

शके ११२८ मधला एक शिलालेख सापडला असून हा लेख ज्ञानेश्वरपूर्व ८४ वर्षे असून साधारणतः ३०० वर्षे पूर्व अहिराणी /मराठी भाषा साहित्य लेखनक्षम झाली होती. वरील शिलालेख पाटणा, तहसिल चाळीसगांव येथे सापडला आहे. त्यावेळी यादवांचा मांडलीक राजा निकुंभ राज्य करीत होता. त्याने आपल्या काळात मंदिराचा कारभार चालविण्यासाठी काढलेले एक आज्ञापत्र आहे. ते येणेप्रमाणे....

इयां पाटणीजें केणे उघटे तेहाचा असि ।
जो राऊला होता ग्राहकापाशी मढा दीन्हा ।।
....बाहीरीला आसू पाढी गिध्र दे ग्राहकापासीं ।
....लेआ घाणेआ बाणाची लोटि मढा दीन्हली ।।१।।

अगोदरच्या ओळीत संस्कृतमध्ये लिहून त्याखाली अर्धा भाग अहिराणीत लिहिला आहे. म्हणजेच त्यावेळच्या "रनाळी" भाषेत आहे. हा भाषेविषयी पहिला लिखित पुरावा होय. शके ११२९ (इ. स. १२०७) तेथे प्रसिद्ध ज्योतिषि भास्कराचार्य यांचा नातु चंगदेव याने ज्योतिषशास्राच्या अध्ययीन, अध्यापनासाठी बांधलेल्या मठाला तेथील निकुंभ वंशीय मांडलीक सांइदेव व हेमाडिदेव यांनी दाने दिल्याची माहिती वरील शिलालेखावरुन मिळते. (तुळपुळे प्राचीन मराठी कोरीव लेख पृष्ठ १०५ ते ११३).

सुरुवातीच्या काळात मराठीच्या प्रारंभी काही कवी व लेखक होवून गेले. त्यांच्या लिहिलेल्या साहित्यात, त्याच्या अभंग, कविता, लेख यांच्यात संशोधक दृष्टीने पाहिल्यास अहिराणी शब्दाचा भरपूर भरणा सापडतो उदा. (१) "मोहोरिया वाघारिसी" हा

एकच शब्द आहे. हे "मोहऱ्या वघारस" याचेच रूप आहे. (२) "ढाससे रांधिले' म्हणजेच "ढासले रांध". संत ज्ञानदेवाच्या ज्ञानेश्वरीत देखील 'कोनी–निघने' या अर्थाचे व उपेग, ऊन, वावर व थडी असे इतर अहिराणी शब्द सापडतात. चक्रधर स्वामी ज्ञानोबा यांची अगोदर अहिराणी जनमानसाची बोली होती. उच्चाराने झालेली रुपांतरे त्यानी आपल्या ग्रंथात बंदिस्त केलेली आढळतात. नंतरच्या काळात आपण वावरायल लागलो की, त्या काळाचे संत कवींचे लिखान दुर्दैवाने आज उपलब्ध नसल्याचे खेदाने इतिहास लिहतांना नमूद करावे लागते आहे. वाडे (गुढे) तालुका चाळीसगाव येथे शके १४८७ मध्ये अहिरराव कुळाचा मराठा जातीचा महालिंगदास नावाचा कवी होवून गेला. त्याने संस्कृत ग्रंथाचे अहिराणीत भाषांतर केलेले आढळते. (मराठी वाङमयाचा इतिहास खंड २, पृष्ठ ५८७) (महाराष्ट्र सारस्वत, वि. ल. भावे). दुसरा एक कवी जैतापुर (शके १६२६) (जैतपीर, तालुका अमळनेर) येथे होवून गेला. त्याने बागलाणी, अभीर व खान्देशी भाषेत कविता केल्या होत्या. शके १६४८ मध्ये विदर्भातील जैन कवी निंबा याने एक पोथी लिहिली असून या पोथीत 'अहिराणी, ' गीत, या नावानेच एक भक्तीपर, उपदेशपर गीत आहे. हे अहिराणी गीत एकूण ५ कडव्यांचे आहे. त्यात येणेप्रमाणे अहिराणी शब्द आढळतात—"तठे जीन पास, सरीर, त्यान्हा, मननी, निवारन, मान्हा, त्याले, त्यान्ह, कई" चौथा एक "अज्ञात" कवी औरंगजेब बादशहाचे काळात होवून गेला त्यानेही अहिराणीत लिखाण केल्याचा सबळ पुरावा आहे. धरणगांव (तालुका एरंडोल) येथे सदानंद स्वामी, खासणे (तालुका चोपडे) येथे "दगडू" नावाचे कवी होवून गेले. त्यांनीही रचना करुन अहिराणीच्या यशस्वी वाटचालीस हातभार लावला आहे.

श्री. चांदोरकर यांना वऱ्हाडात २०० वर्षापूर्वीचे लिखित पुरावे सापडले आहेत :—

गीत —कवो अद्वैत भले के सिसन्सो सींहदार ।
॥ सिद्वपुरासिगे ॥
बोलूनही तया दादुला भवसागरी न सरतके ।।धृ।।
मन्हचा वऱ्हाडती नवजाती यांगातिनी
सब बारा सोया ।।

अनुहात तुरे वाजो नि गगनी जगी जाया सोहया ।
मन्हा पती पर्यंत त्याले देखी वो जग याथ आहांय ।।

अभंग —मन्ह तं शरीर बाई, येका फासोळीत पाही ।।
जंदून कृष्ण गया । तेना वियोग ना घाला ।।

झुरु झुरुं, जात्या हाडचा पांजरा ।
देहाडी गोबान नाम ।।

आजपानी मलखाये । आ ते आई निरास
कडलड धरि धरसु ।।

गौळण —काय जायरे तुले, नंद नंदना कान्हा ।
आपले देउस, तू यसोदाना बाय तान्हा ।
आपले लग्न जोया तो, अठे कोठेली ऊना ।
उतर तुले न कळे, बरा जाया शहाना ।।

स्वत:ची मूळ रूपे, स्वत:चे व्याकरण व इतिहास असणाऱ्या अहिराणी स्वतंत्र भाषेत वरील पुराव्यावरुन अजूनही काही लिखित साहित्य सापडण्याची शक्यता आहे. "प्रथम उपलब्धी व नंतर शास्त्र सिद्धांन्त" या नियमानुसार जसजसे संशोधन वाढेल तसतसे आणखी पुरावे उजेडात येतील व अहिराणी लोकजीवन, लोकसंस्कृती, बोलीस्वरुप यांचे प्राचिनत्व स्पष्ट होवू शकेल.

वरील इतिहास पहाता भाषा ही इतिहास गर्भ असते हेच मनाला चिकटते.

● ● ●

# साहित्यगुणी--अहिराणी

किंवा

# साहित्य सोनीयाची खाणी-बोली अहिराणी-

अहिराणी लोक साहित्य हे स्त्री धन आहे. त्यात ओव्या-जात्यावरच्या, उखाणे, कुटरचना, कानबाईच्या वह्या, गोष्टी, गाणी, लोककथा, लोकगीते, लग्नाची गाणी, समारंभ गीते असे विविध प्रकारचे विपूल लोक साहित्य सापडलेले आहे व आजही अहिराणी भाषिक समाजात अज्ञातस्थळी विखरुन पडलेले आहे. कानबाईच्या वह्या हा तर खास अहिराणी-चा अभिजात लिखित काव्याचा खजिना आहे. काही प्रमाणात त्या लिखित स्वरूपात समाजात आढळतात. अहिराणीतील लोककथांचा अभ्यास हा आभिर लोकांच्या सांस्कृतिक परंपरावर प्रकाश टाकू शकेल. खान्देशातील या आभिर लोकांच्या त्यांच्या स्वतःच्या खास अशा धार्मिक पद्धती आहेत. "कानबाईचे रोट", "रानबाईचे लग्न", "आसरा, जाऊळ, वोणे" देणे, लग्नाचे वेळी ईर काढले, ईर जेवाडणे, भगतचे डव काढणे, मरीमाय-नीजन्ना, बारागाडा ओढणे, आखाजी दिवाई इ. सण उत्सव बरेच काही सांगून जातात. त्यांचा अभ्यास होणे आवश्यक आहे.

वरील उद्देश डोळ्यासमोर ठेवून माझा "अहिराणी लोक साहित्य दर्शन", भाग-१ "सण आणि उत्सव" हा संदर्भ ग्रंथ महाराष्ट्र शासनाच्या अनुदानाने मेहता पब्लिशिंग हाऊस, सदाशिव पेठ, पुणे-३० यांनी मार्च १९८३ मध्ये प्रकाशित केला. महाराष्ट्र व महाराष्ट्रेतर भागात तो रसिकमान्य व लोकप्रिय झाला आहे असे टिकाकारांचे मत आहे. वरील संदर्भ-ग्रंथात मी सण आणि उत्सवासंबंधी बोलणी केलेली आहे. मी विजयाने भारावून न जाता, सारे श्रेय अहिराणी स्त्री, "अनामिक" हिलाच अर्पण करतो. अहिराणी बोलीत बोलणारी अहिराणी 'स्त्री', 'अनामिका' तिची विद्वत्ता आधुनिक कविंनी बिनशर्त मान्य करावी अशी आहे. ती स्वतः अनुभवलेल्या सुख दुःखाच्या धाग्यातून विणलेल्या वस्त्राची-अहिराणी ओव्याची--चोळी शिवते. टुसी काढून केव्हा केव्हा त्यावरती विनोद, उपहास त्यांच्या छटेची 'सप्त्या' कांढून तोडणी करते. अहिराणी लोकसाहित्य अर्थशुन्य, कागद काळे करणारे नसून ते चिरकाल चिरंजीव आहे अमर आहे.

लोकगीते ही पिढ्यान पिढ्या चालत आलेली आहेत त्यात लोकजीवनाचे प्रतिबिंब उमटलेले आहे. ती बोली भाषेत रचलेली आहेत त्यामुळे प्रादेशिक जीवनाची व भाषेची वैशिष्टये त्यातून प्रकट झालेली आहेत. अहिराणी लोक गीतांतील उत्तमोत्तम सुंदर कल्पना

या उसन्या नसून त्या स्वतंत्ररित्या निर्मित अशा आहेत. त्या जानपत स्त्रियांनी गाईल्या असल्यातरी शाळेची पायरी न चढता अनुभवातून त्या जन्मल्या आहेत. त्या मनाला भुरळ पाडतात. अहिराणी काव्य नांदवते, अर्थवते, ध्वनीवते आहे. त्यांच्या बाह्यांगाबरोबर त्यांचे अंतरंगही सुंदर आहे. त्यातील अर्थ रसिकांना मोहवितो, झुलवितो, भुरळ पाडतो. अहिराणी काव्य अज्ञ, सुज्ञ, अनभिज्ञ, विशेषज्ञ यांना सारखेच मोह घालते. त्यातील वर्णन यथा तथ्य असते. अहिराणी ओव्या सुसूत्र, सुबध्द वाटतात. भोवतालच्या समाजाचे भान ठेवून त्या आहेत. हृदयस्पर्शी व आंतरिक जिव्हाळ्यामुळे त्या वाचकांच्या मनाची कड घेतात त्यावरून मनाची आंदोलने, दुःखे, तिचे फुलणे, फळणे, माया-ममता यांचे मनोज्ञ दर्शन घडते.

लोकगीतांतील जिव्हाळा झुळझुळ अव्याहत वाहणाऱ्या झऱ्याप्रमाणे ओसंडतो आहे. हे म्हणण वावगे ठरु नये. अहिराणी स्त्री गीते ही नाजूक असून प्रसंगी आजच्या सुधारलेल्या काळात निर्माण झालेल्या बहुचर्चित वाङमयालाही लाजवितात असे म्हणण्यास हरकत नसावी. पिकते तेथे विकत नाही असे म्हणतात ते खरेच असते. प्रत्येकवेळी खान्देशातील रसिकापेक्षा कांकणभर अधिक दखल खान्देशाबाहेरील वाचकांनी अहिराणी साहित्याची घेतली आहे आजवर हे खेदाने नमूद करावेसे वाटते. अहिराणी लोकसाहित्य दर्शन भाग-१ (सण आणि उत्सव) या बाबत ही निरीक्षकाचा तोच कयास आहे. जात्यावरील ओव्यांनी रसिकानी वेडावले आहे आजवर!

अहिराणी लोकगीतामध्ये, ओव्यामध्ये, जिव्हाळा, भावनांची खळबळ, निर्मळपणा, निव्याजता असे गुण हे ओतप्रोत भरलेले आहेत. जिव्हाळ्याचे तर त्यात संगीत सुर उमटतात. त्यातूनच 'नातेगोते', 'नाती-गोती' निर्माण झाली असून त्यातच पुढे 'गोतावळा' निर्माण झाला आहे. जात्यावरील ओव्या हे अपौरुषेय वाङमय आहे. वाङमयाचे एका नवीन उपअंगाचे दर्शन व्हावे, यासाठीच हा खटाटोट मी केला आहे. या 'नाती-गोती' विभागात स्त्री गीतांचे वेगवेगळे नमुने सादर करण्यात आलेले आहेत. स्त्रियांचा जीव सासर माहेर नव्हे तर निरनिराळ्या गणगोतात गुंतलेला आढळतो. स्त्री त्यावेळी चूल व मूल एवढ्याच क्षत्रात वावरत होती त्याचे हुबेहुब चित्र आपल्या अहिराणी ओव्यांमधून जात्यावर गातांना तिन रंगविलेली आढळतात. तिच्या गीतांतून मिळणाऱ्या संकेताचा, त्यातून चित्रित होणाऱ्या जीवनाचा आस्वाद आजही वाचकांना, श्रोत्यांना प्रसन्न करुन एक वेगळ्या दुनियेत नेतो.

अहिराणी ओव्या म्हणजे अहिराणी स्त्रीच्या मुखातून हृदयाच्या गाभाऱ्यातील निघणारे भावमयी शब्द होत. अहिराणीतील प्रापंचिक सुख दुःख, सुमधूर शेतकरी जीवनाचे अनुभव, कोमलभाव चित्रण, ओव्यामध्ये आढळून येते. आपल्या भोवतालच्या मानवी जीवनाचे निरीक्षण, परिक्षण, विश्लेषण अहिराणी स्त्री सतत करीत असल्याचा भास होतो. तिने ते अहिराणी ओव्यांमधून प्रकट केलेले आहे. तिची अलिखित (लिखित होवू पहाणारी ?)

साहित्यसृष्टी ही गेली कित्येक शतकातील समाजाच्या आंतरजीवनाची, बहिर्जीवनाची जीवंत चित्र सृष्टी आहे. पहाटेच्या मंगलवेळी, माजघरातून जात्यावर गाईले जाणारे मंगल वेध कानी पडावेत त्यायोगे ओव्यांचे माप पदरी भरुन सांडावे. जात्याच्या मुखी घास पडावा अन् **आई** 'सोनाई'ने बाळाला ओव्यांचे साहित्य नवनीत भरवावे युगानुयुगे!

अहिराणी बोली मृदुता, कर्ण मधुरता, विचार भावना, सुखदुःखाचे प्रसंग यांनी भारावलेली आहे. तिचे बाह्यांग व अंतरंग एकच आहे. अहिराणी ओव्यात मानवी जीवनाचा प्रेमसागर, पती पत्नीचा विसावा, आईवडिलांचा जिव्हाळा, श्रद्धाशिला वात्सल्य, भाऊ बहिण या रक्ताच्या पवित्र नात्याचे चढउतार, कष्टाने संसार करण्याची जिद्द असलेली बहीण, पतीच्या जीवनाशी एकरूप असणारी सोज्वल पत्नी, भावांवर प्रेम ओवाळणारी प्रेमळ बहीण, नारळाप्रमाणे वरुन कठोर आतून जीवन असणारा बाप, जावई, सईबहीण, सासू याची यथासांग वर्णने आढळतात. सारे मानवी जीवन कस त्यात आटवले आहे साठवले आहे. अहिराणी काव्य माफक व वरच्या दर्ज्याचे आहे. त्याची अपूर्वाई आगळी आहे. त्यातील अविष्कार चितवेधक, विलक्षण, भुरळ पाडणारा आहे. भाव भावनातील श्रेष्ठत्व त्यात आहे. अहिराणी काव्य काळजाचे माप घेते. तोंडावर भावनाचा मळा पिकतो. काव्यात्मक नजरेने व्यक्तीचित्र रंगविलेली आढळतात. तसेच अहिराणी लोकगीतातून आपणास बहुरंगी व्यक्तीमत्त्व असलेली व्यक्तीचित्रण केलेली आढळतात. त्यात त्याग, आनंद, परोपकार, सेवाभाव, स्नेहशिलता, कर्तव्य परायणता, भक्ती, पराक्रम यांची यथार्थ वर्णने ओथंबलेली आहेत. अहिराणीत देखण्या बोलण्याचा अर्थ समजतो.

सर्वसामान्यपणे अहिराणी ओव्यामध्ये पती पत्नीचे वर्णन करताना अहिराणी स्त्रियांनी नवऱ्यासाठी 'राम' स्वतःसाठी 'सीता' ही रूपके घेतली आहेत असे आढळते. वरकरणी या ओव्या अडाणी स्त्रियांची टिंगल करणाऱ्या वाटत असल्या, इतःपर ओबड-धोबड असल्या-तरी त्यांच्यात दुहेरी व्यापक नि गुढ अर्थ सामावलेला आढळतो. अडाणी स्त्रियांच्या तोंडच्या जात्यावरील ओव्या मी स्वतः त्यांच्याकडून फक्त ऐकल्याच नाहीत तर त्या कागदा-वर लिहून काढल्या. मला त्यांत तत्त्वज्ञान व काव्य यांचे मधूर रसायन मिळाले. कधी श्रद्धेने वाचल्या कधी कधी अश्रद्धेने देखिल! कधीकधी संशयपणाही त्यात मला येत होता अन् कधीकधी जगातील एक गोड महाकाव्य म्हणून ऐकण्याची पाळी माझ्यावर येत होती. हे सार जमवायला मला फारच कष्ट सहन करावे लागले व लागणार आहेत यापुढेही, परंतु कोणतेही कार्य हाती घेतले की, ते तडीस नेण्याचे कर्तव्य त्याचेच असते तेच माझ्या बाबतीत घडत आहे. थोडा त्रास होतो आहे एवढेच. आजही शेकडो दुर्मिळ स्त्री गीते, समाजात विखुरलेली आहेत. मला आवाहन करीत आहेत.

माणसा-माणसातल्या, स्त्री पुरुषाच्या खोल गुढ नात्याबद्दल मला कुतुहल वाटायला लागल नि मी अहिराणीतील "नाती-गोती" गोतावळा हे पुस्तक लिहावयास प्रवृत्त झालो. अहिराणी ओव्याचे शब्द कानावर पडताच अर्थ हरवून नाचतात. भुतावळी सारखा

"अहिराणी ओव्या" खेडोपाडी जावून गोळा करण्याचा 'छंद' मला जडला. ती गीते मी संकलित केली, वाचली, आत्मसात केली. त्यावर विचार करु लागलो अन् संगिताशिवाय संगीत झालीत 'ती' माझ्या कारकुनी जीवनांत !

सासर-माहेरची हृदयंगम वर्णने अहिराणी ओव्यात ओतप्रोत भरलेली आहेत. जीवनातील सुखदुःख, कष्टाला तिथे वाव आहे, थारा आहे. तिचा थाट न्यारा आहे. तिच्या प्रतिभेची उंची पाहून मराठी रसिक वाचकांनी, टीकाकारांनी थक्क व्हावे, नमावे तिचे चरणी. एवढी ती उंच आहे. ती नेहमी क्षितिजावर रहात नाही. कधी ती शंकराची पार्वती (गौराई), कानुबाई, रानुबाई, रानादेवी होते. कधी उषःसुक्तातल्या उषादेवी सारखी अपूर्व तेजाने, अनंगरूपी लालीने पत्नी होवून जगाला मोहविते. परंतु बऱ्याच वेळा ती तिच्या रामाशी (भरताराशी) संयुक्त होते व सीताच रहाते (पत्नी म्हणून) केंव्हा केंव्हा तिच्या रामापासून इतकी दूर जाते की, लेखक व वाचकांच्या ते ध्यानी येत नाही. अहिराणी ओव्याना रम्य लावण्य आहे, मोहकता आहे. अहिराणी लोकगीतांतील स्त्री केंव्हा त्यागाची मूर्ती बनते. केव्हाकेव्हा पती सहवास असून पती प्रेम लुटावे याची तिला शिसारी येते. ती आणखीन काहीतरी लुटत राहाते व लेक बनते. कधीकधी तिची प्रतिभा सिमित होते तरी प्रसिद्धीच्या गदारोळापासून आजवर अलिप्त राहिलेली ती एकांत पत्करत आलेली आहे. तरीही दर्जेदार कवियत्री ठरते. ती बोलकी नसते, बुजरी होते केव्हा केव्हा 'सासू' बनून.

अहिराणी स्त्रीचा मनमिळावु स्वभाव आहे. तिचे समाजाचे अगाध ज्ञान आहे. तिची किती सांगाव व किती सांगू नये अशी भावनाकुल स्थिती होते तेव्हा ती बहीण बनते. आज मराठी श्रोत्याच्या मनात ती घर करुन बसली आहे. अन् त्यासाठी तर हा एवढा अट्टहास आहे. तिला केव्हा केव्हा दुःख झेपत नाही तेव्हा ती 'सून' होते. संसाराचा गाडा ओढते तेव्हा 'पत्नी' होते. तिच्या ओव्याची रसवंती जीवनाचा वेध घेत घेत पाझरते. घरंदाजपणे घरोट्यात, जाते, घरोट्याशी सुसंवाद साधू लागते. अर्थ सौंदर्याने नटलेली ओवी, भावस्पर्शी व हृदयाला हेलावून सोडणारी समर्थशील ओवी तिच्या घशातून बाहेर अमृत फेकते नि श्रोते तिच्या घशांतील खर्जावर संमोहित होतात. अहिराणी काव्य वेताच्या छडी सारखे लवते नी करमणुकीचे वळ येतात श्रोत्यांच्या पाठीवर.

अहिराणी काव्यांतील लाजणे, रागावणे विलोभनिय असते. भावाबहिणींचा लहानपणाचा 'गोफ' चा खेळ, सेवा, सुश्रूषा, जागरण, जीवापाड कष्ट, भावाच्या मनाचा हळवेपणा, केव्हा केव्हा अतःकरण हलविणारी विमनस्क मनःस्थिती, समाधान, उत्साह, आयुष्यांत आलेली सुखदुःखे, मानापमान गिळणारी, स्तुती निंदा या रहादारीचे नियंत्रण करी, उमदा हसरी शांतनिर्विकार स्त्री, माहेरच्या ओढी, इत्यादी बद्दल आजवर असंख्य मायबहिणींनी अगणित ओव्या रचल्या आहेत व त्या समाजात 'ब्रॉडकॉस्ट' केल्या आहेत. लोकगीतात ग्रामीण वातावरणाची वर्णने आढळतात. 'सासु' प्रकरणांत सासुरवास भोगणाऱ्या

आर्य कन्येची बाजू मांडलेली आहे. तिला माहेरचा ओढा आहे. ओठावर आलेले भावना-वेग ती दाबू शकत नाही. अहिराणी ओव्यामधून घरेलू दृश्य साकारलेले आहे. कुटुंबाचे हृदयंगम चित्र साकारलेले तुम्हास त्यात आढळेल. आपल्या 'भावाचा' तिला केवढा अभिमान आहे. केव्हा केव्हा कारुण्यांत ओलावा व आनंदही येतो. तिचा अभ्यास निरी-क्षणाचा आहे. तिचा आत्मविश्वास दांडगा आहे. तिच्या ओव्या वास्तवाला धरुन आहेत व त्यात वातावरण निर्माण करण्याची क्षमता आढळते. तिच्या काव्यांत उत्तम उत्तम कल्पना आहेत. प्रतिभाविलास त्यात विहरतो. अहिराणी काव्याची मुखोदगत संपत्ती अफाट आहे. 'लुट सके तो लुट' असा दिव्य संदेश ते देते. श्रेष्ठ दर्ज्याच्या कलाकृतीसाठी आवश्यक असणारे अनुभूतीचे शुध्दपण, अभिव्यक्तीसाठी आवश्यक असणारे इमान अहिराणी लोकगीतात आहे. जात्यावरील ओव्यांमध्ये आहे. कलादृष्टी जीवना-साठी सुसंगत असल्याने ओवी हृदयाच्या तारा छेडते. श्रोत्याला नांदमय करते.

काही वेळा तिच्या काव्यात अद्‌भूत रम्यताही येते. टोमणे, रुसवे, फुगवे, चेष्टा याही आपलं डोक वर काढतात. कधी लग्नात तन्मयतेने गीत गातात त्यात संघर्षही जाणवतो. रोजच्या रामरगडयातून तिच काव्य निर्माण होत व बाहेर पडत. नात्याचा तिला सार्थ अभिमान आहे. पतिबद्दलचा अभिमान त्यात आहे. विशेषत: उखान्यातून पतीबद्दल सांगितल गेल आहे. त्यातील स्नेह, जिव्हाळा, कर्तव्य, यांचा समन्वय प्रशंसनीय आहे. आपल्या पतीचा मान मोठ्या चतुराईने ती काव्यात व्यक्त करते. मनुष्याचे जिवित हे प्रामुख्याने बुद्धीप्रधान नसून भावनाप्रधान असते. मानवी जिवनात भावना नि तद्‌नुसारी प्रवृत्ती यांचे प्राधान्य असते. भावना वा इच्छा हे चिच् छक्तीचे आद्य स्वरुप आहे याची तिला जाण आहे.

अन् शेवटी एवढा आयडा बयडा घेवून खान्देशची ही माय माऊली अहिराणी बोली अहिराणी भाषिकांच्या मनाची राणी शब्द, स्पर्श, रस, रंग, गंध याचा सडावेचणाऱ्या विदग्ध कला-वंताच्या शोधात आहे. शब्दाचा देखणेपणाने अहिराणी रुपवती झाली आहे. प्रत्येक. शब्दाला भावनेचा तरलस्पर्श झालेला आहे. तिच्यांतील भावरम्य आशय अलंकार होतो. तिच्यात विलक्षण तद्रुपता आहे. रुढी विरुद्ध पेटलेल्या काळजात कोंडलेले शब्द केवळ उच्चाराने येत नाहीत तर आशय शद्बा शद्बांतून बोलतो. ओव्यांची लय गोडवा वहाते. तिची रस गंगेची बंदिसी जीवनाच्या तालासुराशी निबद्ध आहे. अहिराणीने भावसंवेदनाची समृद्ध सृष्टी निर्माण केली आहे. उपमा दृष्टांत व कल्पना विलासाची उधळण करीत ही युग यात्रेला निघाली आहे.

अहिराणी बोलीचा काव्यार्थ समजून जे शोधक, संशोधक, ज्ञानी, तिची योग्यता जाणतील तिच योग्यता वाचकांना प्राप्त होईल. अहिराणीत मोठे संदर्भ ग्रंथ नाहीत तिच्यासाठी संशोधन प्रकल्प नाहीत, तिच्या दुर्मिळ होत चाललेल्या असंख्य ओव्याचे संशोधन मोठ्या प्रमाणावर सुरू होवून मुद्रण होणे अगत्याचे आहे. आज जे लेखक, कवी, संशोधक आहेत ते

बोटावर मोजण्या इतके आहेत हे खेदाने नमूद करावेसे वाटते. मायबोलीतील साहित्याचा विकास व्हावयास हवा. अजूनही या मायबोलीकडे लोकसाहित्याकडे कुणाचे खास लक्ष गेलेले नाही. "दैवम् चैवात् पंचमम्" असे म्हणतात. पुढे येण्यासाठी जसे व्यक्तीचे भाग्य उजळावे लागते तसेच भाषेच्याबाबतही येथे म्हणावे लागेल.

पूर्वीच्या काळी हे आपले हे लोकांचे असे आपण मानत होतो. परंतु आज सारं काही आपलेच असा मानण्याचा काळ आला आहे व त्यामुळे अहिराणी लोक साहित्याच्या संशोधनाला भविष्यात बहर येणे क्रमप्राप्त आहे. असा आशावाद बाळगणे स्वाभाविकच येते. मुळात भारत-देश जानपदात आहे. जानपदात असलेल्या साहित्याची आजवर उपेक्षा होत आलेली आहे. ती दैन्यावस्था संपवून खास करून अहिराणी या आद्य बोली भाषेच्या अभ्यासू, चिकित्सक, अभ्यासकांनी चिकाटीने माजघरांतील जात्यापासून तर शेतातल्या नांगराच्या दात्यापर्यंत संशोधन करून खूपच अहिराणी ओव्या गोळा करून त्यावर संशोधन करून ते महाराष्ट्र रसिकांपुढे ग्रंथरुपाने ठेवून त्यातून अहिराणी मेव्याचा स्वाद सर्वांना सरसकट द्यावा. ईश्वर त्यांना बळ देवो असे म्हणण्याची आज वेळ आली आहे.

● ● ●

# माय-(माँ)-आई

जीवनाची सुरुवात व बालपणाची जडण-घडण जिच्यामुळे होते. तिच्याच महतीने पुस्तकाला सुरुवात करणे तिच्या हयातीत कोणत्याही लेखकाला कृतज्ञतेचे वाटावे. आईच्या या नात्याची महती मातृहृदय साने गुरूजी पासून आजतागायत अनेक मराठी लेखकांनी व जगातील प्रत्येक भाषा व पोट भाषेतील नानाविध लेखकांनी कथा, काव्य, कांदबरी, दंतकथा, या माध्यमातून गाईलेली आहे. असंख्य अज्ञात लेखकांची मालिका देखील त्यात गोवता येईल. "आई" या दोनच शब्दात त्याग, वात्सल्य, ममता व अनेक ज्ञात अज्ञात गुणांची खाण सापडलेली आहे. मराठी साहित्यांतील अवकाशभर उपमा ते वर्णन करताना अपुऱ्या पडतात. साता समुद्राची शाई व मेरूची लेखणी करून विश्वाचा कागद केला तरी मातेची महती अवर्णनीय राहील. मातृहत्यारा परशराम, आंग्ल साहित्यातील "हॅम्लेट" या नाटकातील "हॅम्लेट" वा आधुनिक युगांतील अविचारी, व्यभिचारी, अतिरेकी, पणाने आईचा निघृण खून करणारा माथेफिरू "तरूण" त्यास अपवाद म्हणावयास हरकत नाही. आईच्या मायेचे, महतीचे वर्णन करताना चारही वेद थकून अलिकडे विश्रांती घेत आहेत. "जननी जन्म भूमिश्च, स्वर्गादपि गरियसी" हे तेच सांगून जाते. संस्कृत साहित्यातील "न मातुःपरम दैवतम्" "मातृदेवोभवः पितृ देवोभवः आचार्य देवोभवः" यात आईला मिळालेला अग्रक्रम त्याला निश्चित दुजोरा देतो. रामायण, महाभारतादी ग्रंथात देखील मातेची महती वर्णन केलेली आहे. "नास्ति मातृसमाप्रिया"—(महाभारत १२-२६६-३१). माते सारखी प्रिय दुसरी व्यक्ती नाही. महाभारतात अनुशासन पर्वाच्या १०५ व्या अध्यायांत युधिष्ठिराला भिष्म सांगतो की, उपाध्याय हा १० आचार्यापेक्षा श्रेष्ठ पिता हा १० उपाध्यायापेक्षा श्रेष्ठ आणि माता ही दहा पित्यांपेक्षाही श्रेष्ठ आहे. अलिकडच्या मराठी कवितेत "स्वामी तिन्ही जगाचा आई विना भिकारी" ही कवी माधव जुलीयन यांची कविता. "आई म्हणोनी कोणी आईस हांक मारी, ती हांक येता कानी मज होय शोककारी" ही राजकवी यशवंताची कविता बरेच काही अधिक सांगून जाते. आजवर येवून गेलेले हिंदी सिनेमेही त्याला अपवाद नाहीत. अनेक चित्रपटात आईच्या विविध गुणांचे दर्शन त्यात घडते. ए. व्ही. एम्, प्रॉडक्शन, मद्रासच्या "बहुत दिन हुए" या चित्रपटांत आईच्या विरहाने व्याकूल झालेला लहान मुलगा "अम्मा, अम्मा। तूं कहां गयी अम्मा ।। . . .बचपन मेरा रोता है" हे गीत म्हणतो त्यावेळेस चित्रपट गृहातील साठीच्या मुलांनाही रडवितो. हे मातृ प्रेमाचे महत्व नाहीतर दुसरे आणखी काय आहे? "आईची माया आंब्याची छाया" "आई माणुसकीचे मळे पिकविते" "कुपुत्रो जायते कश्चित, कुमाता न भवति" इत्यादी म्हणी खानदेशातून घरांघरातून लिहिलेल्या आढळतात.

अशा या लोकप्रिय, जगत्मान्य विषयाला आमची अहिराणी भाषिक अडाणी स्त्री देखील अपवाद कशी ठरावी ? पहाटेच्या मंगळवेळी माजघरात जात्यावर मंगलवेध गाताना जात्याच्या मुखी घास पडतो व जात्याला गती येण्याआधी अलिखित ओव्यांचे माप श्रोत्यांच्या पदरी पडते. त्यात मातेच्या महतीशिवाय दुसरे काय असणार ! " माय मरो नी मावशी जगो " या मायेच्या अवस्थेत पोहचलेल्या अहिराणी बोली भाषेच्या समाज संस्कृतीत आईला किती महत्त्व आहे हे "सोनाई" चे तोंडी ऐका :—

एका भल्या पहाटे जात्यावर गातांना " सोनुताई " म्हणते,—

**ओवी मायनी मवाय, झायी घटचाना पालुमां ।**
**गाये खेडामां सोनाई, हांसे जोंध्या टोपलीमां ।। (१)**

आईच्या-आईने, तिच्या आईने परंपरेने आईच्या माये विषयी गाईलेल्या जात्यावरील ओव्या, रोज रोज जात्याच्या पाये पडून, मृदू अर्थपूर्ण व कर्णमधूर झालेल्या असून मी स्वत: ज्या वेळेस खेडेगावात आईच्या मायेच्या ओव्या गात असतांना वात्सल्यपूर्वक हात प्रेमाने, टोपलीतल्या जोंधळयांवर फिरविते तेव्हा तेही बापडे खदखदा हसायला लागतात. थोड्या वेळानेच दोन दगडांच्या मध्ये चक्काचूर होणार असल्याची जाणीव असताना देखील ! आईच्या गीतांतून व स्पर्शातून त्यागाची शिकवण मिळत असावी.

अन् अशा आईच्या मायेच वर्णन करतांना ती म्हणते,—

**माय माय करू, माय साखरन पोतं ।**
**मायन नांव लेता, मन्हा हिरदे बये जोत ।। (२)**

आईच्या स्वभावाचं काय म्हणून वर्णन कराव. आई साखरेच 'पोत' आहे. साखरेची गोडी साखरेलाच. ती पोतंभर असली तर मग काय मजा. तिची गोडी संपता संपत नाही. आईच नाव ओठांवर आलं रे आलं की, हृदयांत मायेची ज्योत तेवते. हृदयात चैतन्य फुलू लागते. साखरेच्या पोत्यांच " रुपक " आईच्या स्वभावाला ती वापरते.

पुढे ती म्हणते,—

**माय माय करू, माय सोनानी परात ।**
**मायना बिगर, माल्हे गमेना घरात ।। (३)**

आईच काय वर्णन कराव ती सोन्याची परात आहे. आई घरात नसली तर मला तिच्या-शिवाय मुळीच करमत नाही. गमत नाही. मुलगी सासुरवासिनी झाली तरी तिला आंईच्या मायेची ओढ असते. आईच्या कडच्या घरी (माहेरी) आई सोडून सर्व नातेवाईक घरात असले तरी ती नसली म्हणजे तिच्याशिवाय चुकल्या चुकल्या सारखं होत, सोनं सर्व धातूं मध्ये श्रेष्ठ आहे. " दाखविल सोने हसे मुलं तान्हे " अशी त्याची कथा. आईच्या मायेशिवाय सोनं देवून कांहीही जगाच्या बाजारात विकत मिळते म्हण ! अशा वेळी ती

आईच्या मायेला सर्वश्रेष्ठ अशा सोन्याच्या "परात" (एक पसरत उथळ भांडे) ची उपमा देते. "परात" स्वयंपाक घरांतील नित्योपयोगी "अन्नपूर्णा" भांडे. आभाळासारखे अफाट, गोल. आईची माया पण तेवढीच मोठी, अमर्याद. परात भाकरी करताना पीठाच्या चेंद्याची यातना सहते. आई मुलांसाठी खस्ता खाते. केवढी सार्थ उपमा आहे.

पुढे ती म्हणते—

**माय माय करू, माय सोनानी पालखी ।**
**मायना बिगर, कोन करेना आलोखी ।। (४)**

आईला काय बरे म्हणावे. आई तर सोन्याची पालखी आहे. आई विना कुणीही आपल्याला माया लावीत नाही. भाऊ-भावजयांनी कितीही गोडी केली, आपुलकी दाखविली तरी तिला ती आईने केलेल्या मायेपेक्षा कमी प्रतीची भासते तुच्छ वाटते, तिच मन गहिवरत. आईपेक्षा दुसर कोणी आलोखी गोडी आदरातिथ्य, धरसवर करीतच नाही. असे तिचे भाव वेडे मन ग्वाही देते. तिने दिलेल्या उपमा अहिराणी साहित्याच्या इतिहासात सूवर्णाक्षरांनी लिहिण्याइतपत सार्थ आहेत. सोन्याची पिंड, सोन्याची परात, सोन्याची पालखी, या काव्यातील उपमा तिच्या काळांत अहिराणी भाषिक प्रदेशात, राज्यांत 'सूवर्णकाळ,' असल्याची साक्ष देतात,—

**माय तवर मया, बाप तवर येरझार ।**
**भाऊ भावजया, सर्वा मावना बझार ।। (५)**

आई तुझी माया आहे तोवर मला सासरहून माहेरला यावयास गोड वाटते. मला तुझ्या मायेने व बापाच्या लाडाने माहेरची ओढ लागते. फेऱ्या कराव्याशा वाटतात. आई-वडील नसले तर भावावर प्रेम असूनही भावजयांच्या कारणे तिला माहेरच्या फारशा फेऱ्या कराव्याशा वाटत नाहीत. अनुभवाने ती शहाणी झालेली असते. खरे अंत:करणापासून प्रेम फक्त आईच देवू शकते. याबद्दल तिची खात्री झालेली आहे. भाऊ भावजयांनी कितीही प्रेम लावले तरी ते तिला गळ्यापासून वर, नकली, कृत्रिम वाटते. त्यात जिव्हाळा नसल्याची तिला जाणीव होते. अनुभवांनी या निष्कर्षाप्रत ती येते. या पार्श्वभूमीवर आईचे प्रेम अधिक उठावदार चित्रित होते.

पुढे ती म्हणते—

**माता पिताना राजमा, टोप पदरी लुगडा ।**
**बंधूना राजमां भांग, मोत्यांना उघडा ।। (६)**

आई-वडील जिवंत असतांना त्यांच्याजवळ आवडीनिवडींना वाव असतो. भावनांना भाव असतो. तिचा हट्ट व लाड पुरविले जातात. त्या काळचे प्रसिद्ध असे "टोप-पदरी" लुगडे तिला मिळते. त्यामुळे तिचा डोक्यावरील पदर (मर्यादा चिन्ह) ढळत नाही. त्या काळातील अहिराणी स्त्री पडदानसीन होती. भावाच्या काळात सुंदर भावजयाच्या आधीन

असलेल्या भावाकडून एवढ्या महागड्या लुगड्याची तिची अपेक्षा, इच्छा पूर्ण होत नाही. भावाने साधे (आखूड) लुगडे घेतल्याने ती पदर मोठा घेवू शकत नाही व श्रीमंत बापाची मुलगी व श्रीमंत पतीची राणी जिच्या केसाकेसांतून मोती ओवलेले असतात तिचा भांग उघडा पडतो. भावाकडून अपेक्षा पूर्ण होत नाहीत. सासुरवासिन असूनही जात्यावर दळतांना ती मनातील खंत काव्याद्वारा व्यतीत करते.

पुढे ती म्हणते—

**माय माय करू, माय नदीमानी शावू ।**
**मायना पोटे ऊनूं, एक बहिन दोन भाऊ ।। (७)**

आई नदीच्या पाण्यात पसरलेल्या "शेवाळी" सारखी सदाहरीत थंडगार आहे. तिच्या अंगी मायेचा गारवा सदैव वास करतो. अंतःकरण अत्यंत मुलायम, कोमल असते. अशा आईच्या पोटी मी एकुलती एक मुलगी जन्माला आली असून माझ्या पाठीवर फक्त दोन भाऊ आहेत. लाल–त्रिकोणाने अहिराणी संस्कृतीतही जन्म घेतला होता की, काय असा भास होतो. तिचे कुटुंब लहान व मर्यादीत आहे. सुखाची गुरूकिल्ली तिला गवसली असावी.

पुढे ती म्हणते—

**चंदनंनी छडी, याले नही गांठगुडी ।**
**माय व तुन्हा पोटे, येन नही घडी घडी ।। (८)**

चंदनाच्या काठीला गाठी नसतात. ती वाकडी तिकडी पिळदार नसते. (तसाच आईचा स्वभाव आहे). अग आई तुझ्या पोटी मला पुन्हा यावयाचे नाही. (नांव लौकिक, कमवावयाचा आहे).

आईचे अंतःकरण चंदनाप्रमाणे मऊ, सुगंधी, निर्मळ आहे. तिला छल, कपट, डावपेच माहित नाहीत, तिला पास पेस नाहीत, पिळ नाही, ती सरळ मनाची आहे. चंदना प्रमाणे स्वतः झिजून इतरांना सुगंध, गारवा देणारी औषधी आहे. अशा आईच्या पोटी एकदाच जन्म मिळतो. तेवढ्या काळात आईचे उपकार फेडता येत नाहीत याची खंत व्यक्त करतांना ती दिसते. पुनःर्जन्मावर तिचा विश्वास नाही.

आईच्या मायेचा तुलनात्मक अभ्यास करून ती म्हणते—

**माय तुन्ही मया, शेजी करासे वं गई ।**
**गुयीनी वं गोडी, साकरले ऊनीनही ।। (९)**

अग आई तुझ्या सारख प्रेम करण्याचा शेजारच्या स्त्रीने प्रयत्न केला पण व्यर्थ ! तुझ्या अविट मायेची बरोबरी तिच प्रेम कस गं करणार ! अग गुळ दिसायला काळा असला व साखर दिसायलां पांढरी व कलात्मक असली तरी गुळाची गोडी साखरेला कशी बरे येणार ? न आल्याची खंत व्यक्त करतांना एक सामाजिक अनुभव ती काव्यातून सादर करते. रोज खाद्य पदार्थाच्या उपमा ती आईच्या स्वभावाला मायेला देते.

पुढे ती म्हणते—

**माय माय करु, माय चवदा रतन।**
**हिरदना आंगोठीमा, कशी करु वं जतन ।। (१०)**

आई, आई म्हणून आईच वर्णन कोणत्या शब्दांत करावे ! आई मुलांना शिस्त लावण्यासाठी चौदावे रत्न दाखवित असली तरी ती चौदा रत्नाची खाण आहे. त्यांची विविधता, मौलिकता, व्यावहारिकता तिच्या ठायी आहे. या नर रत्नाच्या खाणीच्या मौलिकतेचा हृदयाच्या अंगठीत कोणत्याप्रकारे सांभाळ करावा असा मुलीला प्रश्न पडतो. (ती हृदय भरून उरलेली आहे). चौदा रत्नांचा, गुणांचा संगम तिच्या स्वभावांत झाला आहे. अहिराणी ओवी या ठिकाणी आईच्या मायेच्या क्षितिजाचा वेध घेत घेत विस्तारत जाते व उंचावते.

पुढे ती म्हणते—

**माय माय करु, माय चारोयी लागे गोड ।**
**तिन्हा वं जोडीले, आईबा दराक्षन झाडं ।। (११)**

आईचे म्हणून काय वर्णन करावे. आई चारोळी सारखी स्निग्ध, मधाळ, औषधी स्वभावाची आहे. अन् तिच्या जोडीला माझे वडील द्राक्ष वेलीवर लोंबकणाऱ्या द्राक्ष घडासारखे गोड रसाळ स्वभावाचे आहेत. रसरसीत, भुसभूसित अंतःकरणाचे आहेत. नासिक विभागात द्राक्षाचे पिक त्याही वेळी भरपूर येत असावे. भोवतालचा परिसर काव्यांत डोकावतो.

पुढे ती म्हणते—

**माय माय करु, माय मिचुक गमेना ।**
**पोतारेल भिंतवर, काढू मायना मायना ।। (१२)**

आई आई म्हणून हाक मारावी पण आई दिसत नाही. (सासरी कशी असेल) अन् आईविना मुळीच करमत नाही. आईचा एवढा ध्यास घेतला आहे की, मला तिच्या विना काही सूचतच नाही. मातीच्या भिंतीना मातीचा रंग लावल्यावर त्या चकाकतात. हे करतांना मला आईची आठवण येते. मी तेथेच काडीच्या कुंचल्याने आईची छबी आठवेल तशी भिंतीवर साकारते. तिच्या मनांतील हुरहुर, माय माऊलीचा भावकल्लोळ, अंतरीच्या खळवळीतून, उमाळचातून विलक्षण चित्र आकारले जाते तेही सहजगत्या.

पुढे ती म्हणते—

**माय माय करु, माय खोबरानी वाटी ।**
**मायनं नांव लेता, हिरेदे, व्हये दाटी ।। (१३)**

आई खोबऱ्याची वाटी आहे. आईचे नाव घेतल्यावर हृदयात प्रेमाचा ओलावा निर्माण होतो. भाव भावनांची दाटी होते. आईच्या प्रेमाला खाद्य, पृष्ठ, स्निग्ध पदार्थाची

दिलेली उपमा सार्थ वाटते. 'देवाची करणी नारळात पाणी', 'वर दिसते कठीण परी आत ते जीवन' अशी व्यक्ती वैशिष्टये आईला लागू पडतात.

पुढे ती म्हणते—

**माय माय करु, माय मनथीन गंभीर।**
**हात नही पुरे कोन्हा, ऊचा झाडनी खजूर ।। (१४)**

आईचे मन अथांग आहे. गंभीर आहे. ती मनाने खंबीर आहे. तिच्या मनाचा अंत घेवू पहाता ज्याप्रमाणे ऊंच झाडावर आलेले खजूर फळ कोणाच्या सहज हातात लागत नाही तसा आईच्या हृदयाचा ठाव सहसा कुणाला घेता येत नाही. ती मायेचा सागर आहे. निसर्गातील झाडी, झुडपे तिच्या काव्यात डोकावतात.

पुढे ती म्हणते—

**माय माय करु, माय साखर फुटाना।**
**मायना सबद, माले उठूस वाटेना ।। (१५)**

आईचा स्वभाव साखरे सारखा गोड असून ती कधीही धुसपूसत नाही. तो साखरफुटाने (जे प्रसाद म्हणून वापरतात, वाटतात.)सारखा चविष्ट आहे. पवित्र आहे. आईच्या गोड गोष्टी ऐकतांना मला तिच्या शेजारुन उठून जावेसे वाटत नाही. मला कंटाळा येत नाही. तिचा एक एक शब्द मोलाचा असतो.

पुढे ती म्हणते—

**माय माय करू, माय मयदानी लोई।**
**डोयाना करा दिवा, तयहात करी झुई ।। (१६)**

आई 'मयदा' नावाचा आटयाच्या लोई सारखी असते. मयद्याला वाक नसतो. अनंत आकार देता येतात. जिलेबी होण्यापूर्वी मयदा कोपऱ्यात हातोपायी तुडवला जातो. तसे आईचे झाले आहे. लहानपणी आईने मला वाढवतांना रात्रंदिवस डोळयांत तेल घालून रक्षण केले. माझ्यावर रात्रंदिवस पहारा दिला. आपल्या तळहाताचा 'पाळणा' 'झुला' करुन निजविले, झुलविले, जोपासले, वाढविले.

पुढे ती म्हणते.—

**माय माय करू, माय चिकनी मलाई।**
**जठे मुडे काटा, याद मायले बलाई ।। (१७)**

आई दुधावरच्या साईसारखी चिकन, सकस स्वभावाची आहे. मलाई जळल्या ठिकाणी लावली तर लवकर खपली धरते. थरी अर्क असते. जगात कोणालाही साधी दुखापत पासून मोठी दुखापत झाल्याबरोबर 'अग आई ग' असा उद्‌गार बाहेर पडतो. ती व्यक्ती विव्हळते. आईचे नाव घेताना दुःख कमी होते हा नित्याचा व्यवहार आहे.

साधा शेताकडे जातांना पायी कांटा बोचला तरी मन आईला हांकारते. तिची फक्त आठवणही दु:खावर औषध होते. आईच्या अंगी वत्सलता व दु:ख हरणाची अदृश्य शक्ती वास करते. दैनंदिन व्यवहारातील उदाहरण तिने काव्यात दृष्टांत म्हणून वापरले आहे.

पुढे ती म्हणते--

**माय माय करू, माय लोनीना वं गोया ।**
**कुजात संतानले, जीवं ववाये वं भोया ।। (१८)**

आई दही घुसळून वर आलेल्या ताज्या गोड लोण्याच्या गोळ्यासारखी आहे. मृदु कोमल, नाजूक मनाची आहे. ती हळूवार माया लावते.

तिच्या मनात स्निग्धता आहे, अर्क आहे, भांडखोर, कजाग नालायक मूल जरी पोटी जन्माला आले तरी त्यांच्यावर ती आपला भोळा जीव ओवाळून टाकते. आईच्या पोटी "साप" जन्माला आला तरी ती त्याला छातीला कवटाळते. तो तिला गोडच लागतो हे तिच संतती प्रेमाच प्रतिक आहे.

पुढे ती म्हणते.--

**माय माय करु, माय सोनानी वं चिडी ।**
**माय जाई ऊडी, करी कोन आलोखी गोडी ।। (१९)**

आई सोन्याची चिमणी आहे. ती केव्हा भुरकन उडून जाईल याचा नेम नाही. (आयुष्य क्षणभंगूर आहे हेच खरे !) आई निधन पावल्यावर, आपल्यातून गेल्यावर कोण बरे आमची आवड, धरसवर करणार ? आम्हाला आनंदाने हृदयाशी कोण बरे कवटाळणार ?

पुढे ती म्हणते --

**माय माय करू, माय साखर ना रवा ।**
**मायन नांवलेता, लागा हिरीदमा दिवा ।। (२०)**

आई साखरेचा रवा, पिठीसाखर आहे. जिथे मुले मुंग्यांसारखी प्रेमापोटी गोळा होतात. आईची आठवण होताच हृदयांत ज्योत पेटते. एक वेगळी अनुभूती तिने काव्यात गोविली आहे.

पुढे ती म्हणते --

**माय माय करू, माय मन्ही गोदावरी ।**
**तुन्हा वं दुधनीदाई, माले दुन्यादारी ।। (२१)**

माझी आई गोदावरी आहे. गंगाजलापरी, पवित्र शुद्ध मोठ मनं, असलेली आहे. संगळच्यांना समजून व सांभाळून घेण्यात ती स्वत:ला धन्य मानते. आपले कर्तव्य समजते. आई तुझ्या स्तनातील दुधावरच तर मी पोसली वाढली. हे जग पाहिल. येथील मौज मजा मी तुझ्याच कृपेने उपभोगते आहे.

पुढे ती म्हणते---

**माय माय करू, माय साखर बत्तासा ।**
**मयान न्हात कोनी, न्हतीना आवदसा ।। (२२)**

आई साखरेचा बत्तासा नावाचा पदार्थ आहे. ज्याचा पवित्र देवस्थानांमध्ये " प्रसाद " म्हणून उपयोग होतो. त्याचे जनमाणसात विशिष्ट स्थान आहे. आई शिवाय आई सारख आणिक दुसरे कोन्ही प्रेम करणारे असते तर जगात कोणाचीही केविलवाणी परिस्थिती, दैन्यावस्था, दुरावस्था झाली नसती. त्याला वाईट दिवस आले नसते.

अशा अनौपम्य आईने लहानपणी काय काय केले याबद्दल बोलतांना ती म्हणते---

**माय माय करु, मायना उपकार फेडू कोठे ? ।**
**घुटी उगाई उगाई, झिजी गयात पांची बोटे ।। (२३)**

अग बाई आईचे उपकार कसे अन् कुठे फेडावेत. मी तिची कशी उताराई होवू. लहानपणी मला " घुटी " देण्यासाठी सहानवर पाचही बोटे घासून घासून " ती " झिजून गेलीत. " घुट " हा हिन्दी शब्द आहे. तिच्या कष्टाला पारावर नाही. तिच्या सोसिक मनाला उपमा नाहीत. आईच्या उपकार फेडीचा यक्ष प्रश्न तिच्यापुढे उभा राहतो.

पुढे ती म्हणते---

**माय माय करू, माय मावसी बोलनी ।**
**बिगर पानीनी, दारे तुयसी खुलनी ।। (२४)**

मी आईला हांकारते. ज्यावेळी आई किंवा आईची बहिण " ओ " किंवा होकार देते प्रत्युत्तर देते त्यावेळेस पाण्याविना दारी तुळशीचे रोपटे बहरावे त्याचप्रमाणे माझे मन बहरते, फुलते, हिरवळते. तिच्या परिसरांतील निसर्ग काव्यात डोकावतो. उपमा सार्थ वाटते,

पुढे ती म्हणते---

**मायना वं जिऊ, जिऊ आंडरवर बहु ।।**
**राधंत वाढे जिवू, पोई अलवार तुप बहु ।। (२५)**

आईची मुलीवर भलतीच माया. ती स्वयंपाक करतांनाच अलवार नाजुक गव्हाची खूप गांवठी तूप (म्हशीचे) लावलेली गरम गरम पोळी खावू घालते. गरम गरम खावू पिवू घालते. अप्रतिम मायेच वर्णन यांत आहे.

पुढे ती म्हणते---

**बाप मन्हा चाफा, माय मन्ही चंपाकई ।**
**चंपाकईना मांडीवर, जपमाले लागीगई ।। (२६)**

माझे वडील सोन चाफ्यासारखे सुंदर, कर्तव्य परायण आहेत तर आई चंपाकळीसारखी सुरेख, सुंदर किर्ती सुगंध देणारी आहे. अशा चंपाकळीच्या मांडीवर मला झोप लागली आहे. मुले मांडीवर (गोदीमें) झोपविण्याची प्रथा त्या काळीही होती.

पुढे ती म्हणते—

**दुखपन सुखपन, करे उशानी पायत ।**
**मायना बिगर, कोनी करे ना सोयत ।। (२७)**

सुखात अन् दुःखात सदैव माझेजवळ बसन, उशी-पायत पर्यंत पडणारी सारी कष्टाची किळसवाणी कामे आई करीत असते. अहो आई शिवाय एवढ सार स्वतःहून कोण बरे सहन करणार? संतती अनौरस असली तरी आई अपत्यांच्या सुखदुःखात भागीदारीन असते.

पुढे ती म्हणते—

**खस्ता खाता खाता, माय झायी व्हला ।**
**जलम दिसन, गरूड पंखे वारा घाला ।। (२८)**

अनेक संकटांशी तोंड देता देता आईला खूप कष्ट पुरलेत. असंख्य, असह्य यातना तिला सहन कराव्या लागल्या. "व्हला" नावाच्या जंगलातील पक्षाप्रमाणे टाहो फोडत रानोमाळ भटकावे लागले. तरी सुद्धा तीने मला जन्माला घालून गरुडपक्षाप्रमाणे पंखाची मायारूपी उब दिली. राज वैभवात वाढविली. मला दुखाची "झळ" पोहचू दिली नाही. "व्हला" नावाचा जंगली पक्षी हा अन्यायाविरुद्ध न्याय मागण्यासाठी टाहो फोडत अहोरात्र रानोवनी भटकत असतो. बेबस, बेसहारा. काही वेळेस या मौखिक साहित्यात व्यक्ती विशेष सांगताना ओवीच्या दुसऱ्या ओळीत त्याचा निर्देश केलेला आढळतो. दुर्लभ अशा अनेक ओव्यांमधून आईच्या अनेक गुणवैशिष्ठयांचे बहारदार वर्णन आपणास आढळते.

पुढे ती म्हणते—

**आईबा व मन्हा, काशीमाना वडं ।**
**मन्ही माय बाई, पानी तिरोनीन गोडं ।। (२९)**

माझे वडील हे पवित्र काशी क्षेत्रातील वडाच्या डेरेदार सदाहरीत औषधोपयोगी झाडासारखे आहेत. तर माझीआई—अलाहाबाद येथील गंगा-यमुना सरस्वतीच्या त्रिवेणीसंगमावरील पवित्र, निर्मळ, गोड पाण्यासारखी आहे. निर्मळ गोड स्वभावाची आहे, सर्व सद्गुण तिच्यात संगमीत झाले आहेत.

आईच्या कष्टाला पारावार नाही असे सांगतांना ती म्हणते—

**खस्ता खाता खाता, तुन्हचा दुखन्यात बाह्या ।**
**घालू लोटांगन, पाये देव तुन्हा भक्त झाया ।। (३०)**

अनेक संकटाशी सामना करतांना, मला लहानपणी जोपासताना, कष्ट करत जगताना तुझे अजानुविलंबीत बाहु (दोन्ही) थकले असतील मी नम्रपणे तुझ्या पायाशी लोटांगण घालते. तुझे हे निरपेक्ष कष्ट 'कर्मन्येवाधि....मा फलेषू कदाचन' गीतेचे सार पाहून प्रत्यक्ष

भगवंत, देव तुझा भक्त, सेवकरी झाला आहे. यापेक्षा आई तुझा महीमा आणखीन काय वर्णन करावा! व कोणत्या शब्दात?

पुढे ती म्हणते—

**जलम दिसन, बाप झाया कां बामन ।**
**जलम देती माय, नव महिना जामीन ।। (३१)**

आईचे पात्र मुख्य पात्र म्हणून रंगवितांना ती म्हणते की, बापाने जन्माला घालण्याचे कर्तव्य केले व ते एखाद्या ब्राह्मणाप्रमाणे सोवळे घेवून अलिप्त झाले. अहो। माझे ओझे पोटात नऊ महिने नऊ दिवस आईनेच वागविले ना? पथ्य पाणी पाळले व तिनेच मला जन्म दिला. ती माझ्या गर्भवाढीला जामीन, साक्ष, 'शुअर्टी' होती. आईचे प्रेम उपजत असते असेच तिला सांगावयाचे आहे. 'नख त्याले जिवाई' अशी एक म्हण आहे. पुढे आजीने सांगितलेली गोष्ट तिला आठवते व ती म्हणते—

**चालू वाजत गाजत, ठुमे ठुमे मन्हा पाय ।**
**माय सोनमाय मन्ही, गाना आंगनमा गाय ।। (३२)**

अन् जेव्हा मी छुन छुन असा पायातील पैंजणाचा, वाळाचा आवाज करीत ठुमठुम चालायला लागली होती तेव्हा तिला काय तो आनंद झाला होता. ती माझी आई सोनुताई अंगणात माझ्यासाठी अंगाई गीत (लोरी) म्हणत होती. तिच्या आनंदाचा तो श्राव्य अविष्कार होता.

पुढे तीं म्हणते—

**बत्तीस धारासन, दुध पिन्हु गड्डु गड्डु ।**
**मायना उपकार, कोनता जलमे फेडू ।। (३३)**

लहानपणी तु मला अंगावरील दुध, मोठा तांब्या भरेल एवढचा आकारमानाएवढे दूध स्तनातून भरविले. आंगा खांद्यावर लेवून वाढविले. अग आई तुझे उपकार मी कोणत्या जन्मी फेडावे बरे? (एका जन्मात आईची उपकार फेड होवू शकणार नाही युगानयुगे अपुरे पडतील असेच कांहीसे तिला सुचवावेसे वाटते). अनंत उपकार असाच त्याचा उल्लेख करावा लागल. जगात हा प्रश्न आजवर अनुत्तरित राहिलेला आहे.

**कामवालीबाई मी, कामलेना भ्याऊ ।**
**माय काशी नपिन्हु दुध, मी हारलेना जाऊ ।। (३४)**

आपल्या सोबत शेतात काम करणाऱ्या ज्वारीच्या हारीची 'लानी' (खुडणी) करणाऱ्या स्त्रीला उद्देशून ती म्हणते अग मी माघार घेणार नाही, थकणार नाही कारण काशी क्षेत्रापरी पवित्र अशा माझ्या आईचे भरपूर दूध मी प्यालेली आहे. आईच्या दुधात किती शक्ती असते त्याला पर्याय नाही. ती या ठिकाणी वर्णन करते. आदि माया शक्तिच्या दुधाची

शक्ति काय वर्णावी ? कदाचित 'काम' याचा दुसराही अर्थ तिला या ठिकाणी अभिप्रेत असावा. ती कामशास्त्रात 'निपुण' असून कोणासही न आटोपणारी चतुरललना आहे. तो रक्ताचा वंशिक गुण ती समजते. हाही जीवनाचा आवश्यक पैलू आहे. कारण ती जगत्जननी आहे.

पुढे ती म्हणते—

**गुंचकी लागनी आज, माले 'आन' खाता खाता ।**
**मायनी लीन नांव, सकाय तोंड धोता धोता ।। (३५)**

आज मला जेवायला बसल्यावर 'हिचकी' उचकी, गुचकी लागते आहे. (कोणीतरी मायेच्या माणसाने आठवल्याचा तो पारंपारिक संकेत समजला जातो.) आईने आज सकाळी ओटयावर बसून तोंड धुतांना माझी आठवण केली असेल बरे ! माझ्या सुखदुःखाचे विचार तिच्या डोक्यात घोळत असतील. हे अदृश्य विचार वहन आहे. याची शास्त्रीय दृष्टया चिकित्सा व अधिक विचार होणे अत्यावश्यक आहे. मुलगी माहेरी येते. तेव्हा ती म्हणते—

**आखाजीना सन, सन ऊनावं एका एकी ।**
**नादान लेकी मन्ही; आपी बसूत माय लेकी ।। (३६)**

अक्षय तृतिया सण केव्हा येवून गेला कळलेच नाही. कामाच्या राम रगाडयात दिवस भराभर केव्हाच निघून गेलेत. अक्षय तृतिया व दिवाळी हे दोन सण प्रामुख्याने सासुरवासी-नीच्या जीवनात विशेष स्थान मिळवून आहेत. अग बाई माझ्या लाडक्या मुली आपण सुख-दुःखाच्या गोष्टी करण्यासाठी दोन्ही एका कोपऱ्यात एकांतात बसू. खूप बोलू. दोघींच्या-मनावरचा ताण नाहीसा होवून मन कस पिसा सारख हलकं हलकं होईल, जीवाला बरं वाटेल.

**जग दुन्यामां,वापरु, सुख दुखन्या भरू गोनी ।**
**मायना बिगर, हिरद उकलेना कोनी ।। (३७)**

मी जगात वावरते. संसार करते. अनेक सुख दुःखाचे अनुभव दैनंदिन जीवनात मला येतात. त्याचा साठा मी पोते भरून करते. (अन् मग आई भेटल्यावर एकांतात सर्व पोटातील गोष्टी सांगून मोकळी होते.) आई शिवाय माझ्या हृदयाचा ठाव कोण बरे घेणार आहे. दुःख दुसऱ्याजवळ सांगितल्याने मनाचा भार हलका होतो. सुख दुप्पट होते. वृद्धींगत होते. आई जवळ जे सांगायचे ते निःसंकोच सांगितले जाते.

तिला साऱ्या जगातील सुखदुःखाचा अनुभव आहे कारण ती म्हणते—

**उगना नारायन, गांव चमकस कंस ।**
**देखस सोनाई, दुन्या वापरस कसं ।। (३८)**

नारायण हे सूर्याचे दुसरे नाव. सूर्य उगवला आहे. त्याची सोनेरी किरणे गावातील झाडा झुडपांच्या झेंड्यावर पडलेले आहे. सारं गांव कस सोनेरी दिसत आहे. अन् या अशा लख्ख प्रकाशात सोनुताई पाटील आपल्या चक्षुंनी गावातील सारे चांगले वाईट व्यवहार, आचारविचार कसे चालले आहेत, जगाच्या रितीभाती निरखून पहाते आहे. तिला जगाची जाण आहे. ती सत्य पडताळते, न्याहाळते आहे.

आईची माया काही औरच असते शेवटच्या क्षणी, संकटसमयी तीच आठवते त्याचे वर्णन करतांना ती म्हणते—

**निंबा निमनी साया, तशी मायनी माया ।**
**आज खाटले पडता, लिंबू तिन्ही वाया ।। (३९)**

हिरव्यागार निंब नांवाच्या झाडाच्या (कडू) पण शांत छायेप्रमाणे 'कडू पण गुणकारी' अशी वैशिष्ठ्यपूर्ण आईची माया असते. आज आजारी अवस्थेत अंथरूणांत खिळल्यावर मला आईची आठवण होत आहे. आईत जीव अडकतो आहे. शेवटच्या क्षणी आईच्या भेटीची तिला अंतिम इच्छा आहे. आईच्या मायेची महती तिने वरील ओवीत वर्णन केलेली आहे.

आईच्या मायेविषयी दुसऱ्या एका ओवीत ती म्हणते—

**वर थीन नारय कठीन, त्यान्हा पोटमा जीवन ।**
**टोचे फनसना कांटा, मधमा राज अमरुतन ।। (४०)**

वरून दिसायला नारळाचे कवच ठिसूळ, कडक, कठीण असते. परंतु त्याच्या आत गोड पाण्याचा साठा आढळत असतो. फणसावर वर हाताला काटे लागतात परंतु मध्ये गोड गर रूपी अमृत साठे असतात. अगदी तशीच आईची माया असते. ओवीत कोकण डोकावते अशा या आईच्या मनात कर्तव्याची देखील जाण आहे. मुलीच्या लग्नाविषयी, तिच्या स्थळाविषयी तिचे वेगवेगळे स्वप्न असतात. ती म्हणते—

**मन्हं मन वं सांगस, देखू लेकले नवरा गोरा ।**
**माय घरान शिलवानं, मयनाना तठे तोरा ।। (४१)**

कधी कधी माझ्या मनात असे येते की, माझ्या मुलीसाठी गोरागोमटा 'नवरा' बघावा. तिच्या साठी खानदानी घराणे बघावे. माझ्या मैनेची त्या बागेत सत्ता चालावी. कारण सौंदर्याचे पुरेपुरे माप तिच्या पदरात मी सांडलेले आहे.

तिचे अपेक्षेप्रमाणे नवरा मुलगा मिळतो त्या वेळेस ती म्हणते—

**जवाई से सोनं, लेक नागीनन पानं ।**
**दोन्हीसले देखीसन, माय मकाले समाधान ।। (४२)**

जवाई सोनं आहे. (खरे रोकडा बोलणारा) मुलगी नागीनीच पानं (खाऊच पान, गोरी गोरी पान, स्वरूपवान) आहे. कवळी आहे. लावण्य लतिका आहे. दोघांना पाहून

स्वतःच्या आईला समाधान वाटते. या ओवीत आईला मक्केची उपमा दिली आहे. मक्का हे मुसलमानांचे पवित्र क्षेत्र. सर्व धर्म समभाव तिच्या काव्यात आढळतो.

आई मायेने ममतेने मुलीची चौकशी करते तेव्हा ती म्हणते—

**भरतार नं सुख, माय सोदस घडोघडी ।**
**काय सांगू बाई, गांठ चतुरसे पडी ॥ (४३)**

तुला तुझ्या नवऱ्यापासून सुख आहे किंवा नाही. त्याच्या घरी तू सुखी आहेस की नाही याची आई मायेने वेळोवेळी चौकशी करते तेव्हा ती म्हणते आई त्यांचे (तुझ्या जावयाचे) काय ग वर्णन करावे? माझी जन्मगाठ 'चतूर' माणसाशी पडली आहे (ते प्रत्येक कामांत चतूर आहेत). पूर्वी लग्नात 'गांठपल्लो' बांधावयाचे व संसार सुखासाठी बंदिस्त करीत असत.

तिच्या मुलीची हौस फेडतांना ती म्हणते—

**मन्ही लाडकी मयनाले, झोका उँचा मी बांधसु ।**
**मयना रानीले दखीसन, ईनचाँद सुऱ्याले हासु ॥ (४४)**

माझ्या लाडक्या मुलीसाठी मी ऊंच ठिकाणी 'हिंदोळा' झुला बांधीन. लाकडी बंगई टांगीन. तो झुला झुलतांना माझ्या मैनेला पाहून चंद्र आणि सूर्याला हसायला येईल. सुंदर आवडती वस्तू पाहिल्यावर सर्वांनाच मनापासून आनंद होतो त्याला चंद्रसूर्य हे तरी अपवाद कसे असणार !

तिची मुलगी लहानपणी गल्लीत माती माती खेळते डोके मळविते. तिच्या डोक्यात घाण सांचते. केससंभार हा स्त्री सौंदर्याचा विभाज्य अंग आहे. त्याच्या निगेविषयी ती म्हणते—

**मायन मन्ह डोकं, बाले झायात लता ।**
**डोकं ईचरे माय मन्ही, पानी टाके मन्हा पिता ॥ (४५)**

माझं डोकं लहानपणी घाण व्हायचं, माझ्या केसाच्या जटा बांधल्या जायच्या त्यावेळी आई डोके धुताना केस विचरायची वडील पाणी टाकत असत. एवढी आईने माझी हळूवार जोपासना केलेली आहे.

अशा या आईचा फक्त चेहरा पाहिला तरी कामाला उत्साह येतो याच वर्णन करतांना ती म्हणते–

**उभ्या गल्ली जाऊ, माले उभारी दाटनी ।**
**माय नी जीजमाय, वाटवर भेटनी ॥ (४६)**

उभ्या गल्लीला फिरावयास जात असताना मला वाटेवर आई व मावशी तिकडून येतांना रस्त्यावर भेटल्या. आईच्या दर्शनाने मला कामाला दुप्पट उत्साह आला.

संततीविना आईची स्थिती कशी केविलवाणी असते याचे वर्णन करतांना ती म्हणते—

**चांदना बिगर, रात चांदनी सुलावनी ।**
**पुत्रना बिगर, माय 'केसर' किलावनी ।। (४७)**

चांदनी रात्र असूनही चंद्राशिवाय ती शोभीवंत दिसत नाही. तसेच मुलगा नसल्यामुळे केशरबाईचे जीवन केविलवाणे आहे.

सणा सुदीला ती आपल्या अपत्याची आतुरतेने वाट पहात असते—

**दिवाईना रोज, रोज धावे धावे दिवा ।**
**माय कशी म्हने, आज मथोराना येवा ।। (४८)**

दिवाळीच्या दिवशी प्रत्येकाच्या घरावर पणत्या प्रज्वलीत होत आहेत. तिच्या कुळाची पणती घरात नाही. आई म्हणते आज माझी मुलगी मथुरा (मुलीचे नाव) येईल. भाबळा आशावाद व अमीट मायेच वर्णन वरील ओवीत आढळते.

मुलगी आली आहे आई तिला गोष्टी सांगते तेव्हा ती म्हणते—

**पिता वाचे पोती, देव धरमनी ।**
**माय करे कथा, सदा तिन्हा करमनी ।। (४९)**

घरांत वडील नेहमी देवधर्माची पोथी वाचतात. आई माझ्याजवळ सतत तिच्या दुःखी जीवनाची कर्म कहाणी सांगत असते. तिचे जीवनानुभव जीवंत काव्य आहे.

दिवाळीला आलेली मुलगी काही देवाणघेवाणची मागणी करते तेव्हा आई म्हणते—

**बाप ईन माय, खजिना ना हुट ।**
**माय सांगे ताई, धीरे धीरे लुट ।। (५०)**

वडील श्रीमंत आहेत. ते आता येतील. त्यांच्याकडून काही मागणी आहे. मागणे आहे. आई उपदेशिते अग बाई ताई तूं अशी अधाशासारखी घाई करू नकोस धीर धर. तुला हळूहळू सर्व काही मिळेल. पूर्वी लुटीचा माल राजे रजवाडे उंटावर लादून आपल्या राजधानीत आणीत असत. त्यात सोने, माणके, पांचू इत्यादी द्रव्य असायचे. ती बापाला खजिन्याच्या उंटाची उपमा देते.

तिच्या घेण्यादेण्याला, तिच्या अमर्याद इच्छापूर्तिला कंटाळून लटक्या रागाने वडील म्हणतात—

**बाप कसा म्हने, तू मरी तरी जाती ।**
**माय कशी म्हने, सुख दुखले काम येस ती ।। (५१)**

बाप वैतागून म्हणतो अग बाई तू फार देवघेवला सतावतेस. अग लहानपणीच मेली असतीस तर बर झाल असत. तेव्हा जवळ असलेली आई म्हणते अहो जीवावर आल काय? तिला मरायन काय म्हणतात. अहो तीच आई वडिलांच्या सुख दुःखात कामास येत असते.

तेव्हा आई ही लटक्या रागाने म्हणते जा बाई तुझ्या घरी तेव्हा ती म्हणते—

**नको धाडू माय बाई, दुसराना घर ।**
**गोड लागे कोल्ली मोल्ली, तुन्हा हातनी भाकर ॥ (५२)**

अग मी तूर्त सासरी जाणार नाही. मला तुझ्या हाताची कोरडी ओरडी विना तिखटाची भाकरी, शिळी भाकरीच गोड लागते. तुझ्या हाताच्या अन्नातही गोडी समावलेली आहे.

दुःखात ती मुलीला उपदेशिते—

**पुत्र पुत्र करता, नको डोयाले लावू धारी ।**
**माय कशी म्हने, धीर गंभीर लेवं नारी ॥ (५३)**

अग बाई पुत्र होत नाही म्हणून रात्रंदिवस शोक करीत बसू नकोस. आई म्हणते जरा धीर धर. गांभीर्याने त्याचा विचार कर. कारण शेवटी देव आहे. "पुत्रना देणार देव कैलासे नांदस".

सर्वांचा एकच देव आहे हे सर्व धर्म समभाव व्यक्त करतांना ती म्हणते—

**सकायना पहाटे, हाडचा करे कावऽ कावऽऽ ।**
**माय कशी म्हने, धाया दुब्याना एक देव ॥ (५४)**

सकाळी उठून दाराशी आढयावर कावळा बसून काव ऽ काव ऽऽ करतो. तेव्हा आई म्हणते अग गरीब आणि श्रीमंताचा सर्वांचा एकच देव असतो.

'God is one' याची प्रचिती तिच्या काव्यांत येते. ती महान संत आहे. तत्वज्ञान तिच्या काव्यात ओतप्रोत भरलेले आढळते. देव पावतो, मुलगा होतो. लहानपणी ती मुलाची डोळ्यात तेल घालून काळजी घेते त्याचे वर्णन करतांना म्हणते—

**तान्हानी नजर, उतारू मीठ मेथ्या ।**
**लेकले ईचारू, बाया जातान्या कोन व्हत्या ॥ (५५)**

मी माझ्या मुलीची नजर मीठ व मेथ्या ओवाळून काढते. नजर दृष्ट उतारणे याला अहिराणीत 'कुईक' असे म्हणतात. त्याला किंवा तिला कोणाची तरी 'कुईक' झाली आहे. ती बाळाला विचारते तुझ्याकडे, तुझ्या सौंदर्याकडे पाहून मनात हुसणाऱ्या त्या बाया कोणत्या प्रकारच्या, जातीच्या होत्या? अनेक जातीच्या बाया तिच्याकडे येत असाव्यात. जातीय सलोखा तिच्या काळात होता. किंवा स्वभावाची जात तिला या ठिकाणी अभिप्रेत असावी.

बालसंगोपनात प्रत्येक बारीक सारीक गोष्टीत ती दक्ष आहे. ती म्हणते—

**दारसेना नंदी, नंदी मांगस खेवाले ।**
**माय कशी म्हने, शिंगड मारीन हियाले ॥ (५६)**

घराच्या दारापुढे बैलजोडी बांधली आहे, लहानबाळ एक बैल खेळावयास मागतो. आई म्हणते अरे वेड्या! तो तुझ्या हृदयाला त्याच्या शिंगांनी जखम करील ना? त्याल मुळीच इजा होता कामा नये.

आईने संततीसाठी किती त्रास घेतलेला आहे याच वर्णन ती करते—

**नको करू धाया, बंधु मावलीन्या हिना ।**
**डोयाना कया दिवा, तय हातना पायना । (५७)**

अरे भाऊ! आईची उतारवयात 'फजिती' करू नकोस. तिला डिवचू नकोस. दुखवू नकोस. तिने तुला लहानाचा मोठा करतांना डोळ्याचा दिवा केलेला आहे. स्वतःच्या तळहाताचा पाळणा करून तुझी जोपासना अलगत फुलासारखी केली आहे तू उपकाराची जाणीव ठेव. कृतघ्न होवू नकोस.

काही वेळेस अनेक पुत्र असूनही आईची स्थिती कशी गंभीर असते याचे वर्णन ती करते—

**गांधारी व्हती माय, पोर शंभरनी माय ।।**
**शेवटनी ये येता, पानी देवाले नही बाय ।। (५८)**

अगबाई गांधारी शंभर मुलांची आई होती. पण मृत्यू समयी तिच्या मुखात पाणी टाकायला एक बाळ हजर नव्हता त्यावेळेस त्या आईचे हृदय काय म्हणत असेल ग. तिचा महाभारताचा ऐकून अभ्यास आहे.

पुढे ती म्हणते—

**बारा वरीसना पुतरु, झाया अस्तोरीना ।**
**मावलीनी जात एडी, ईडा बिन्हा कस्तोरीना ।। (५९)**

मुलगा बारा वर्षाचा झाला त्याला पत्नी प्रेमाने ओढून घेतले. तो पत्नी इच्छेने वागताना आईला संपूर्ण विसरला (आईला आपल्या अपत्याचे सुख पाहून अत्यानंद होतो तो निर्व्याज असतो. चिरकाल टिकतो) तरी देखील आईची वेडी माया त्याच्यावर असतेच. ती त्याला केशर, कस्तुरी, हिंग सारखे पौष्टिक पदार्थ खावयास देते. आपली आदब, आदर व परंपरा ती कायम ठेवते.

आईची निंदा करणाऱ्या भावाला ती म्हणते—

**माऊलीनी निंदा, नको करू रे चंडाय ।**
**बत्तीस धारासना, मुखे लावाना पंढाय ।। (६०)**

अरे आईचे अनंत उपकार आहेत. ते आपणास कोणत्याही प्रकारे फेडता येणार नाहीत. तू आईची निंदा, नालस्ती, अवमान करू नकोस. हरामखोरा! चांडाळा!! अरे तू लहान असताना तीने आपल्या अंगावरील दूध स्तनाच्या मार्गे तुझ्या तोंडात

ओतून बत्तीस धारा प्रत्येक वेळी टाकून भरपूर दूध पाजून, लहानाचे मोठे केले आहे. वाढविले आहे. तिची 'इज्जत' कमी करू नकोस. अपशब्द बोलू नकोस.

पुढे ती म्हणते—

**पुतरुनी माय, तुल्हे बारा बरसे काय ।**
**लेक व्हता कमावता, रासी पडती रानोमाय ।। (६१)**

अग बाई एवढ्या एवढ्या गोष्टींवर तू नाराज होवू नकोस तुला फक्त सीतेसारखा बारा वर्षे वनवास आहे. तुझा मुलगा बारा वर्षाचा झाल्यावर तो कमावता होईल. तुझे घर धनधान्याने समृद्ध होईल. तुला घरी-दारी ऐश्वर्य येईल.

मुलगा मोठा होतो तेव्हा ती म्हणते—

**पांटील बोलस, कुयकर्नी कागदले ।**
**नादान लेक मन्हा, ध्यान ठेव सबदले ।। (६२)**

मुलगा मोठा झाला आहे. त्याला व्यवहार ज्ञानाचे धडे देतांना चावडीवर ती म्हणते, पोलीस पाटील, मुलकी पाटील बोलत आहेत, कुळकर्णी अप्पा (तलाटी) लिहून घेता आहेत. शेताच्या पिकाची आणेवारी लावण चालू असावी अरे मुला! ते काय म्हणतात त्याकडे लक्ष दे.

पुढे दारिद्र येत तेव्हां ती म्हणते--

**पडा तुले दिन, नको करू कढू मढू ।**
**अज्ञान लेक मन्हा, नको धायाना पाया पडू ।। (६३)**

अरे संसार ही दुपारची छाया आहे. अरे अलिकडे तुला गरिबी आली आहे, भिवून जावू नकोस, हिंमत हारू नकोस, धैर्याने तोंड दे. नाराज न होता संकटांचा सामना कर. 'हेही दिवस निघून जातील'. लक्षात ठेव, अरे बेटा केवळ दारिद्रय म्हणून श्रीमंतांचे पाय चाटू नकोस. चमचेगीरी नको. स्वावलंबी होवून स्वाभिमानाने जगायला शिक.

घरातील सर्व श्रीमंत होण्यासाठी जिद्दीने कामाला लागतात त्यात ती स्वतः घरातील काम वाटून घेते. 'दृढ निर्धार ''सपाटून काम' तेव्हा ती म्हणते—

**उगना सुरया, ऊनं पडन वंडीवर ।**
**भागनी माय मन्ही, नातु रवाडे मांडीवर ।। (६४)**

सूर्योदय झालेला आहे. दिवस कासरा भर वर आला आहे. उन्हे पडवीवर पडली आहेत. माझी भाग्यवान आई. आपल्या मांडीवर नातवंडांना खेळवित बसली आहे. बाकीचे शेतीवर काबाडकष्ट करण्यासाठी गेल्याने मुलं सांभाळण्याची जबाबदारी तिने आपल्याकडे घेतली आहे.

अन् शेवटी मुलामुलींची काळजी घेत घेत, संसाराचा बोजा उचलत उचलत' खस्ता खाता खाता तिला वार्धक्य येते. ती वैकुंठधामला रवाना होते. नंतर तिच्या आठवणींना उमाळा येतो तेव्हा ती म्हणते—

**आंबाना बने, गोसायी लाये धुनी ।**
**सर्गे गयी माय, माले माहेर लागे धुनी ।। (६५)**

आंब्याच्या राईत विरक्त गोसावी बुवाने काटक्यांची धुनी लावली आहे. त्याला संसारात 'राम' वाटत नाही, रस नाही. त्याप्रमाणे आई स्वर्गवाशी झाल्याने मला माहेर हे विराण वाटते. आईने चांगले कृत्य केल्यामुळे ती स्वर्गातच गेली आहे. अशी तिची पूर्ण खात्री आहे. तिचा आत्मविश्वास दांडगा आहे.

पुढे ती म्हणते—

**गोरा मन्हा रंग, रूप लिवू वं भिलनीन ।**
**सर्गे गयी काशी, नांव काढू वं मालनीन ।। (६६)**

मी अतिशय रूप सुंदर आहे. गोरी गोमटी देखणी आहे. परंतु शेतात काम करताना मी अंगावर धुळ माती घेते. माटी-कुटी मुळे माझे रूप जंगलातल्या 'भिल्लिणी' प्रमाणे होते. कष्ट करणे विषयी आईची शिकवण आहे. आई स्वर्गवाशी झाली आहे. तिच्या घातलेल्या आदर्शाप्रमाणे मी अहोरात्र कष्टून तिचे 'नाव' काढते आहे. तिच्या आत्म्याला शांती देत आहे.

पुढे ती म्हणते—

**माय माय करू, माय सोनीया नी पिंड ।**
**फिरी ऊनु काशी खंड, नही दिख मायन तोंड ।। (६७)**

आईचा स्वर्गवास झाला आहे. आई सोन्याची पिंड होती. काशी क्षेत्री देवदेवताचा वास आहे. परंतु संपूर्ण काशी खंड फिरून आल्यावरही आईची मूर्ति मला कोठेच आढळून आली नाही. 'तीन खंड पृथ्वी व एक खंड काशी' अशी अहिराणी म्हण आहे.

पुढे ती म्हणते—

**बारिक पिढनी, भाकर चवघडी ।**
**मायना सयपाकनी, याद येये घडीघडी ।। (६८)**

आईचा स्वर्गवास झाला आहे. आईची वेळोवेळी, सतत आठवण येते. असा आयुष्यातला एकही क्षण जात नाही की, ज्या क्षणाला आईचे विस्मरण होत नाही. आई बारिक पिठाची, लुगड्याच्या चौघडीसारखी बारिक भाकरी टाकायची, रांधण्याची कला तिला अवगत असून त्यात ती पारंगत होती. तिच्या स्वयंपाकाला चव देखील वेगळी होती त्याचीच आज पुन्हा पुन्हा जास्त आठवण येते आहे.

पुढे ती म्हणते—

**माय माय करू, माय साखरनी रास ।**
**रास पडी खास, खरा जीवले वनवास ।। (६९)**

आईचा स्वर्गवास झाला आहे. आईचा स्वभाव साखरेच्या ढिगाऱ्यासारखा गोड होता. तो गोड स्वभाव काळाच्या खाईत, उदरात लुप्त झाला आहे. खरे बोलणाऱ्या अशा मला एकांतवासांत जीवन कंठावे लागत आहे.

अन सरते शेवटी मातेचा महिमा वर्णन करताना ती म्हणते—

**मायनी वं सर, कोन करे वं दुन्यामा ।**
**मायना करता, देव सरगे झुरणीमां ।। (७०)**

अहो या जगातच काय पण स्वर्गातही आईच्या मायेची, वात्सल्याची, प्रेमाची कुणीही दुसरी नात्यातली व्यक्ती बरोबरी करू शकणार नाही. 'आई म्हणजे आई, तिला पर्यायी उपमाच नाही'. जग निर्माता, पालनहार, त्राता, जगत्जेता प्रभू देखील बिचारा स्वर्गात आईसाठी खंत करीत बसला आहे. झुरतो आहे. कारण तो स्वयंभू आहे त्याला मायेची आई नाही. 'स्वामी तिन्ही जगाचा आई विना भिकारी' हेच तत्त्व पुढे तिने जगातील कविला दिले असावे.

असा हा आईचा महिमा गाताना खास करून एका गोष्टीचे विस्मरण झाल्या-शिवाय राहत नाही. एका व्यक्तीच एका रूप सुंदरीवर नितांत प्रेम असते. तो तिच्या प्रेमात पडल्यावर तिच्या प्रेमाच्या बदल्यात काय देवू म्हणून विचारणा करतो त्यावेळी सर्व आणाभाका होतात. लग्न करण्यासाठी जी एक अट असते त्यात त्याने प्रेयसीला आपल्या जन्मदेत्या आईचा 'कलेजा' आणून द्यावा असे ठरते. "तुमच्या आईचा 'कलेजा'चा तुकडा कापून माझ्या चरणी अर्पण करा मी तुमची राणी होईन व हवं ते सर्व देईन." तो विषयलंपट धावत घरी आला. झालेली हकीगत त्याने आईला सांगितली. आई पुत्रसुखासाठी त्यागास तयार झाली. तिने जवळ पडलेल्या खंजीराने आपला कलेजा मुलास कापावयास सांगितला. त्याने तसे केल्यावर तो धावतच प्रेयसीकडे जावयास निघाला. मध्येच धापा टाकत पडत तो एकदाचा प्रेयसीपाशी पोहचला. अत्यानंदाने तो प्रेयसीच्या पायाशी पडताना ठोकर लागून जमिनीवर आदळला. कलेजा बाजूला पडला त्यातून आवाज आला 'बाळ! तुला तुझ्या जीवाला कुठे दुखापत झाली नाही ना?' त्याला आईची महती पटते हे पाहून प्रेयसी त्याला ठोकरते. तो आत्महत्त्या करतो. 'कुपुत्रो जायते कश्चित कुमाता न भवति' हेच खरे.

'दहा आठे एंशी, आईचे नाते निसर्गाशी' अशी ही निसर्गरूप झालेली आई अन् तिची थोरवी जगाच्या वाळवंटातील हिरवळीप्रमाणे आहे. आई जन्म देवून मुलाला हळूवार अंतःकरणाने जोपासते. 'हंसतील त्याचे दांत दिसतील' असा उपदेश करणारी आई सुखी जीवन, परित्यक्तेचे जीवन, पवित्र जीवन, मंगल जीवन, सेवाभावी जीवन, प्रेमळ जीवन, सोज्वल जीवन, निरोगी जीवन, निर्मळ जीवन, दिर्घायुष्यरोग्य जगते. धांय मोकलून रडते तर कधी व्याकुळतेने ओकाळते हे सार आईलाच शक्य होते. जगाच्या रंगभूमिवर तिची विविध रुपे समोर येतात. क्षणोक्षणी आईचे जीवन मुलांसाठी निरस होते. तिचे स्वप्न भंगतात. त्यांचे सर्व आयुष्य आईच्या पंखा-खाली जाते. वडिलांची फक्त असते छाया आईच करते माया. आपले चांगले-वाईट अनुभव आईच्या गळयात हात टाकून ते सांगू शकतात. आई मुलाच्या साहसाचे कौतुक करते. पाखरांच्या थव्याप्रमाणे चिवचिवाट करणाऱ्या निष्पाप बालकांचा आई अनुभव घेते. जगाच्या दुष्टपणा, कठोरपणापासून ती मुलांना लांब ठेवते. आई खळखळणाऱ्या जलौधाप्रमाणे मोहक माया करते. प्रलय, आक्रोष, करूण, भेसूर, संवेदनाक्षम गात्रे अधीर होतात. मस्तक सुन्न होते. अंतःकरणात कालवा कालव होते केवळ तिच्या वियोगानेच. मुलांच्या सुखासाठी आई श्रम घेते. ती जगाचा वारा त्यांना लागू देत नाही. मायेच्या उबाऱ्यात, हृदयाच्या गाभाऱ्यात वाढविते. मूलं दिसली नाहीत म्हणजे ती सैरभैर वेडीपिसी होते. जग आपल्या भोवती फिरत आहे असा तिला भास होतो. मुलांना इजा होताना तिला स्वतःच्या मस्तकावर घणाघात झाल्याचा भास होतो. माझी मूलं जगाच्या पाठीवर कुठेही असली तरी सुखात राहोत असे सर्दैव चिंतन मातृहृदय करीत असते. मातृहृदयाला संतती दुःखाने पिळ पडतो. करपणे, कोळपणे, शोक करणे, सुखदुःखाच्या परिसीमावर शोक वा आनंद व्यक्त करणे, टिपे गाळणे, शाब्दिक सांत्वन करणे हे फक्त आईलाच शक्य होते. जिव्हारी घाव बसल्यावर मातृहृदय शाब्दिक सांत्वनात न बुडता तिच्या अंतकरणात उमाळा, जिव्हाळा, वास करतो. तिला शोकाकूल अवस्थेत भावनांचे बांध फुटतात.

अहिराणी ओव्यांमध्ये आईचं व्यक्तीमत्व लक्ष वेधून घेणारं असं आहे. अंधारमय भविष्य पाहूनही ती खचून जात नाही. तिचा विलक्षण आत्मविश्वास आहे. जीवन अनुभवातून गोळा केलेले हितोपदेश ती मुलीला वेळोवेळी देते. भोगून, सोसून जगण्याची वासना उडत नाही. तिच जिणं महाग, दुर्लक्ष व हवहवस आहे. आईला सासुरवासिनी, घरातील कर्ती, अनेक मुलांची आई, सासू, विधवा अशा अनेक भूमिकांमधून तिची छाया प्रकाश रंगसंगती आहे. या सर्वांमधून तिची व्यक्तीरेखा जीवंत उठावदार ठरली आहे. आईची थोरवी 'नाते' या भूमिकेतून गातांना अहिराणी स्त्रीने वरील विचारात परामर्श घेतलेला आपणास आढळतो.

आयुष्यातून जीवनाचा अंश देवू केला तरी आईच्या नात्यातील मांगल्य कणभरही कमी होत नाही. कोण्या मराठी कवितेत······हेच आढळते······हाच भाव ! कवी म्हणतो—

"चला खाचण्यांला जाऊ, जन्मदेत्या 'सोनाई' पाहू ।
मायबोलीच्या संशोधना, अहिराणी ओव्या घेवू ॥
अहिराणीची 'नातीगोती', जमवीत पान पान ।
श्रोते निवतील कान, 'कृष्णा' डोळा समाधान ॥ "

• • •

# आईबा (बाप, वडील)

देण्या-घेण्या पलीकडे जुळलेली, काळाबरोबर दृढ होत जाणारी अशी अहिराणी बोलीतील 'नाती-गोती' विचारात घेत असताना प्रामुख्याने अग्रक्रम असलेले प्रातःसमयी नित्य स्मरणीय 'मातृ' (माय) हे संपल्यावर, 'आईची माया अन् आंब्याची छाया' अशा शितल छायेतून बाहेर पडल्यावर, कर्तव्याच्या कठोर मार्गावर मार्गक्रमण करताना शिस्त व प्रशासनप्रिय व्यक्तीमत्व जोपासणारं नातं 'पोटात माया व उपरण्याला दाया' अशी अहिराणी म्हण सार्थ करणाऱ्या 'मातृःदेवोभव' नंतर 'पितृःदेवोभव' मधील पित्याचा अनुक्रमांक येतो. बाप म्हटला म्हणजे कर्तव्याची कराड कठोरता प्रसिद्धच आहे. बाप म्हणजे जबाबदारी असे समीकरण मांडायला काहीच हरकत नाही. रोजच्या व्यवहारात आपण सहज म्हणून जातो, अहो! हे सारे करायला काय मी तुझा बाप लागतो किंवा लुटायला काय तुझ्या बापाचा माल आहे काय? इत्यादी. वंश सातत्याच्या अनुवंशिक गुणांमुळे अपत्ये जन्माला घालणे ही जशी बापाची जबाबदारी आहे त्याचप्रमाणे मुलांच्या पालनपोषण, शिक्षण, संरक्षण देणे, त्यांना सुदृढ करणे, सुसंस्कारित करणे याची सारी जबाबदारी बापावर असते. मुलांचे व मुलींचे बाबतीत विवाहयोग्य होईपावेतो सर्व जबाबदाऱ्या बापावर असतात. काही अपवाद वगळता सर्वच मुलंमुली आपल्या वडिलां-बद्दल आदरयुक्त भीती बाळगतात. आईच्या लाडात मुले वाढतात तशी ती बापाच्या शिस्तीत लहानाची मोठी होताना जोपासली जातात. बाप बरोबर शिस्त. 'वज्रादपि कठोरानी, मृदूनि कुसुमादपि' अशी भूमिका नेहमीच 'बाप' या नात्याला वेळप्रसंगानुसार बजवावी लागते. 'बाप' म्हणजे सर्वश्रेष्ठ अशी ही व्याख्या काही ठिकाणी केलेली आढळते. 'पितृऋण' फेडणे एक दिव्य असते. हा शब्द द्विअर्थी वापरला जातो. कारण ख्रिस्ती धर्माप्रमाणे येशुला आकाशतला बापा! असे संबोधतात. हिंदू धर्मात जगत्नियंता परमात्मा हाच साऱ्यांचा बाप असे मान्य करतात. 'God is father's father' हेच खरे.

अहिराणी संस्कृतीत दोन्ही नाते पुजनीय आहेत. एक मराठी कवी म्हणतो 'आई बाप हे दैवत माझे, असता माझे घरी, कशाला जाऊ मी पंढरपुरी' अन् हीच भावना जनमानसात बिंबलेली आढळते. अहिराणी लोकसाहित्यात याचा आवर्जून उल्लेख आढळतो. विशेषकरून जात्यांवरील ओव्यांमध्ये बापाची—वडिलांची—महती गाईलेली आढळते. अहिराणीत बाप-पिता-वडील-फादर या अर्थाने एक चांगला योग्य, अर्थपूर्ण शब्द वापरलेला आढळतो अन् तो आहे 'आयबा' उर्फ 'आईबा'. बापाबद्दल 'आईबा' इतका सुटेबल शब्द अहिराणी बोली सोडून जगातील कोणत्याही भाषेत आढळत नाही. आई+बाप=

आईबा असे नाते त्या शब्दात उमटते. अहिराणी संस्कृतीत गांवातील एखादी वडिलधारी व्यक्ती 'देवआज्ञा' झाली तर मृताच्या घरी गावातील स्त्रिया गोळा होऊन दु:ख प्रदर्शन करताना 'मना आईबा रेऽ, अहुंऽऽ' असे वर्णून वर्णून रडतात. याचा अर्थ तू गावातील सर्व स्त्री-पुरुषांना आईबापाचं प्रेम देत होतास. तुझ्या मृत्युने आमच्यात पोकळी निर्माण झाली आहे. तू अगोदर बाप व मग आई होतास. दोघांच्या मायेचा जिथं संगम आहे, मायेची पखरण व कर्तव्य यांचे ज्या विशिष्ट अवस्थेत मिलन होते ती जगण्याची जिद्द असलेले व्यक्तिमत्व म्हणजे 'आईबा' होय. वयात आल्यावर निसर्गाच्या पुण्याईनं ('वंश-सांतत्य') बापाची भूमिका वठविण्याची जबाबदारी जगाच्या रंगभूमिवर प्रत्येकावरच येते. अपवाद असतात ते विरळे! बापाचे पात्र अनेकविध पैलुतून आपलं कर्तव्य बजावत असते. बापाच्या अनाकलनीय नात्याबद्दल जेवढे आजवर लिहिले गेले आहे ते थोडेच आहे. त्यात भर म्हणून औद्योगिकरणामुळे, बोलीविषयीच्या अप्रतिष्ठेमुळे, घरोघर घट्या, घरोटे, जाते बंद झाल्यामुळे दुर्मिळ, दुरापास्त होत चाललेल्या अलिखित, अडाणी स्त्रियांनी गाईलेल्या दुर्मिळ संकलित ओव्यांच्या उपलब्धीचा परामर्श घेणे वावगे ठरू नये. मराठीतही हे नाते उकलण्याचा प्रत्येकाने आप-आपल्या परीने प्रयत्न केलेला आढळतो. एक कवी म्हणतो, "तदा बापाचे हृदय कसे होते? न, ये, सांगता अनुभवी जाणती जे" काही वेळेस बापाच्या अनाकलनीय भावनांचा पेव फुटतो. त्यासाठी बापच व्हावयास हवे.

पितृछायेत माणूस वाढत जातो. त्याच्या व्यक्तिमत्वाला पैलू पडतात ते बापाच्या व्यर्थ कठोरते मुळेच. अहिराणी संस्कृतीत पितृसत्ताक कुटुंबपद्धती आढळते. कुटुंब प्रमुख पिता-प्रमुख असतो. तो जन्म देता धनी असतो. परंपरेने स्थावर जंगमचा सर्व वारसा बापानंतर मोठ्या मुलाला व इतर मुलांना मिळतो. राजगादीच्या बाबतीत मोठ्या मुलाला अग्रक्रम असायचा असे इतिहासावरून आढळून येते. वार्धक्यात मुलगा बापाची देखरेख करतो. परवरिश करतो. मुलगा वयात आला की, त्याला 'बाबा म्हणण्याची या संस्कृतीत प्रथा आहे. 'Child is a father of man' अशी म्हण आहे. ते याचे शब्दश: भाषांतर असावे. 'आईची माया ओठात, तर बापाची पोटात.' बापाच कर्तव्य निभावणं अग्नीदिव्य असते. आईनंतर मुलांवर चांगले संस्कार बापच करतो. व्यसनी बाप काही वेळेस आपला रस्ता चुकतो. अहिराणीत 'घोकत ईद्या, खोदत पानी' अशी एक म्हण प्रचलित आहे. ती बापाचा उपदेश म्हणून ओळखली जाते. 'प्राप्ते तूं षोडसे वर्षे पुत्रमित्रावदत् चरेत' मुलगा सोळा वर्षाचा झाला की त्याला मित्राप्रमाणे मोकळीक द्यावी. एक अहिराणी स्त्री म्हणते 'बाप न व जोड, जोड आंडोरले झाय। जोवान झायी माटी, अेडा बापले काय कये ?' ।। बापाचा जोडा मुलाच्या पायात यावयास लागला की, तो तरुण झाला हे तिचे मोजयंत्र तंतोतंत बरोबर आहे. अन् तेव्हाच बापाची कर्तव्ये संपुष्टात येतात व नंतर बापजादाचे पूर्व पुण्य व आशिर्वाद ह्या तरुण मुलांना जगण्याचे भांडवल होते. त्यांची शिकवण ही मुलांची मार्गदर्शक तत्त्वे होतात

बडिलांविषयीच्या आदर, करुणा, प्रेमाच्या भावनांनी अपत्ये भारावून जातात. बाप वरवर कठोर भासत असला तरी त्याची अंतर्यामी कोमल भावना असते. त्याला आपल्या अंतरीच्या दु:खद छटा क्वचित पसरविता येतात. त्याचे सारे काही आपल्या अपत्या संतानासाठीच असते.

काही अपरिहार्य कारणांनी दिवसेंदिवस दुर्मिळ, दुरापास्त होवू घातलेल्या अहिराणी 'ओव्या' मी संशोधनासाठी गोळा करीत असताना असे आढळून आले की, प्रत्यक्ष बापाची, पित्याची वर्णनं करणाऱ्या ओव्या, गीते अहिराणी लोकसाहित्यात नाहीतच. परंतु अप्रत्यक्षरित्या बापाच्या गुणांचे, स्वभाव वैशिष्टचांची वर्णने करणारी अशी कित्येक गीते मात्र माऊल्यांकडून मी प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे मिळविलीत.

आपल्या वडिलांविषयी एक स्त्री जात्यावर गीत म्हणते—

**जलम दिसन, बाप झाया कां बामन ।**
**जलम देती माय, नव मयना जामीन ॥** (१)

अग बाई, बापाने मला फक्त जन्माला घालण्याचे निहित कर्तव्य पार पाडले. ते अलग झाले. बापाचे व बालसंगोपनाचे सोवळे असते. आईने मात्र माझा गर्भ तिच्या गर्भाशयात नऊ महिने, नऊ दिवस सांभाळला, जोपासला. ती गर्भाला उदर कैदेत 'जामीन होती. तिने खारे, आलोणे खाल्ले, झाडाला झितऱ्या लावल्या.

वरील ओवीला काहिसा अध्यात्म्याचा वास येतो. संभोगाचे वेळी वीर्य बिंदू सटकल्यावर बाप कर्तव्य करून काळजीतून मुक्त झाला. आई वडील तिला सारखेच प्रिय आहेत. बापाने जन्माला घातले नसते तर हे जग मला दिसले नसते. तसेच आईच्या कष्टाची पण ती पावती देवून या ओवीत ती 'कृतज्ञता' व्यक्त करते.

पुढे ती म्हणते—

**बाप कसा म्हने, लेक भंडारीनं सोनं ।**
**सोनं झाय जुनं, लेकं परायीनं धनं ॥** (२)

माझे वडील माझ्या लहानपणी मला पाहून म्हणायचे, माझी मुलगी भंडारीतील जतन केलेले सोनं आहे (भंडारी=गावठी तिजोरी) सुंदर, सुरेख आहे. सुशील आहे. लावण्यलतिक आहे. 'सर्वे गुण: कांचनम् आश्रयन्ती:' पण त्याचा हो काय उपयोग. सोनं जुनं झाल्यावर ( मुलगी वयाने वाढल्यावर, विवाह योग्य, तरुण उपवर झाल्यावर) हे जतन केलेलं, सांभाळलेलं संरक्षित सोनं, परक्याच धनं होईल. पूर्वीच्या काळी तिजोऱ्या नसल्याने घरातील लहान कपाटीत जी भिंतीत गाडलेली असायची, तीत पैसा अडका, सोन नाणं साठवून ठेवायचे. भिंती दगडी असायच्या. चोरांची भीती उरत नसे. अहिराणी संस्कृतीचा काळ सुवर्ण युग असावा. भारत सुवर्ण भूमि असावी त्यावेळी याची

साक्ष तिच्या काव्यात मिळते. गोऱ्या गोमटया सोनेरी केसाच्या आपल्या सोनचिडीला (मुलीला) पाहून तिला सोन्याची उपमा सुचली असावी.

पुढे ती म्हणते—

**बाप कसा म्हने, लेक तांदुयनी कनी।**
**नव मयना माय बागे, व्हये परायीन धनी ।। (३)**

वडील म्हणतात माझी मुलगी तांदळाच्या दाण्यासारखी पांढऱ्या स्वच्छ रंगाची, स्वच्छ, अक्षय (निरोगी), शिलवान (डाग नसलेली) व विविधोपयोगी आहे. अहो पण खेदाने म्हणावेसे वाटते की, आई नऊ महिने गर्भाशयात तिचे साडे-तीन शेर ओझे सांभाळते, वाढविते, जोपासते. त्या काळात काळजी घेते. पथ्ये पाळते. खारे आलोणे खाऊन वाढविलेली ही सुंदरी शेवटी परकीच होते व परक्याचे धन होते. दुसराच (तिचा नवरा) तिचा धनी (मालक) होतो. ती विवाह करून परघर जाते. आई बापाला लळा लावून.

परक्याची झाल्यावर ती आई वडीलांचे वर्णन करते—

**बाप मन्हा चाफा, माय मन्ही चंपाकई।**
**चंपाकईना मांडिवर, जपमाल्हे लागीगई ।। (४)**

अहो ! माझे वडील सोनचाफ्याच्या पांढऱ्या सुगंधी फुलासारखे मजाने आहेत. तर आई चंपाकलीच्या नाजूक, अलवार, पिवळसर सुगंधी फुलाप्रमाणे मायाळू, प्रेमळ स्वभावाची आहे. अग बाई मी या मायेच्या बगीच्यात रममाण होते. आईच्या प्रेमाच्या धुंद फुंद सहवासात मी तिच्या मांडीवर झोपली आहे. मला तेथेच गाढ झोप लागली आहे. 'चाफा बोलेना . . . . . .' परिसरातील उपमा तिच्या काव्यात डोकावतात. निसर्गाच्या जवळ जाण्याच्या ती प्रयत्नात आहे.

पुढे ती म्हणते—

**मायीना मयामां, अस्सल भेद वं कोनता।**
**आईबानी सर, काय करीन चुलता ।। (५)**

माळयाच्या मळयात सारीच फुले असतात. माळी सर्व फुलांवर सारखं प्रेम करतो. सर्व फूल त्याला सारखीच. मळा एकच. तथापि प्रत्येक फुलाचे आपले स्वातंत्र्य वैशिष्ट्य असते. वैचित्र्य असते. बाबा अन् लहान काका एकाच आजोबाची मूलं असली तरी माझ्यावर प्रेम, माया लावण्यात बाबांची बरोबरी काका कसे करतील बरे ? बाबा ते बाबाच !

पुढे ती म्हणते—

**माय तुन्ही माया, धरमा नी धरमां।**
**आई बानी माया, सातपुडया ना धुरमां ।। (६)**

अग आई तू फक्त घरात वात्सल्य, प्रेम, लळा पुरविते. लाड करते. तू कुलीन पडदानशिन असल्याने बाहेर जाण्यास तुला मर्यादा पडतात ना ? अग माझ्या वडिलांची माया सातपुडा डोंगरा एवढी उंच, अफाट आहे (ते 'गवत' कापायला जातांना तेथून 'बोर, आवळे' आणित असावेत). वर वर कठोर दिसणाऱ्या पर्वतप्राय बापाच्या पोटात प्रेमाचे झरे तिला सापडतात. वर करणी 'तात्या' तिला कठोर ताठ, कणखर 'पहाड' वाटतात.

पुढे ती म्हणते—

**लाडकी व लेकं, तुन्हा लाड बजारमां।**
**साखर फुटाना, तुन्हा आई बाना पदरमां ।। (७)**

अग माझ्या लाडक्या मुली ! तुझे बाबा तुझे कोड-कौतुक, लाड गांव-बाजारांत पुरवितात. तुझा हट्ट पुरा करतात. पहाना तुझ्यासाठी त्यांनी साखर-फुटाण्याचा 'खाऊ' घेवून स्वतः-च्या सालुला बांधलेल्या उपरण्याला बांधला आहे. (त्यावेळी पिशव्या नसाव्यात.) दाळचा, फुटाणे, साखर फुटाणे, लाह्या, मुरमुरे हे त्यावेळी खाद्य पदार्थ बाजारात उपलब्ध असावेत. भजी, जिलेबी, शेव या आरोग्यघातक पदार्थांना थारा नसावा.

बापाने बाजारातून आणलेले साखर-फुटाणे देण्यासाठी, भातकुले देण्यासाठी ते मुलीला हांक मारतात त्याचे वर्णन ती करते—

**लाडकी वं लेक, तुन्ह नांव 'सीता-गीता'।**
**आसां हांका मारे, कोड कौतुक्या तुन्हा पिता ।। (८)**

अग बाई लाडक्या मुली, तुझे नाव सीता (पवित्रतेचे प्रतिक) आहे. अग तुला तुझे वडील 'सीता-गीता' अशा जोड नावाने लाडाने, कौतुकाने हाका मारतात. तुझे जास्त कौतुक करतात. 'गीता' (ज्ञानाचे प्रतिक) आहे. अशाने दोन्ही मुली असल्याचे समाधान पित्याला मिळत असले पाहिजे किंवा त्या काळात तशी जोडनांवे ठेवण्याची पद्धत असावी.

मुलगी ही बापाला लळा लावते तेव्हा तिला बजावतांना एक अहिराणी स्त्री म्हणते—

**लाडकीवं लेकं, बापमान नको जेवूं।**
**परायी घर जानं, जास्त मया नको लावू ।। (९)**

अग माझ्या लाडक्या मुली, अग वडिलांच्या ताटात एकत्र जेवायला बसू नकोस ( तू मोठी होत आहेस). जास्त लाडी गोडी लावशील तर लळा वाटेल. त्यानंतर माया सोडून परक्याचे घरी जाणे तुझ्या जीवांवर येईल. परक्याच्या घरी जायचे असल्याने 'थोडी' रहा. ( हे घर सोडतांना तुला अत्यंत दुःख होईल. यातना असह्य होतील. सासरी जाणे मुश्किल होईल. कारण वडिलांचे 'मायापाश' तुटणार नाहीत.)

तेव्हां ती आईला म्हणते—

**समदीर समदीर, समदीर मन्हा पित्ता।**
**उतरीसन देखूं, माय भरेल कां रिता ।। (१०)**

अग समुद्र म्हणजे समुद्रच त्याला दुसरी उपमा कुठली. तो अथांग अठाक असणारच. माझ्या वडिलांचे मन समुद्राएवढे आहे. अन् त्यांची माया पण तेवढीच! त्याचा अंत मिळायचा नाही. मी जरा अंतःकरणात खोल शिरून ती माया ओली की कोरडी, वर वर आहे याचा ठाव घेते आहे. वडिलांच्या स्वभावाच्या सहनशिलतेच्या परिसीमेला 'समुद्र' अशी उपमा दिलेली आहे.

बाबांची ओली माया आहे. ते हौशाच्या वस्तू घेतात व देतात तेव्हां ती म्हणते—

**काई चंद्रसाडी, घडी मोडू मी बाजवरी।**
**बारीक घालू मिरी, आईबा ना राजवरी ।। (११)**

काळया रंगाच्या, चंद्रकोरीची पांढरी किनार (काठ) असलेली रेशमी साडीला माती लागून घाण होवू नये म्हणून गोऱ्या रंगाची ती खाटेवर साडी मोकळी करून अंगावर नेसते, ढाकते, शृंगारते. बारीक मिऱ्या घालते म्हणजे मुळांत सुंदर असलेली ती अधिक उठावदार, भडक दिसायला लागते. भरदार टंचपणा अधिक खुलून दिसतो. ढाकण्याच हेच वय. वडिलांच्या जीवावर हौस, मौज, उन्माद, उच्छाद करते.

त्या बरोबर ती कष्टही करीत असते. ती म्हणते—

**काम करी करी, मन्हा दुखेत नखे बोटे।**
**आईबा कस म्हने, लेकं 'सखवार' ऊनी पोटे ।। (१२)**

मी शेतावर काम करते. मी घरातील कामधंदा आवरते. त्यामुळे माझे हातापायाची बोटे दुखतात. त्यांना असह्य यातना होतात हे पाहून वडील म्हणतात माझी मुलगी शकू, सकवार (सुकुमार) आहे.

या वर वर्णित सुकुमार, नाजूक, टंच, सुडौल मुलीला चांगल्या स्थळी दिलं पाहिजे याची चिंता बापाला लागते. ते भरपूर कष्ट करतात तेव्हा त्याचं वर्णन ती करते—

**काया वावरमां, धवया नंदीन औत।**
**रातदिन राबणारा, बाप कुनबी गावांत ।। (१३)**

काळया रंगाच्या शेतात, पांढरी ठेलारी जोडी औताला जोडून वडील नेहमी 'औत' चालवून शेतीची मशागत करीत असतात. अहो असा रात्रंदिवस मेहनत करणारा, राबणारा दुसरा कुणबी आमच्या गावात शोधून कुठे सापडायचा नाही!

अशी ती लग्नाची होते. बापाचे 'हुंडा' लावण्यासाठी कष्ट सुरू असतांना आई तिच्या सौंदर्याचं वर्णन करते—

**लोकेसन्या लेकी, लेकी धावडान्या बेयी।**
**देवनी दिन्ही एक, लेक सावदानी केयी ।। (१४)**

अहो इतरांच्या, लोकांच्या मुली या धावडा नांवाच्या जातीच्या लाकडाच्या दांडीप्रमाणे १२ ठिकाणी वक्र व अनंत गाठ गुड्या असणाऱ्या (कुरुप, बेढब) आहेत. मला देवाने एकच मुलगी दिली आहे पण तीही सावद्याच्या मळ्यांत निसणाऱ्या सोट केळीच्या कमय-सारखी सुरेख, सुंदर, आकर्षक आहे. [सावदा, यावल तालुक्यातील गांव.]

तिच्या सुंदरतेचे सर्व श्रेय आपल्या नवऱ्याला देत ती पुढे म्हणते—

**ईसनी सोपारी, लेकना बापनी खाऊ नई।**
**उपर झायी केकी, दुजर ले देवो नई ।। (१५)**

अहो ऐकलतं कां? आपले वाड-वडील (तानुबा, म्हादूबा) हे काय सांगून गेले आहेत की, मुलीच्या वडिलांनी तिच्या लग्नात तिच्या सौंदर्याचे पैसे घरात घेवू नये. सौदा करू नये. ते विषाप्रमाणे असतात असे समजावेत. जरी मुलगी विवाह योग्य अथवा उपवर, थोराड, मोठाड झाली तरी चुकुनही तिच्यासाठी बीजवर पाहू नये. वात्सायनी च्या कामशास्त्राचा तिचा सखोल अभ्यास दिसतो.

त्याने दिलेल्या उत्तराच वर्णन ती करते—

**पिता कसे म्हने, लेक मोठ्या जागे देवू।**
**धरबार ईकी टिकी, पैसा आंडरेले लावू ।। (१६)**

अग वडील म्हणतात, मी माझी मुलगी मोठ्या गावाला (सामाजिकदृष्ट्या प्रतिष्ठित असलेले गाव) देईन. वेळ आली तर स्वतःहून शेती-वाडी, स्थावर जंगम विकून सर्व पैसा मुलीच्या लग्नात लावीन. अलिकडच्या भाषेतील हुंड्याचा तो प्रकार असावा.

पुढे ती म्हणते—

**उच्चा, उच्चा खनना, मन्ही पेटीज दाटनी।**
**आईबा तुन्हा राजे, हौस मनना फिटनी ।। (१७)**

अग बाई माझे वडील फार हौसी आहेत. ते मला कपडे लत्ते खूप घेतात. हौसे-मौजेचे घेतात. उंच व चांगल्या प्रतिचे अलग अलग रंगाचे खण व कपडे घेवून एक लोखंडाची पेटी गच्च भरली आहे (भरपूर स्टॉक करून ठेवला आहे). सर्वच गोष्टींचा तारुण्यात हव्यास वाढत जातो. चांगले कपडे घालण्याची हौस पुरविली गेली आहे. तारुण्यांत अति सुखाने 'कंचुकी दाटते' अशा अवस्थेत 'पेटी-कोट' सुद्धा दाटू-तूटू-फाटू-टरकू पहात आहे.

पुढे ती म्हणते—

**बाप ईन राजा, माय आंबारीना हत्ती।**
**सांग माय बाई, लुटु मी कोनत्या गती ।। (१८)**

अग बाई आंबारीच्या हत्तीप्रमाणे खिशात धन, द्रव्य, सोने-नाणे भरलेले माझे वडील आता येतील. अग आई आता तूच सांग ना ग? त्यांच्या खिशातील पैसे कोणत्या प्रकारे व कोणत्या गतीने म्हणजे लवकर लवकर का हळहळू खर्च करावेत. (पूर्वीच्या काळी राजे लोक स्वारीवरून परततांना लुटलेले धन, हत्ती, उंटावर लादून गोणी भरून राजधानीत आणित असत ).

पुढे ती म्हणते—

**बापईन माय, खजिनाना हुट ।**
**सांगस माय बाई, बेटी धीरे धीरे लुट ।। (१९)**

आता माझे वडील बाजारातून घरी येतील. त्यांच्या जवळ सोबत गडगंज पैसा आहे. त्यांच्या कोपरीचे खिसे सोन्याच्या मोहऱ्यांनी तुडुंब भरले आहेत ( वरील ओवीत तिने विचारलेल्या प्रश्नाला ती उत्तर देते ). आई तिला उपदेश करते अग बाई करू नकोस अधाशा सारखी 'गम बडी चीज है'. 'धीर धरी रे धीरापोटी, असली फळे रसाळ गोमटी' आततायीपणा करू नकोस काय घ्यावयाचे ते वडिलांकडून हळूहळू घे. सर्व काही तुझेच आहे व तुलाच मिळेल.

पुढे ती म्हणते—

**इतल लेसी, नी परघरे जासी।**
**आईबाना जीवले, झुया लावसी ।। (२०)**

अग एवढी लुटालुट करूनही तुला इतक देवूनही शेवटी तू परक्याचच धन होणार आहेस व वडिलांना सरतेशेवटी लाडकी अशी तू दूर गेल्याने मनाला यातना होतील. पुत्री-वियोगाचे चटके लागतील.

पुढे ती म्हणते—

**मोठं मन्ह घरं, काम धंदानी ललाटी।**
**आईबाना पोटे, लेक नाजुक शेलाटी ।। (२१)**

आमच खटल फार मोठ आहे. मोठ्या घरात काम धंदयांची धांदल उडते. वडिलांच्या पोटी मी नाजुक, सडपातळ, जन्माला आली आहे. म्हणून मला सर्व कामे चपळाईने करता येतात. (बाबा देखील सडपातळ उंच आहेत).

**मोठ मन्ह घर, धंदा करू मी एकली।**
**आईबा कसा म्हने, आसी लेक नही देखली ।। (२२)**

माझं घर विस्तृत, ऐसपैस आहे. परंतु तिथला सारा कारभार, कामकाज मी एकटीच पाहाते. हे पाहून माझे वडील म्हणतात अहो अशी 'बांकी' मुलगी मी आजवर कुठेच पाहिली नाही. ती अनुपम्य, अजोड आहे.

पुढे ती म्हणते—

**आईबा कसा म्हने, लेक कामडीना तीर।**
**ज्यान्हा घर जासी, त्यान्ह नशीब करे जोर ॥ (२३)**

वडील म्हणतात माझी मुलगी धनुष्य बाणासारखी आहे. कार्य चोख बजावणारी आहे. सोडलेला तीर जसा परत येत नाही तसेच ती काही चांगले करावयाचे ठरविले ते ती पार पाडते. ती सत्यभाषी आहे. ज्या घरात सून म्हणून ही जाईल त्यांचे नशीब उदयास येईल. त्या घराची भरभराट होईल. प्रगती, कल्याण होईल.

एकदा कोण्या तरुण आडदांड पुरुषाशी तिची बोलाचाल भांडण होते तेव्हा अन्यायाची चाड असलेली ती आपल्या बापाचे स्वभावाचे वर्णन करतांना म्हणते—

**पिता मन्हा वाघ, त्यान्हा पोटनी वाघिन।**
**बोलीग्या गवार, झायी जीवनी आगीन ॥ (२४)**

माझा बाप वाघ ( खराब स्वभावाचा माणूस ) आहे. मी त्यांच्या पोटी तशीच जन्माला आली आहे. मी तुझ्या हाती लागणार नाही. तो 'गंवार' आवारा मुलगा वेड-वाकडा बोलला त्याने माझा संताप अनावर झाला आहे. माझ्या अंगाची लाही लाही होत आहे. मी रागाने, संतापाने लालबुंद झाली आहे. ( ती शिलवान आहे ).

होणाऱ्या 'भानगडी' मुळे वडिलांना तिचा तिटकारा येतो तेव्हा ती म्हणते—

**लेकना कटाया नको करू ईठाई।**
**सोनानी सोनबाई, चिडी सारखी उडी जाई ॥ (२५)**

वडिलांना पंढरपूरच्या आराध्य देवता विठ्ठलाचे नावाने संबोधून ती म्हणते, अहो बाबा, माझा कंटाळा करू नका. स्त्री जन्म हा सुवर्णाचा आहे. सध्या असलेल माझं जीवन सोन्याचा क्षण आहे. मी तुमच्या कानातील सोन्याच्या भिकबाळी सारखी आहे. आढयावर भिरभिरणाऱ्या चिमणीसारखी मी केव्हा तरी भुरकन् उडून जाईन. (सासरी निघून जाईल ).

शेजारची स्त्री म्हणते, तू आता जवान झालीस रेसमा ! तुझ्या वडिलांना जावई शोधावयास सांग तेव्हा ती म्हणते—

**बन्सी गहुनी, पिवयी रोटी, पिवयी रोटी।**
**आईबानी वग मोठी, सगा येथीन घरबठी ॥ (२६)**

बन्सी गव्हाची पोळी सकस, पिवळी धमक, अलवार, चवदार असते. तशीच मी आहे. वडिलांचे घराणे नामांकित आहे. प्रतिष्ठित आहे. स्वतःहून देशोदेसचे नातेवाईक मला 'मागणी' घालावयास आपणहून येतील. वडिलांना शोधावयाची आवश्यकता नाही.

पुढे पाहुणे येतात. तिचे लग्न होते. वडिलांचे स्वभाव वैशिष्टयांचे वर्णन करतांना ती म्हणते—

**आईबानी दिन्ही लेक, नही देखी रंग माडी।**
**सोना सारखा मन्हा जीव, माटी सारखा व्हन पडी ॥ (२७)**

माझ्या वडिलांनी माझ्यासाठी जे 'स्थळ' पाहिले ते साधे सरळ बालबोध घराणे आहे आसपेस नाही. श्रीमंती नाही. त्यांची हवेली, रंगमाडी नाही. मी सुकुमार मला तेथे खूपखूप कष्ट करावे लागतील. सोन्यासारखी मी माझ्या जीवाचे मातेरे होईल. (मातीत हात भिजायचे म्हणजे नवरा मुलगा मोठा शेतकरी असावा).

तेव्हा दुसरी स्त्री म्हणते, अग मी तुझ्या वडीलांच्या स्वभावाला चांगली ओळखते. त्यांनी काहीतरी वैशिष्टयाशिवाय तुला त्या गावात दिले नाही बरं का?

तेव्हा ती उत्तरते—

**आईबानी दिन्ही लेक, नही देख घरदार।**
**सुऱ्या सारखा मोठा जेठ, चाँदसारखा भरतार ॥ (२८)**

अग माझ्या बाबांनी किनई मला स्थळ पहातांना, सासरची खेतीबाडी, घरदार, यांना विशेष किंमत दिली नाही. परंतु माझे जेठ (त्यांचे मोठे भाऊ) हे सूर्यासारखे तेजस्वी, कर्तुत्ववान, तर माझे 'राम' माझे भरतार चंद्रासारखे शितल स्वभावाचे गोरे गोमटे व समुद्राच्या लाटेप्रमाणे मला देखील हवेहवेसे वाटणारे राजबिंडे आहेत. अवकाशातील 'उपमा' तिच्या काव्यात डोकावतात.

अग माझच नव्हे बाबांनी आम्हा सर्वच बहिनींसाठी चांगली धडधाकट मुलं बघितली त्याबद्दल ती म्हणते—

**मन्हा आईबानी दिन्हयालेकी, एकरासना जोंधयाले ।**
**नही लोकेसना हेवा, लेकी आंधया, पांगयाले ॥ (२९)**

अहो माझ्या वडिलांनी सर्वच मुली, एक सारख्या धारदार नाकनक्शा असलेल्या देखण्या स्वरुपवान, सुंदर मुलांना दिल्या आहेत. ज्या लोकांनी घरात मुलींचे पैसे घेवून त्यासाठी आपल्या मुली आंधळ्या पांगळ्या अशा नवऱ्या मुलांना दिल्यात त्यांचा हेवा माझ्या वडिलांनी कधीच केला नाही!

याचाच अर्थ ते लोभी नाहीत. सुसंस्कृत आहेत असेच ना? तेव्हा ती म्हणते—

**आईबा मन्हा, हाऊ काशीमाना वड ।**
**मन्ही माय बाई, पानी तिरोनीन गोड ।। (३०)**

अग बाई माझे वडील हे 'काशी' क्षेत्रातील, जुन्या पवित्र, पुजनीय वट वृक्षासारखे गार छाया देणारे स्वभाव वैशिष्टय असणारे मायाळू असे खास व्यक्तिमत्व आहे. तेथे देवही वस्तीला असतो. आई अलाहाबादच्या त्रिवेणी संगमावरील पवित्र, गोड, निर्मल अशा गंगा तिर्थाप्रमाणे आहे. ती सर्व लेकरांचे गुणदोष पोटात समावून घेते.

पुढे ती म्हणते—

**पिता वाचे पोथी, पान पोथीन झाये जुनं ।**
**ज्याले नही ग्यान, त्यानी गती नंदी जान ।। (३१)**

माझे वडील भगवत भक्त आहेत. ते नित्य नेमाने (गीता, भागवत, रामायण) पोथींची पारायण करतात. त्यांच्या वया बरोबर त्या पोथींची पानं जीर्ण होत चालली आहेत. वडील उपदेश करतात बेटी! ज्याला अध्यात्मज्ञान अवगत नाही त्याचे ऐहिक जीवन हे एकाद्या बैलासारखे आहे.

केव्हां केव्हां बाबा भजनात दंग होतात तेव्हा ती म्हणते—

**भजननी दिंडी, आज जयगांव लत्ताले ।**
**भजननी चिठ्ठी, मन्हा भजन्या पिताले ।। (३२)**

अग बाई आज भजनाची टोळी जळगांव भागाला जात आहे. 'वारी' त खास करून भजन करण्यासाठी माझ्या वडिलांना चिठ्ठी पाठवून खास आमंत्रण देवून बोलविले आहे.

असा हा बाप मुलगी सासरी जातांना तिला उपदेशतो तेव्हां ती म्हणते—

**सटी मारस आक्सर, देव गिनस पुन पाप ।**
**नशिबना जोजारले, काय करती माय बाप ।। (३३)**

अग! बाई कोणाला काय भोग मिळावेत? कसा नवरा मिळावा हे प्रत्येकाचे नशिबी पाचव्या दिवशी सटीने पाचवीला अक्षरी लिहिलेले असते. सटीवीला पुजलेले असते. पाप पुण्याचा जमाखर्च देव लिहितो. त्या कर्म फळाला जन्म देते आई बाप तरी काय करणार?

पुढे ती म्हणते—

**आईबा कसा म्हने, तिखी तुन्ही अवलाद ।**
**लव्हार ना घर, तपे लोखंड, पवलाद ।। (३४)**

बेटा! तू आता सासरी जाते आहेस. तुझा स्वभाव, तिखट, चिडखोर, गरम आहे. लोहाराच्या भट्टीत चांगल्या प्रतीचे पोलाद व कनिष्ठप्रतीचे लोखंड दोन्हीही तपविले जातात

तसेच थंड गरम दोन्ही स्वभावाचे चटके तुला सासरी सहन करात्रें लागतील. सासर कडच्यांची विनाकारण बोलणीही खावी लागेल.

पुढे ती म्हणते—

**आईबा कसा म्हने, लेक हरबरानी दाय।**
**जलम देवाले झावू धनी, नशिबले करू काय ।। (३५)**

वडील म्हणतात तू हरबऱ्याच्या डाळीसारखी चवदार, पौष्टिक पिवळी धमक भरीव आहेस· अग बाई जन्माला घालण्याचे कर्तव्य मी पार पाडले. तुझ्या खोटया नशिबाला मी तरी काय करू ?

संसाराचा घाणा स्वत: ओढतांना त्याने भोगलेल्या अनुभवलेल्या प्रत्यंकारी, प्रलयंकारी, पिळव जीवनाचे शहाणपण तो मुलीला उपदेशितो.

शेजारची स्त्री म्हणते कां ग नवरा मुलगा रंगाने काळा बिळा आहे काय ? तेव्हा ती म्हणते—

**कुकु लाई लाई, जागा पडनी गव्हाई।**
**पिता कसे म्हने, लेकसारखा जवाई ।। (३६)**

अग कुंकू कपाळावर लावून लावून त्या खालील जागा गव्हाळचा रंगाची लालसर पांढरी झाली आहे. बाबा म्हणतात माझ्या जावयाचा रंग माझ्या मुली सारखाच आहे हो. (गोरा)

अशा गोऱ्या नवऱ्याकडे नांदायला जातांना ती म्हणते—

**सासरले निघता, याय ऊनां वं चढता।**
**गंज योजनं लागती, मंदिर पितानं सोडतां ।। (३७)**

सासरी जातांना सकाळपासून तयारी चालली आहे. परंतु अवीट माया करणाऱ्या, बाबांच घर सोडून जात असतांना दिवस कासराभर वर आला आहे. आई वडिलांचे घर, पवित्र मंदिर सोडताना ते जावेसे वाटत नाही. तिचा जीव अडकतो. वडिलांचे उपजात प्रेम ज्याला खोली असते जे बाजारू नसते त्यापासून दूरवर जातांना नकोसे वाटते.

तरी देखील जातांना बाबा तिला म्हणतात—

**बाप कसा म्हने, लेकी नांदीसन काढ नांव।**
**शिवना शेजार, सगा सोयरान गांव ।। (३८)**

बेटी ! तू सासरी जाते आहेस. तेथे चांगली वागणूक दे. त्या परिसरात माझे नाव काढ. तुझ्या सासरवाडीच्या पंचक्रोशीत आपल्या अनेक नातवाईकांची गावे आहेत त्यांच्या कानावर तुझ्या संसाराचे पोवाडे व माझी अपकिर्ती जाता कामा नये !

पुढे तो बजावतो—

**आईबा कसा म्हने, बेटी चांगली ऱ्हायजो।**
**पोट पाट झाकीसन, पानी 'तापीनं' व्हायजो ।। (३९)**

बाप म्हणतो बेटा सासरी चांगले दिवस काढ. चांगली वापरणूक कर. नदीवर, तापीवर पाणी घ्यावयास घागर घेवून जातांना डोक्यावर मोठा पदर, छाती व पोट झाकून चालत जा. 'शरम' बाळग. 'निसनी ते नासनी' हे त्याला ठावे आहे. नितिमत्तेची त्याला चाड आहे. रितीरिवाजाबद्दल कठोर भूमिका तो स्वीकारतो.

तिच्या तारुण्याच रक्षण व्हाव या उद्देशाने तो म्हणतो—

**आईबा कसा म्हने, सम्हाय मन्ही बानी।**
**नको वाया जावू देजो, मन्ह पगडीन पानी ।। (४०)**

वडील म्हणतात, तारुण्यात तुझ्या वागण्याने माझ्या घराण्याच्या अब्रुला बट्टा (डाग) लागता कामा नये. माझ्या बाणेदारपणाला तथा माझ्या लाल भडक पगडीचा रुबाब कमी होता कामा नये. वरील बाबींना बाध येईल असे लाजिरवाणे, अनैतिक कृत्य तुझ्या करवी होता कामा नये. भोवतालचे जग विचित्र झाले आहे.

अशी माया लावणारी सुंदर, सालस, एकुलती एक मुलगी सासरी जावयास निघते तेव्हा बाप म्हणतो—

**बाप कसा म्हने, लेक जंगलनी धुनी।**
**सासरले जाये, येये डोयामान पानी ।। (४१)**

वडील म्हणतात, माझी मुलगी निर्जन शेतात जळणाऱ्या चार काटक्यांच्या शेकोटीसारखी आहे. जी स्वतः जळून इतरांना ऊब देते. ती सासरला जावयास निघाली म्हणजे तिच्या व माझ्या डोळ्यातून गंगा-यमुना वाहू लागतात. आसवांच्या धारी वाहतात.

पुढे ती म्हणते—

**बाप कसा म्हने, लेक तांब्यानी घागर।**
**लेक गई सासरले, सुनसुन लागे घर ।। (४२)**

वडील म्हणतात, माझी मुलगी पाणी भरण्यासाठी वापरल्या जाणाऱ्या तांब्याच्या भांड्या-प्रमाणे घागरीसम आहे. बहुमोल, शुद्ध चारित्र्याची आहे. ती सासरी गेल्याने घर कस ओक ओक, सुनाट रित वाटत आहे. भकास वाटत आहे. जीवनाला करमत नाही. क्षणाक्षणाला मुलीचे विस्मरण होते. तिचा वियोग जाणवतो.

याच अर्थाने दुसरी ओवी ती म्हणते—

**बाप कसा म्हने, लेक पयला मुईसा।**
**गई जव्हय सासरे, लागे भकास घरमा ।। (४३)**

वडील म्हणतात, मुलगी पहिल्याच मुळाला सासरी गेली आहे. आतापर्यंत ती आमच्या मायेतून अलग झाली नव्हती. तिच्या जाण्याने घर कसे भकास झाले आहे. सुने सुने पडले आहे.

पुढे ती म्हणते---

**आईबा कसा म्हने, लेक खोबरानी वाटी।**
**खांदे कडे धरी, लिनी पराईनी बाटी ।। (४४)**

वडील म्हणतात, माझी मुलगी खोबऱ्याची वाटीसारखी स्निग्ध, पौष्टिक स्वभावाची होती. लहानपणापासून अंगाखांद्यावर खेळविली वाढविली, पण सरती शेवटी नियतीच्या नियमाने परक्याने तिचे प्रेम वाटून घेतले. भागीदारी केली.

सासरी गेल्यावर तिला खूप कष्ट करावे लागतात. तिच्या सौंदर्याची 'आब' रहात नाही. तेव्हा ती म्हणते---

**गोरं मन्हं, आंग, लाऊ कितली धुयमाटी।**
**हाई आईबान देनं, लथी ऊनु 'राम' साठी ।। (४५)**

अहो मी गोरी गोमटी आहे. माझ्या अंगाला येथे धुळ, माती लागते आहे. (खूप खूप कष्ट करावे लागत आहेत.) अहो उपजत सौंदर्य माझी आई व वडील यांची 'देणगी' आहे. ती मी माझे यजमान माझे भरतार यांचेसाठी सांभाळून ठेवून त्यांना अर्पण केली आहे व सासरी सुखाने नांदत आहे.

ही वडिलांच्या हिंमतची किंमत आहे ती म्हणते---

**आईबा आईबा करू, आईबानी दगडनी छाती।**
**कलेजा ना घड, धड, सोपा जवाईना हाती ।। (४६)**

अहो वडिलांच्या औदार्याचे काय वर्णन करावे! ते खंबीर धीरोधात्त आहेत. आपल्या काळजाचा तुकडा (मी) त्यांनी आपल्या जवायाच्या स्वाधीन केला आहे. त्यांना अर्पण केला आहे.

पुढे ती वडिलांना निरोप पाठविते---

**मोठ मन्ह घरं, काम धंदाले एकली।**
**आईबा तुले सांगू, सुन धाडी दे धाकली ।। (४७)**

अहो माझ घर मोठ आहे. माझा कारभार मोठा आहे. शेतीबाडी अफाट पसरली आहे. अन् एवढ्या घरात कामाला मी एकटीच आहे. बाबांना म्हणाव तुमची लहान सून मला मदतीसाठी पाठवून द्या. (निरोप देते).

बापाकडे कामाची घाई असल्याने निरोप येवूनही ते सुनेला मुलीच्या मदतीला पाठवू शकत नाहीत तेव्हां मुलगी स्वत: माहेरी येवून म्हणते—

**बाप द्राक्षानं झाड, माय चारोयी लागे गोड।**
**यासना करता, माले माथर लागे गोड।। (४८)**

वडील द्राक्षाचे झाड आहेत तर आई भिलाव्याची स्निग्ध, पौष्टिक चारोळी आहे. या दोघांसाठीच मला माहेरी येण्यासाठी वेडं लागते. आई व वडिलांची वेडी माया माहेरी येण्यास प्रवृत्त करते. बापाला दिलेली द्राक्ष वेळीची उपमा, सार्थ वाटते. निसर्ग तिच्या काव्यांत डोकावतो.

तिच्या हातातील बांगडया पाहून वडिलांना आनंद होतो. सोन्याच्या बांगडयाविषयी ते चौकशी करतात तेव्हा ती म्हणते—

**आईबा कसा म्हने, पाटल्या कवं कन्यात बाई।**
**पाटल्यासनी जोडी, आईबा करी मी दई दई।। (४९)**

वडील मुलीला विचारतात अग बाई सोन्याच्या पाटल्या केव्हा घडल्या ? तेव्हा ती म्हणते बाबा ! दुसऱ्याचे दळण, कांडण करून काबाडकष्ट करुन मी सोन्याच्या पाटल्या केल्या आहेत.

तेव्हा तिच्या कष्टमय जीवनाप्रती सहानुभूति म्हणून वडील म्हणतात—

**आईबा कसे म्हने, लेक हरबान पीठ।**
**खोटा तुन्हा करमले, कितला चालू नीट।। (५०)**

वडील म्हणतात, लेकी तू हरबऱ्याच्या पिठासारखी उग्र, गुणकारी आहे. तुझे नशीबच खोटे आहे. त्याला मी कुठवर पुरणार. मी तरी काय करणार ?

वडिलांकडे श्रीमंती आहे त्याच वर्णन ती काव्यात करते—

**आईबानी मोठी सुनं, दारे पोतारे बिंद्रावन।**
**चाँद सुऱ्यानी रांगोयी, मोती पवयान दरसन।। (५१)**

वडिलांची मोठी सून दारी असलेल्या तुळशी वृंदावनाला मातीचा रंग कापडयाच्या बोळयाने देत आहे. पोतारा करीत आहे. समोर चंद्र, सूर्याच्या रांगोळया अंगणात टाकल्या आहेत दाराला मोती पोवळयाच बारसक तोरण बांधलेले आहे.

वडिलांच वार्धक्य आलेल आहे. तेव्हा त्याची घरावरील सत्ता लोप पावते. कारभार मुलांच्या हाती जातो. भाऊ भावजयच्या काळात तिची हेळसांड होते तिला माहेरी तसनस होते तेव्हा मागील आठवणी तिला येतात, ती म्हणते—

**फुटी बांगडी फुटू देऊ, माय बांगडी फुटू देवू।**
**आईबाना राजे, कसार लुटी लेवू।। (५२)**

बापाची या घरावर सत्ता होती तेव्हा, बांगड्याची मला खास काळजी नसायची. फुटल्या ठीक आहे. फुटू देत. वडिलांचे राज्यात दाराशी आलेला 'कसार' अक्षरशः लुटला जायचा. अहो त्याच्या जवळच्या सगळ्याच्या सगळ्या बांगड्या मी विकत घेत असे. तो रिक्त हस्ते परत जाई. (मोल घेवूनच !)

पुढे ती म्हणते--

**फुटी बांगडी फुटनी, माय फुटनी कांचनी।**
**आईबाना राजे, भरू बांगडी पांचनी ।। (५३)**

अग बांगड्या फुटल्या, फोडल्यात फुटू दे. कांचेच्या बांगड्या फुटल्यात. वडिलांच्या जीवावर मी पाच रुपयाच्या बांगड्या घेईन. ते माझे लाड पुरवितात. त्यावेळी पाच रुपयाचे मुल्य खूपच असेल.

हौसमौज बरोबर खाण्या-पिण्याचे लाड कसे पुरविले गेलेत याची आठवण येवून ती म्हणते--

**आईबाना राजे, खाद खारीक खोबर।**
**भवजाईना राजे, चौक्या बसीग्यात जबर ।। (५४)**

वडिलांचे कारकिर्दीत मी खूप पोटभरुन खारीक, खोबरे असा सुका मेवा खाल्ला. भव-जाईच्या कारकिर्दीत प्रत्येक कपाटीवर भावजयचे कुलुपरुपी चौकीदार पोलीस पहारा बसविण्यात आला आहे व मुखरा तिच्या कंबरेला असतो.

वडिलांच्या कारकिर्दीतील आनंदाचे दिवस ती वर्णन करते--

**वडिलाना राजे, मन्ह पानीमा चाले जहाज।**
**भाव भवजायीना राजे, माय मनले समज ।। (५५)**

वडिलांच्या कारकिर्दीत माझी खूपच मौज होती. बंधने नव्हती. भिती नव्हती. मी सत्ताधारी होते. येथून तेथून माझच माझ अशी परिस्थिती होती. आता काळ बदलला आहे. भाऊ भावजयच्या काळात मोह वाटला तर मनाला आवर घालावा लागतो.

हे सार पुराण ऐकून वडील फारच दुःखी कष्टी होतात. त्यांना वाईट वाटून ते मनःस्ताप करतात. तेव्हा ती म्हणते--

**पिता कसा म्हने, लेकी कसाले वाचनी।**
**तुन्हा संसारनी, माले जलम कासनी ।। (५६)**

वडील म्हणतात हे मुली ! तुला देवाने का बरे जिवंत ठेवले असेल. तू मेली असती तर तेवढेच बरे झाले असते. तुझ्या संसाराची मला हयातीभर चिंता आहे. काळजी करावी लागणार आहे. बोचनी लागून राहिली आहे.

त्याच अर्थाची दुसरी ओवी ती म्हणते––

**पिता कसा म्हने, लेकी मरी तरी जाती।**
**तुन्हा संसारनी चिंता, चिंता कसाले रहाती ॥ (५७)**

वडील म्हणतात तू लहाणपणी तरी मरून गेली असती तेव्हां एवढ दुःख झाल नसत व आयुष्यभर तुझ्या संसाराची मला अजिबात चिंता रहायली नसती.

सात्त्विक संताप आटोपल्यावर वडील म्हणतात—बेटी ! ही जगाची रहाटी आहे. येथे सुख दुःख खालीवर होत रहातात भिवून जाण्याचेही कारण नाही. त्यावर ती म्हणते––

**आईबा कसा म्हने, लेकी जलमनी कटकट।**
**शेवाया दगड, पाय ठेवजो बयकट ॥ (५८)**

वडील म्हणतात लेकी, अग हा संसार आहे ना ! हा जन्मभर कटकटच असते. अनेकांनी याला त्रासून वैराग्य धारण केले आहे. तो संसार नदीतील शेवाळ चिटकलेल्या नर्मदेच्या गोल गोटयाप्रमाणे आहे. त्यावर सरळ प्रवाहात उभे रहाणे दिव्य आहे. एक कसरत आहे. बेटा माझ ऐक त्यावर बळ एकवटून पाय ठेव. नीट संसार कर. संसाराला लाग. निराश होऊ नकोस.

असा हा तिचा कष्टकरी बाप शेतात राबतो त्याच वर्णन करतांना ती म्हणते––

**कडक उनमां, दगडेसन्या फुटती लाह्या।**
**आईबा राबस जंगले, देवबा करसं साया ॥ (५९)**

'मे' महिन्याच्या रखरखत्या उन्हात काळ्या दगडाच्याही उष्णतेने लाह्या फुटतात अशावेळी माझे वडील आनंदा कुणवी जमिनीची मशागत करण्यासाठी, उघडयापाठी शेतात घामांच्या धारासहीत कष्ट करीत आहेत. 'कर्म हेच देव' मानणाऱ्या त्यांना देव प्रसन्न होवून त्यांच्या डोक्यावर कृपाछत्र धरतो. देव त्यांना सहाय्य करतो. देवाच्या कृपेने ते कष्ट त्यांना जाणवत नाहीत.

शेवटी ज्यावर देवाची असीम कृपा आहे अशा वडिलांचे जीवनापासून धडा घेवून, त्यांचे अनुपम्य, अमोल उपदेश ऊराशी बाळगून ती सासरी संसारास निघते तेव्हा शेजारच्या स्त्रीला म्हणते––

**आईबा तवर माहेर, हयाती मां हेर जार।**
**भाऊ भवजाईना राजे, सारा मावना लेवकार ॥ (६०)**

अग असे देवतासमान वडील आहेत तोवर माहेरची ये-जा होत राहील. ते मला आराध्य-दैवत 'विठोबा' इतके पुजनीय आहेत. बाप वारल्यावर, भाऊ, भावजय यांचे कारकीर्दीत सर्व परकेपणा, उसने प्रेम असणार. आजची गोडी तेव्हा येणार नाही.

• • •

# 'भाऊ'

जगात बंधूभाव निर्माण करण्यासाठी 'भाऊ' या नात्यावर अनेक भाषेत लिखाण आढळते. खान्देशाची ग्रामीण भाषा अहिराणी. खान्देशाचे भूषण म्हणजे खान्देशाची लोकगीते, लोक कथा, उखाणे आणि विशेषत: खान्देशातील अडाणी स्त्रियांच्या तोंडून निघणाऱ्या ओव्या ! हे साहित्य अहिराणीतून ओतप्रोत भरलेले आहे.

आजकालच्या सुधारलेल्या युगांत देखील काही असंख्य अभागी कष्टाळू स्त्रियांना गरीबीमुळे दळणाचे काम घरीच करावे लागते. जाते ओढण्याचे अविट श्रम कमी व्हावेत म्हणून तिच्या मुखातून सहजस्फूर्त ओव्या सुरेल स्वरात गाईल्या जातात. सकाळच्या कातर वातावरणात जात्याच्या घरघर सुरेल संगीताच्या तालावर गाईलेल्या कर्णमधूर ओव्या, मराठी साहित्य रसिकाच्या मनातील सुप्त भावनांचा वेध घेवून त्यांना जागृत करतात. अडाणी, ग्रामीण स्त्रियांच्या मनातील उत्स्फूर्त भावनांचा तो प्रकट भाव आहे यांत शंका नाही. दिवाळी, आखाडी असे दोन सण सासुरवासिनींना अतिप्रिय असतात. दिवाळी अगदी जवळ येवून ठेपली आहे, भावाची वाट पाहून तिचे मन संशयित होते, संशयग्रस्त स्थितित ती विचार करते. तिचे मन भराऱ्या मारते, कदाचित भावाला मुलगी झाल्यामुळे आपल्यावरील माया कमी झाली असेल. असे विचार मनात येवून एक ग्रामीण स्त्री म्हणते—

**वडपना पानी, पानी पडी बसरना।**
**भाऊले झायी लेक, बहिन विसरना ।।** (१)

वळव्याचा पाऊस जोराने पडतो व लगेच कमी होतो. त्याचा जोर कमी होतो. भावाला मुलगी झाली आणि तो बहिणीला पार विसरला. त्याची बहिणीवरील माया कमी झाली.

अहिराणी ओव्यात ज्या प्रमाणे सहजस्फूर्त भाव आढळतात त्याप्रमाणे साहित्यगुणही ओतप्रोत भरलेले आढळतात. याठिकाणी भावाला वळव्याच्या पावसाची दिलेली उपमा सार्थ वाटते. अशा मनाला माहेरची ओढ लागलेल्या काळात तिला आपल्या गावाकडची कुणीतरी एक ओळखीची स्त्री भेटते आणि तिच्याबरोबर ती निरोप पाठवतांना म्हणते—

**धोतर जोडामा, सजी-सुजी सन।**
**बहिन ना घर, भाऊ पाव्हना धाडीदेन ।।** (२)

धोतर जोडयांत आणि नव्या कपडयांत सजून थाटामाटाने माझ्या भावाला बहिणीकडे पाहुणा म्हणून पाठवून दे.—

आधुनिक काळातील पत्रांची कल्पना तिला अभिप्रेत नाही. निरोप लवकर पोहचतो या कल्पनेत तीव्र ओढ दिसून येते. नव्या कपडयात सजवून पाठवून दे. या ठिकाणी 'एक नूर

आदमी दस नूर कपडा ' ही सौंदर्याची कल्पना तिला परिचित आहे. नव्या कपडयांनी आनंदाला उधान येत असते. भावाला पाव्हना म्हणून थाटामाटाने पाठवून दे असा निरोप देताना शेजारची स्त्री ऐकते व जिज्ञासेने तिला विचारते कां ग शेजी तुला भाऊ, बहिणी किती आहेत ? याला मोठ्या मार्मिकतेने उत्तर देतांना ती म्हणते--

**शेजी इचारस, भाऊ बहिणी किती।**
**भाऊ लावनी ना आंबा, बहिन संगरनी मेथी ।। (३)**

शेजारची स्त्री विचारते तुला भाऊ, बहिणी किती आहेत ? भाऊ लावलेला आंबा आहे व वहीण संगरची मेथी आहे. या ठिकाणी तिच्या मनातील भाव मोठ्या कुशलतेने व्यक्त केला आहे. एक भाऊ व एकच बहीन हे उत्तर आपल्या परिसरातील लावनीचा आंबा व सागरची मेथी यांची रुपके घेवून स्पष्ट केलेले आहे. भोवतालच्या वातावरणातील सार्थ उपमा ती आपल्या काव्यांत गोवत असते. भाऊ लावनीच्या आंब्याप्रमाणे जोपासून लहानाचा मोठा केलेला आहे व ती स्वत: संगरच्या मेथीप्रमाणे एकटी दुर्मिळ आहे.

बहीण एकटीच असल्यामुळे तिला मायेचा निरोप मिळाल्यावर एकुलता एक भाऊ, तिला दिवाळीला घेण्यासाठी आपल्या आवडत्या वाहनावर निघून येतो.

घोडयावर बसून [ वेळेवर (?) न सुटणाऱ्या एस. टी. च्या बसेस नव्हत्या त्यावेळी ] खळयाच्या बांधावर आलेल्या आपल्या भावाला ती घरातून पाहते. त्याला उभा पाहून त्याच रसभरीत वर्णन करतांना ती म्हणते---

**भाऊ काया नी सावया, उभा खयाना बांधले।**
**व्हयी जाई दीट, मन्हा पुनीना चाँदले ।। (४)**

काळया सावळया रंगाचा कृष्ण माझा भाऊ खळयाच्या बांधाला उभा आहे. माझ्या पौर्णिमेच्या चंद्राला दृष्ट लागेल. खळयाच्या बांधाशी उभ्या असलेल्या काळया सावळया भावाला दिलेली पौर्णिमेच्या चंद्राची उपमा मायेच्या पोटी निर्माण झाली आहे. (तो-पावेतो अमेरिकन महामानव नील आर्मस्ट्राँग चंद्रावर पहिले पाऊल ठेवून तेथील खजिन्यासह पृथ्वीतलावर आलेला नव्हता). ह्या ठिकाणी कृष्णाची काळी सावळी मूर्ति तिला अभिप्रेत आहे. त्याला दृष्ट लागू नये ही भावना उत्कट वात्सल्य व ममता याचा प्रगट भाव आहे.

भाऊ पाहुणा आला आहे तो तिच्या सासरवाडीला आला आहे. त्याने आता प्रथम काय करायचे ? घरातील इतरांना राग येवू नये म्हणून कसे वागावे याचा प्रेमळ उपदेश करतांना ती म्हणते---

**भाऊ रे पाव्हना, घोडा बांध बा जाईले।**
**पयले सोयराले रामराम, मग भेटजो बाईले ।। (५)**

पाहुणा आलेला भाऊ, अगोदर तुझा घोडा जाईच्या फुलाच्या बुंध्याला किंवा समोरच्या काटयाच्या झाडाला बांध. पहिल्यांदा मेव्हुण्याला रामराम घाल व मग मला घरात

भेटायला ये. या ठिकाणी आदरातिथ्याबरोबर कर्तव्यदक्ष गृहिणीची भूमिका ती करीत आहे. मानापमानाच्या कल्पना ती विसरलेली नाही. क्षुल्लक कारणांवरून वितुष्ट येता कामा नये यासाठी ती दक्ष असते.

भावाची खळ्यात बांधलेली घोडी ती पहाते, तिचे वर्णन आपल्या शब्दात करते. तिच्या चपलकतेचे वर्णन करताना ती म्हणते—

**भाऊ रे तुन्ही घोडी, निया आस्मानना चिडी।**
**बहिनना गांव जास्ती, हिले जमीन लागे थोडी ॥ (६)**

रे भाऊ! तुझी घोडी निळ्या आकाशात उडणारी चिमणी आहे. ती भुरकन उडून जाते. तू बहिणीच्या गावाला येतोस तेव्हा तिला रस्ता अपुरा पडतो. निळ्या आकाशात भराऱ्या मारणाऱ्या चिमणीप्रमाणे भावाची घोडी वेगवान आहे. अशी सार्थ उपमा देऊन तिचे चपलतेचे वर्णन, कौतुक येथे केले आहे. येथे ती आदिभौतिक सुखवादात गुरफटतांना निसर्गाशी समरस होते.

एवढ्या वर्णनावर मनातील भाव पूर्ण होत नाही म्हणून ती म्हणते—

**भाऊ तुन्ही घोडी, निया अस्मानना तारा।**
**बहिनना गांव जासी, नही लागे ऊन वारा ॥ (७)**

रे भाऊ, तुझी ही घोडी, निळ्या आकाशातील तारा आहे. बहिनीच्या गावाला जाताना ऊन, वारा, पाऊस तुला लागत नाही.

या ठिकाणी मोठ्या कुशलतेने तिने घोडीची चपलता वर्णन केलेली आहे. शब्दाला रेखा देवून अर्थ स्पष्ट करण्यात तिचा हातखंडा आहे.

भाऊ घोड्यावर आला त्यावेळी जिज्ञासेने, आतुरतेने तिची शेजारची स्त्री तिला विचारते 'कां ग शेजी, तुझा चुलत भाऊ आला आहे का'?

**शेजी कशी म्हने, तुन्हा चुलत भाऊ ऊना।**
**अशी नको म्हनू बाई, भाऊले राग यीना ॥ (८)**

शेजारची स्त्री म्हणते, तुझा चुलत भाऊ आला आहे. अग बाई असे म्हणू नकोस भावाला राग येईल ना? भावाबद्दलचा जवळचा, आत्मीयतेचा संबंध प्रगट करण्यासाठी व त्याला राग येवू नये म्हणून ती शेजारच्या स्त्रीला असे सुचविते, भिवविते.

भाऊ उन्हाळ्याच्या दिवसात आला नसला तरी तो ऊन्हात तापून आपल्या गावाला आलेला आहे म्हणून ती शेजारच्या स्त्रीकडे दही मागावयास जाते नि म्हणते—

**शेजी वं मन्ही बाई, जरा उसनं देव वं दही।**
**भाऊ तयी तापी ऊना, त्याले झय लागी गयी ॥ (९)**

अग शेजारच्या बाई ! अहो मला जरा दही उसनं देता का ? अहो भाऊ उन्हा तान्हात प्रवास करून आला आहे. त्याला ताप भरला आहे. उन्हाची झळ लागली आहे. या ठिकाणी तीची कर्तव्य दक्षता, शुश्रुषावृत्ती, आप्तस्वकीयांबद्दलची तळमळ, निष्ठा दिसून येते. मायेच्या पोटी, कळकळ निर्माण झाली आहे.

आपला भाऊ आपल्याकडे नेहमी येत नाही. बऱ्याच दिवसानंतर त्याची फेरी झालेली आहे. त्याला चांगले खुसखुशित, चमचमीत भोजन द्यावयाच्या सदिच्छेने ती म्हणते--

**तपेतना मासा, रांधु तिही लाही ।**
**भाऊ से पाव्हना, सदोदित येत नही ।। (१०)**

तापी नदीतील मासा, तीळ वगैरे मसाला युक्त पदार्थाची पुड लावून तयार करू. भाऊ आज पाव्हणा म्हणून आलेला आहे. तो नेहमी येत नाही. बऱ्याच दिवसानंतर आल्यावर निर्माण झालेली अविट गोडी त्याच्यावरील प्रेमाचे प्रतिक म्हणून चांगले, त्याला आवडणारे भोजन करण्याची तयारी, भारतीय आदरातिथ्याची छटा या ठिकाणी दिसून येते. ती राहत असलेल्या सभोवतालचे वातावरण न कळत तिच्या ओव्यात डोकावते. ठराविक जातीच्या खाद्याची ओळख त्या ठिकाणी होते.

भाऊ दिवाळीस घ्यावयास आला आहे. दिवाळी म्हटली म्हणजे शेतकरी लोकांची हंगामाची घाई, कपाशी, ज्वारीचे ते दिवस "ये दिवाई पिके कायी" दिवाळी येते व काळीचे शेत (कपासी) पिकते अशी एक म्हण प्रचलित आहे. आणि साहजिकच सासरेबुवा तिला पाठविण्यास तयार नाहीत. अशावेळी सासऱ्याला पटवतांना ती म्हणते--

**दिवाईना सन, नका परतवा सासराजी ।**
**भाऊले ववायाले, सन नही दुसरा जी ।। (११)**

दिवाळीचा सण आहे (माझ्या भावाला) सासरेबुवा आपण परत पाठवू नका. दिवाळी-खेरीज दुसरा कोणताही सण भावाला ओवाळण्यासाठी नाही.

या ठिकाणी इतरांशी मिळून मिसळून वागण्याची खेडे गावातील एकत्र कुटुंब (खटले) चालविण्याची नम्रतेची तिची वृत्ती दिसून येते.

अशा प्रकारची ही गोड स्वभावाची सूनबाई आपल्या भावाबरोबर माहेरी येते. माहेरच्या सर्व गोत्रांबरोबर दिवाळी आनंदात पार पडते. सामाजिक रूढीप्रमाणे ती सासरी परत जाताना 'दिवाळी भेट' घेण्याच्या कारणावरून हलके भारी लुगडे घेण्याच्या बाबतीत बहिण भावात लटक्या रागाने लुटपुटचे भांडण होते. ते मोडायला आजूबाजूचे शेजारी, परके लोक येतांना मध्ये बोलणाऱ्या एका माणसाला ती खणकून बजावते---

**भाऊ बहिननं झगड, एक मायना व्हती एक ।**
**तोंड नका घाला मधमां, तुम्ही तिऱ्हाईत लोक ।। (१२)**

भाऊ आणि बहिण यांचे भांडण आहे. ते एकाच आई वडिलांची संतती आहे, ते एका देठाचे आहेत शेवटी एकच होतील. तुम्ही परके लोक (शेजारी पाजारी), भांडणात सहभागी होवू नका. येथे तिच्या अंगी असलेला संयम धिरोदात्तपणा, तसेच फितुरी वृत्तीला आळा घालण्याची वृत्ती हे गुण प्रामुख्याने आढळून येतात.

मानसशास्त्राच्या सिद्धांताप्रमाणे वडिलांची माया मुलांपेक्षा मुलींवर जास्त असते मुलीची कढ घेऊन वडील आपल्या मुलांवर रागावतात. मुलगा वडिलांशी भांडण करतो. त्याला उद्देशून ती म्हणते—

**भोया बंधु मन्हा नको, लेवू चोई साडी।**
**नको गांजू तात्याजिले, तोंड दखानी माले गोडी ।। (१३)**

(भांडणाचे मूळ कारण तिला घ्यावयाचे पातळ, लुगडे, खण, चोळी आहेत) अरे ! माझ्या लहान भावा ! (बापू) (तुझ्या जीवावर आले असेल तर) मला साडी, चोळी वगैरे काहीही घेवू नकोस ! (कांही घेण्याची अपेक्षा मला नसते). पण त्यासाठीच उगीच वडिलांना भांडण उकरून त्रास देवू नकोस. फक्त तुम्हाला भेटण्यातच मला गोडी वाटते. समाजातील प्रचलित टोपण नावाचा तिला विसर होत नाही.

अशा तऱ्हेने मिळणाऱ्या वस्तूवर तिचे प्रेम नाही. अंगी सहिष्णुता, संयमी वृत्ती आहे. एकत्र कुटुंबात फुट न होवू देण्यासाठी ती जपते. तिच्या अंगी दुरदर्शीपणा आहे.

दिवाळी संपली घेणे देणे, लेणे संपल्यावर आता तिचं सार लक्ष आपल्या सासरी लागले आहे. वियोग तिला जाणवतो. घरी यजमान वाट पहात असतील असे सांगतांना ती कुशलतेने प्रगट करते—

**"दादा" जावू दे तू माल्हे, आते सरनी दिवाई ।**
**घर रातदिन मन्ही, "राम" वाट दखत व्हई ।। (१४)**

(मोठ्या भावाला उद्देशून) अरे दादा ! आता दिवाळी संपली आहे. तू मला माझ्या घरी लवकर जाऊ दे. घरी रातंदिवस (तिचे यजमान) ते माझी वाट पहात असतील. नवऱ्याचा विरह कुशलतेने ती प्रगट करते. तिची कर्तव्यदक्षता या ठिकाणी दिसते.

ती घरी जावयास निघते. झालेल्या औपचारिक भांडणामुळे भावाची आपल्यावरील माया गैरसमज दूर करून ती कमी होवू नये व तिला परत आखाजीला घ्यावयास यावे अशी इच्छा प्रकट करतांना ती म्हणते—

**धाया बंधु मन्हा, नको ईसरजो "मायी" ले ।**
**येती आखाजीले, "मंबई" लेवाले येजो माले ।। (१५)**

अरे माझ्या भोळ्या स्वभावाच्या भावा, आपल्या (भांडणखोर) मायीचा (लहान बहिणाचा) विसर पडू देवू नकोस. येत्या अक्षयतृतीयेला सासरी घ्यावयास ये.

अशाप्रकारे प्रापंचिक अडचणींना मोठ्या कुशलतेने सोडवून समंजसपणाची भूमिका घेवून, मायेचा ओलावा ठेवून ती, सासरला निघून जाते. (पुन्हा माहेरी लवकर येण्यासाठीच).

अशा तऱ्हेने वरील ओव्यांमधून ग्रामीण स्त्रीने आपल्या स्नेहाळू बहीण या भूमिकेतून कार्य केले आहे. अहिराणी बोली या साहित्याने ओथंबलेली आहे. ओतप्रोत भरली आहे. अनेक गीते व ओव्या प्रचलित आहेत. अजूनही तिची प्रेमळ पत्नी, आदर्श गृहीणी, कर्तव्य-दक्ष पत्नी, अशा अनेकविध भूमिका मराठी वाचकांसमोर यावयाच्या राहिल्या आहेत. ते मराठी साहित्या इतकेच रसिकांचे मनोरंजन करतील.

● ● ●

# बहीण

जगातील असंख्य नात्या-गोत्यापैकी बहिण-भाऊ हे आभाळ प्रेमाच नात. बहीण-भाऊ रक्ताचं एक नात! बहिणीला भावाची प्रेमाची आर्तता असते. सामाजिक चालीरीतीनुसार दोघांमध्ये विवाहानंतर अंतर पडत असले तरी रक्ता-मासाचे नाते तुटता तुटत नाही. बहिणीला भावाविषयी प्रेम असतेच. तिच्या पोटातील मायेला अंत नसतो. ती आटणारी नसून तिचा चिरंतन प्रवाह सतत वाहत असतो. बहिणीचा आनंद कुटुंबाला संसर्गजन्य रोग होतो. भाऊ-बहीण लहानपणी भावनांच्या "गोफ" चा खेळ खेळतात. भावाच्या आठवणीनेही मनाच्या उष्णतेने तिच्या अंगातून घाम येवू लागतो. ती सर्व भावंडांवर भगिनी प्रेमाचा सारखाच वर्षाव करीत असते. रक्षाबंधन अथवा भाऊबीजेला भावाला यावयास थोडा उशीर झाला तर नाना शंकानी तिचे अंतःकरण हेलकावते. तिचे समाधान, उत्साह नाहिसे होतात. भावाच्या प्रेमासाठी ती सासरी होणारी सुखदुःखे, मान-अपमान, स्तुति, निंदा या रहदारीचे नियंत्रण उमद्या, हसऱ्या व शांत मनाने करते. केव्हा केव्हा ती लहान भावा-बहिणींची सेवासुश्रुषा करते. वेळी अवेळी प्रसंगी जागरण करते. त्यांच्यासाठी जीवापार कष्ट सहन करणे ती आपले कर्तव्य समजते. पवित्र, मंगल, अतुट असं हे नात आहे. अलिकडल्या एक हिंदी सिनेमात "इस धागो मे बंधा हुआ है भायी-बहनका प्यार. . . . ." असे गीत आहे. रक्षाबंधनाच्या दिवशी भावाला राखी बांधून शील संरक्षणाची अनमोल जबाबदारी ती भावावर टाकते. तर तीच बहीण भाऊबीजेला त्याला ओवाळून "औक्षण" (आखन) करून दिर्घायुष्य मागते. भावाला आपल्या संसारातील दुःख सांगितल्यावर तिच्या शेतातील उपसा झालेल्या विहिरीसारखं तिचं मन रितं रितं होतं.

अशाच एका भल्या पहाटे खान्देशातील एक प्रेमळ बहीण सौ. वनाताई पाटील जात्यावर दळतांना बहीण-भावाच्या नात्याची महती गातांना म्हणते—

**संसार मझार कितला, सेतस नाता-गोता।**
**बहीन नी भाऊ, मानिक मोतीसना पोता।। (१)**

जगात अनेक नातीगोती आहेत. पण त्यात सर्वश्रेष्ठ असं जर अग्रेसर नात असेल तर ते आहे बहीण-भावाचं. हे नात माणिक मोती एवढ मौल्यवान असून अफाट, खोल असं आहे. टिकावू स्वयंप्रकाशित आहे.

बहीण-भावाच्या नात्यांतील मृदुता, गोडीबाबत ती म्हणते--

**फोड वं सीताफय, मझार साखरना गाया।**
**बहिन, भाऊनी माय, पोट मझार माया।। (२)**

ज्याप्रमाणे सीताफळ फोडलं की, आतमध्ये गोड, रूचकर असा रवेदार गाभा निघतो (वरचा आकार मनाला विलोभनीय वाटतही नाही केव्हा केव्हा !) त्याचप्रमाणे बहीण-भावाची प्रेमाची आर्तता आत असते. भावालाही बहिणीविषयी तेवढेच प्रेम असते. पोटातील मायेचा अंत नसतो. तो निरंतर वाहणारा प्रवाहच असतो. गोड गाणीप्रमाणे रूचकर असतो. मळयातील सीताफळाची उपमा ती दोघांच्या प्रेमाला देते. अहिराणी बोलीभाषेच्या कान्हदेशात त्यावेळी सीताफळाच पिक अमाप येत असाव. ती सातपुडयाच्या पायथ्याशी माहेर असलेली स्त्री असावी.

सीताफळावरून तिला आपल्या शेताची आठवण होते--

**खेत आडे खेत, कोनत्या वावरे जाऊ।**
**भाऊना वावरमां, लयन्यां मारे गहू।। (३)**

अग बाई गाव आखऱ्याची सर्वच शेत माझ्या भावाची आहेत. मी आता कोणत्या शेतात बरे कामाला जावे. प्रत्येक शेतात हिरव्यागार, लोंब्या आलेल्या गव्हाचा "पाक" वाऱ्यासह फुगडी खेळत आहे.

त्याच वेळी ती भावाला शेताच्या बांधावर उभा असलेला पाहते. तो उन्हात घामाघूम झालेला दिसतो. ती म्हणते—

**ऊन्हायानं ऊनं, सावली पाड देवराया।**
**सकवार भाऊ मंन्हा, हाते रूमाल जड झाया।। (४)**

कडक उन्हाळयातील ऊन तापत आहे. हे देवा जरा सावली कर ना ! अरे माझ्या नाजूक प्रकृतीच्या भावाला हातातील घाम पुसण्याचा रूमाल जड झाला आहे.

एवढया ऊन्हांत शेतात कशाला आली-आलास असे ते एकमेकांना विचारतात व त्यावरून दोघांमध्ये लटके भांडण होते. तेव्हा ती म्हणते--

**बहिन भाऊनं झगड, झगड झाय वनी।**
**बहिनना डोये पानी, भाऊ चिंता करे मनी।। (५)**

या ना त्या कारणांवरून भावा बहिणीचे शेतात खटकते. भांडण होते. तेवढयावर भाऊ रागावतो. बहिण रडायला लागते. तिच्या डोळयातील अश्रु पाहून भाऊ मनात चिंता करायला लागतो.

ते दृष्य पाहून शेतात काम करणारी एक स्त्री म्हणते--

**बहिन नी भाऊ, बाय पत्नी पिरीत।**
**ग्यानबाना जोडे, मुक्ताबाईनी सुरत।। (६)**

अरे भावा-बहिणीच हे बाळपणाचे प्रेम आहे. तुम्ही एक दुसऱ्या जवळ उभे असताना ज्ञानेश्वर-मुक्ता या बंधु भगिनी प्रमाणेच दिसतात.

ज्ञानेश्वरी तिच्या काव्यात डोकावते. मुक्ताईचे खानदेशातील चांगदेव येथील वास्तव्य तिच्या नजरेतून सुटत नाही.

शेतातल्या काम करणाऱ्या स्त्रीला उत्तर देताना ती म्हणते अग मी नाटक करते आहे खोटे बोलते आहे पहा--

**पाठना बहिनवर, भाऊ कसा संतापीन।**
**आत्तर कहीन सोडीन रे, त्यान्ह वास देनं।। (७)**

पाठीच्या बहिणीवर भाऊ कसा बरे राग भरेल ? अहो अत्तर कधी त्याचा वास देण्याच, सुंगध देण्याच कर्तव्य-कर्म विसरेल काय ?

बहिणीच्या प्रेमाला ती अत्तराची उपमा देते. अधिक खुलासा स्पष्ट करताना ती म्हणते--

**पाठना बहिन वर, भाऊ कसा भरीन रागे।**
**चांदना आंगे कशी, घुसीन आगीन बागे बागे।। (८)**

आपल्या पाठीच्या सख्या लहान बहिणीवर मोठा भाऊ कसा बरे रागावणार ! अहो ! शितलचंद्राच्या अंगी कधी काळी क्रोधाग्नी प्रवेश करणे शक्य आहे काय ? या ओवीत भावाच्या प्रेमाला चंद्राच्या शितलतेची व भावाला चंद्राची उपमा ती देते.

केव्हा केव्हा तिच्या कडून तारुण्य सुलभ हालचाली होतात. भावाच्या नजरेतून ते सुटत नाही. तो रागावतो तेव्हा ती म्हणते--

**पाठनी बहिनवर, भाऊ आज कसा कडाडना।**
**कहीन रंग बदलना, माय निया आभायना।। (९)**

अग बाई ! कधी नाही ते आज पहिल्यांदाच पाठच्या बहिणीवर भाऊ कसा बरे खवळला ? अहो आकाशाने आपला निळा रंग कधी बदलला आहे काय ? भावाला त्याच्या मनाला आकाशाची उपमा ती देते. भाऊ आपल्यावर आयुष्यभर रागावणार नाही याचा तिला विश्वास आहे.

भाऊ रागवल्यावर लटक्या रागाने म्हणते ठीक आहे रागावून घे थोडे दिवस कारण--

**आम्ही पांच वं बहिनी, पाच गावन्या चिडया।**
**भाऊ तुले सांगू, तुन्हा पिरीमन्या येडया।। (१०)**

अरे दादा आम्ही पांच बहिणी आहोत. थोड्याच दिवसात आमच लगीन झाल्यावर आम्ही आमच्या सासरी पांच वेग-वेगळ्या गावाला चिमण्यांसारखे भुरकन उडून जावू. आम्हाला काहीच नको. फक्त तुझं प्रेम, तुझी माया हवी आहे.

खेळता खेळता रम्य तिच बालपन निघून जात. एक दिवस तिच लग्न होतं. ती परक्याची होते. ती सासरला पहिल्यांदा जावयास निघते तेव्हा म्हणते—

**सासरे जास बहिन, तिन्हा डोयामां पानी।**
**लाडका भाऊ सांगे, जलम बाईना वंगयवानी।। (११)**

बहीण सासरला जावयास निघाली. बालपणाच्या हसण्या, खिदळण्याचा तिला विसर होत नाही. आठवण होवून तिच्या डोळचांत भावाच, पित्याच घर सोडतांना अश्रू तरारतात. तेव्हा भाऊ लाडानं तिला म्हणतो अग मथुरा ! अग स्त्री जन्मच मुळी दुःख, कष्ट सहन करण्यासाठी, हाल अपेष्टा सोसण्यासाठीच आहे. तू रडू नकोस. ऊगी राहा.

तरणीताठी अशी ती पर मुलखात जाताना मुसमुसत्या तारुण्यात स्वतः सांभाळण्याविषयी बजावतांना तो म्हणतो——

**बेलासना पाय, धीरे टाक अलवार।**
**ताईले भाऊ सांगे, गाव तुन्ह निंदा खोर।। (१२)**

मंजूताई ! तू तरुण आहेस, सुंदर आहेस ! आता तुझ लग्न झालं असून तू सासरी जात आहे त्या गावी चालतांना पायातील जोडवे असलेला पाय जमिनीवर हळूवार ठेवीत जा. (हुदळक हुदळक चालू नकोस). नीट वागण ठेव. तुझे सासरचे लोक खूप निदांखोर आहेत ते माझी निंदा करतील.

सासरला गेल्यावर दुःखात दिवस काढतांना तिला बालपणाच्या सुखाच्या आठवणी येतात. त्यांचे वर्णन करताना ती म्हणते——

**सुख दुखना बजारे, भाऊ बहिनन्या गोनी।**
**सुख गये भुर ऊडी, दुखले उरे ना धनी।। (१३)**

बालपनी आपण सुख दुःखाच्या बाजारात उभे राहून बहिण-भाऊ प्रेमाची सुखाची पोते (पोतं) भरीत होतो. (सुखी होतो, आनंदी होतो.) परंतु माझ लग्न झाल्याने बंधू-भगिनी प्रेमाच सुख एखाद्या चिमणीप्रमाणे भुरकन उडून गेलं आहे. दादा ! अरे ! जगात दुःखाला कोणीच मालक नसतो. ते कोणाकडेही जाते. हे त्रिकालाबाधित सत्य आहे. तिच्या काव्यात तत्वज्ञान डोकावते.

बहीण शेजारच्या गावी दिलेली असते. तो कामानिमित्त तेथे गेल्यावर घाई-घाईने बहिणीकडे अगोदर न जाता पाठमोरा जातो तेव्हा ती म्हणते——

**मन्हा दारना पुढथीनं, नको जाऊ पाठमोरा।**
**तुन्हा सबदनी, भुकी, नको दखाडू बा तोरा।। (१४)**

दादा ! माझ्या दारावरून माझ्याकडे पाठ करून, पुढे जावू नकोस. अरे मी तुझ्या, शब्दाची, गोड बोलण्याची भुकेली आहे. तू फक्त एकच शब्द गोड बोल. लहान बहिणीवर एवढा कां राग भरतोस, तोरा का म्हणून मिरवतोस,. बडीजावपणा करून राग का भरतोस. वाकडा वाकडा कां गेलास ?

त्याला कदाचित आपल्याला चोळी घेण्यांचे जीवावर आले असेल. गरीबीमुळे संकट पडले असेल अशी दाट शंका मनी येवून ती म्हणते—

**दुबय हिनपन, माले दुरथीन दिखसं।**
**भोया बंधु मन्हा, नही चोईले रूससं।। (१५)**

अरे बाबा ! तुझ्या अठरा विश्व दारिद्र्याबाबत मला दुरून कल्पनां आहे. अरे माझ्या भोळ्या भावा चोळीसाठी खण घेतलाच पाहिजे असा माझा आग्रह नाही. तुझ्या गरिबीशी मी सहमत आहे.

पाठच्या भावाची बरोबरी, सर, कोन्हीच करीत नाही हे शेजीला पटवितांना ती म्हणते—

**जिल्हे नही भाऊ, तिन्ही पाचोयाना कया ।**
**ऊनी वारानी झुयक, भाऊ ऊडीसन गया।। (१६)**

जिला स्वत:चा आपला सख्खा भाऊ नसतो. ती बंधू प्रेमापायी वेडी होते. व यत्किंचित ज्वारीच्या सुकलेल्या पानाच्या कपटयाला (पाचोळयाला, कचऱ्याला) ही भाऊ मानते. त्याच्यावर निस्सिम प्रेम करते. परंतु वाऱ्याची झुळक (पत्नी प्रेमाची) आल्यावर भाऊ उडून जातो. (भगिनी प्रेमाला विसरतो). भगिनी प्रेमापासून लांब लांब जातो दुरावतो.

मानलेल्या बहिणीविषयी आपल मत व्यक्त करतांना ती म्हणते—

**ज्याले नही बहिन, त्यान्ही कायीमाटीनी कथी।**
**ऊनी पानीनी धार, बाई ईघरी कां गयी।। (१७)**

ज्याला स्वत:ची बहिण नाही त्याने काळया मातीच्या ढिगाऱ्याची केली. पण ती जास्त काळ टिकली नाही: पहिल्या वहिल्या पावसाची धार आल्यावर ती विरघळून गेली. (लग्न झाल्यावर भावाचे प्रेम विसरली).

रक्ताची नातीच शेवटी कामात येतात. पोटाला भाकरी बांधल्याने भूक जात नाही. मायेवाचून कळ नाही. बहिणीची उतरलेली, ढासळलेली शरीर प्रकृती पाहून त्याचे अंत:-करण जळते. तो विचार करतो. व म्हणतो—

**बहिनले सासरवास, ननीन ना टालाटोला ।**
**बहिन मंजोरा ना हाते, बिल्लोर झायात ढिला ।। (१८)**

बहिणीला सासरी खूप सासरवास होत असला पाहिजे. कारण (आताशी ती खूपच वाळली आहे). 'ननंदा' तिला छळत असल्या पाहिजे. मंजुताईच्या हातातील बांगडया (काचेचे

बिलवर) ढिले झाले आहेत. (हात बारीक पडले आहेत). जाचाने तिची प्रकृती ढासळली आहे. कमकुवत, अशक्त झाली आहे.

भावाचा जगतांना तिला मोठा धिवसा (आधार) वाटतो. पुढे ती म्हणते—

**बहिनले सासरवास, भाऊ देखस चातक ।**
**बाभुय मायले, सदा कुऱ्हाड घातक ।। (१९)**

बहिणीला सासरवास होतो आहे. पाहून चातक पक्षासारखा दुरून पाहतो आहे. तो न्यायी आहे. कोणाची चूक आहे हे मनातल्या मनात शहानिशा करून तो न्याय देतो. बाभळीच्या झाडाला कुऱ्हाडीपासून सतत भय आहे. असे व्यावहारिक तत्वज्ञान त्याला ठावूक आहे. "सासरवास" हा कुऱ्हाडी सारखा आहे. हा बाभळी सारख्या सडपातळ औषधोपयोगी असणाऱ्या बहिणीचा केव्हांतरी घात करणार. भोवतालच्या परिसरांतील उपमा तिच्या काव्यात डोकावतात.

आपल्या बहिणीच आपल्यावर किती प्रेम आहे ते रूपकाद्वारा सांगतांना एक स्त्री म्हणते—

**कापी करंगई, ग्या दूत का सांगाले।**
**बहिन "धुरपता" देये कायज बांधाले।। (२०)**

अहो ! भावाची करंगळी कापली गेली. हे एक संदेश वाहक करवी भावाने बहिणीला कळविले. तोच काय चमत्कार भावाच्या प्रेमापोटी "द्रोपदी" बहिनीने त्याच्या जखमेवर बांधण्यासाठी आपले 'काळीज' कापून त्याचा तुकडा दूतासोबत पाठविला. केवढ हे बंधूप्रेम याला जगात तोड नाही.

अन् जीवापलिकडे ज्याच्यावर प्रेम केले असा भाऊ बऱ्याच दिवसापासून भेटायला आलेला नाही तेव्हा मनात नाना शंका येवून ती म्हणते—

**वडपना पानी, पानी पडी वसरना।**
**भाऊले झायी लेक, बहिन ईसरना।। (२१)**

वळण्याचा पाऊस जसा एकदा दडादडा पडून नंतर ओसरतो. एकदाच दडकून पडतो. नंतर जोर कमी होतो. तसच काहीस भाऊच्या बाबतीत झाल असाव. त्याच्या भगिनी प्रेमाचा झरा आटला असावा, प्रेमाचा ओढा कमी झाला असावा ! कदाचित त्याला कन्यारत्नाचा लाभ झाल्याचा हा परिणाम असावा ?

निसर्गातील हालचालीचे तिचे निरीक्षण वाखाणण्याजोगे आहे. तिचा व्यासंग दांडगा आहे. निसर्ग तिच्या काव्यात डोकावतो.

त्याचवेळी दुसरी एक "शंका" तिच्या मनात घर करते. माणसाला "मेव्हणी" फार आवडते. भाऊ तिथे तिच्याकडे तर भेटायला गेला नसेल ना ? ती म्हणते—

**आतेना भाऊ, नही ऱ्हायना बहिनीना।**
**खिसामा घाले चोई, वाडा पुसे मेव्हनीना।। (२२)**

अलिकडच्या भावांचे बहिणींवर पूर्वी सारखे प्रेम राहिलेले नाही. ते कमी कमी होत चालले आहे. त्याला क्षती लागून ऱ्हास होत आहे. त्याचा ओढा मेव्हणी [बायकोची (सुंदर) लहान बहिण] कडे जास्त आहे. ते बापडे खिशात केतकी, सोलापुरी, करवती खणाची घडी, खिशांत ठेवतात व आपली "साली" कोणत्या वाड्यात राहते तिचा पत्ता गावभर धुंडाळत फिरतात. (तिच्या प्रेमापोटी अक्षरशः वेडे होतात.)

जीवनातील अनुभवांशी ती एकनिष्ठ आहे. तिच काव्य अनुभवाशी "इमान" राखते. पूर्वीच्या काळीही भाऊ होऊन गेले ते मात्र असे नव्हते. बाई याला उदा. देतांना ती पुराणाचा आधार घेऊन म्हणते—

**धुरपता बहिन साठे, देव येवर साया।**
**भाऊ बनीसन माय, पुराये लुगडा सोया।। (२३)**

बहीण द्रौपदी संकटात पडली असता तिच्यासाठी कृष्णदेव सत्वर वेळेवर धावून गेले. तिच्या धावाला प्रतिसाद दिला. भर दरबारात "कौरव" तिची विटंबना करीत असता भाऊ होवून बंधु प्रेमाची बुज राखली व वस्त्रहरणाचे वेळी हजार नवे लुगडे पुरविले. जगाच्या पाठीवर असे भाऊ विरळाच! तिचे पुराणाचे श्रवण कथा, किर्तन श्रवण व्यासंग दांडगा आहे. "द्रौपदी" वस्त्रहरण आख्यान ती काव्यात गोवते. महाभारतावर तिच खूपच प्रेम आहे.

आपली स्वतःची परिस्थिती (सांपत्तिक) ही चांगली आहे. साऊंड आहे हे म्हणताना ती म्हणते—

**भाऊ रे तुल्हे सांगु, मन्हा घरनी तायापुर।**
**दर दिवायीले आशा चोई नी जबर।। (२४)**

अरे दादा! तुला देण्या घेण्याची भीती वाटू देवू नकोस अरे मी माझ्या घरची "सगीन" (सधन, श्रीमंत) आहे. तरी देखील दर दिवाळीला चोळीला खण तुझ्याकडूनच मिळावा अशी जबरदस्त आशा माझ्या मनात असते. अपेक्षा हीच असते. उपजत स्त्री स्वभाव आहे तो. माहेर बद्दल तिला आदर असतो. माहेरच सारच चांगल असते.

त्याचवेळी बहिणीची "सासू" सांगते—

**काय सांगू भासा, सुन लाखनी धनीन।**
**चिंता चोई नी करीन, दर दिवायीना दिन।। (२५)**

अरे भाच्या (बोलणारी त्याच्या बहिणीची सासू ही त्याच्या वडिलांची बहीण आहे.) माझी लाडकी सून जरी तिच्या घरची लक्षाधीश असली तरी प्रत्येक स्त्रीला माहेरची ओढ असते. ती भावाकडून चोळी मिळण्यासाठी दर वर्षी दिवाळीला मनात चिंता करीत राहील, फिकीर करेन.

बहिणीच्या सासुचे भाऊ (सुनेचे वडील) हे वारलेले (हयात नसतात) असतात. त्यांची आठवण येऊन तिचे डोळे पाणावतात. ती म्हणते—

**मरीग्या कंसमामा, देवका रडे धाये धाय।**
**दिवायीनी चोई, पापी नसिबे वर्जी माय।। (२६)**

अग बाई ! माझे भाऊ कंस मामा हे आज स्थितीला हयात नाही. माझा भाचा पोरका झालेला आहे. त्यांच्या आठवणीत आज बहीण "देवका" ला ढसाढसा रडायला येत आहे. माझी दिवाळीची "चोळी" (माहेरच लेण) नशिबाने बंद केली आहे, वर्ज्य केली आहे.

वरील ओवीवरून तिचा महाभारताचा दांडगा अभ्यास असावा. तिच्या काव्यात कंसमामा-देवकी बहीण यांचे प्रतिके येतात.

सासू म्हातारी झाली आहे. तिला समोर "मरण" दिसते आहे. भाऊ नसला म्हणजे काय अडचणी येतात त्याचे वर्णन ती करते. . . .सासू म्हणते—

**माय, मरनना येले, जोडे नही मन्हा 'हिरा'।**
**चोई, लुगडानी घडी, देई (कोन) डहनले फेरा।। (२७)**

अग बाई, सूनबाई मी जेव्हा मरेन ना त्यावेळी माझा भाऊ माझ्याजवळ नसेन. (मला एकूलता एक भाऊ होता तो सैन्यात देशाच्या कामी आला आहे). शेवटची बोळवण व चोळी लुगड्याची घडी मला कोण बरे अर्पण करेन व माझ्या लाकडाच्या चितेवरील प्रेतास (मृतात्म्यास) फेऱ्या कोण घालणार ? (मी अभागीन आहे). शेवटची बोळवण ही माहेरची व भावाच्या खर्चाने लागते व तीच लागू पडून पवित्र होते अशी एक रूढ समजूत अहिराणी भाषिक प्रदेशात आजही आहे. मराठ्यांची ती प्रथा आहे.

अस बोलतांना बहीणीला भावाच्या जेवणांची आठवण होते ती म्हणते—

**एकादशी बाई, दुवादशी कोरी नही।**
**केईना पानवर, पारन सोडे मन्हा भाई।। (२८)**

अरे दादा माझ्याकडे काल एकादशी होती. आज द्वादशी आहे. ती कोरी व कुवारी नसते. आज बारस आहे, प्रदोष आहे. केळीच्या पानावर बसून आज तुझा उपवास सोड. यथेच्छ भोजन कर. खान्देशी रावेर, भुसावळी केळी जेवणानंतर खा. जेवणानंतर फळ खावीत. ती आरोग्य पोषक असतात हा गुण तिला अवगत आहे.

बहिणीच्या नवऱ्यावर (पाव्हण्यावर) किती प्रेम आहे हे सांगतांना तो म्हणतो—

**आंबानी कयरी, आंबाले झायी जड।**
**बहिनना साठे, हाऊ सोयरा लागे गोड।। (२९)**

बहिणीच्या घरी सर्व सुख समृद्धी आहे. अंबराई हिरवी कंच असून बहरली आहे. मुल, बाळ, धन-धान्य विपूल आहे. अहो, मला आक्कापेक्षा युवराज बापूच अधिक प्रिय वाटतात. येथे सर्वत्र आबादानी आहे. अंबराई आहे.

भाऊ तिच्या घरून त्याच्या घरी परत जातो. त्यांच्या मनात त्याला "मूलबाळ" नसल्याची खंत असते. त्याला मूल व्हावं म्हणून बहिण "नवस" करते........ गांवातील "बोरी" नदी काठच्या महादेवाचे मंदिरात जाऊन रोज ती देवाला बेलपत्र वाहून "साकळ" घालते. पूजा करते. घरी "गणपती" ही पाण्यात टाकून ठेवते. तेव्हा ती म्हणते—

**माहेरना देव, तुल्हे नही विसरन।**
**ईमा ना भाऊना, येल दे पसरीसन।। (३०)**

अरे माझ्या माहेरच्या महादेवा! वर्णेश्वरा! भोळ्या सांबा, तुला मी विसरणार नाही. तुला मी सतत बेल वाहीन. पूजा करीन. माझी एकच इच्छा पूर्ण कर. माझ्या लहान भावाचा अशोकचा वंश वेल वाढू दे. पसरू दे (त्याला मुलगा होऊ दे.)

तिच्या भोळ्या भक्तीला देव पावतो. सौ. विमलने केलेली प्रार्थना महादेव ऐकतो. तिला "भाचा" होतो. ती आनंदते. त्याला पहावयास तिच्या माहेरी निघतांना सोबत "सोन्याची मुंदी" व नवे कपडे, खाऊ घेऊन जाताना ती म्हणते—

**हौस माले लागी, हावश्या भासानी।**
**भासाले लीवू टोपी, टोपी चकरीनी।। (३१)**

अग बाई मला ज्याची हौस होती तो बाळ राजा (भाचा) भावाकडे जन्माला आला आहे. भाच्याला पाहण्याची वनाबाईला खूप हौस आहे. तीव्र ओढ आहे. मायेची "कळ" आहे. मी भाच्यासाठी नवे कपडे, झबले, चक्रीची टोपी घेतली आहे. लहान मुलाला "रूपदर्शन" म्हणून नवे कपडे, सोन्याचे दागिने देण्याची आजही खान्देशात रूढी आहे. प्रथा आहे.

अग बाई विसरेलच मी. भाच्याबरोबर त्याच्या आईला (भावजयला) पण आहेर घ्यावा लागणार आहे. ती म्हणते नाहीतर "भावना" राग भरेल....तेव्हा म्हणते—

**काईचंद्रसाडी, कशी नेसू मी एकली।**
**भाऊना घर, भवजायी "अर्चना" से धाकली।। (३२)**

अलीकडे माझ्या ह्यांनी मला हौसेने "काई चंद्रसाडी" ची जोडी (दोन) घेतली आहे. अग मी त्या दोन्ही कशा वापरू त्याची 'घडी' कशी मोडू. त्याच्यातील एक वापरण्यासाठी सर्वात लहान भावजय सौ. अर्चनाबाई आहे ना! तिच्या गोऱ्या रंगाला व नीटस

बांध्याला शोभेल. ती अधिक सुंदर दिसेन. मी तिला साडीचा "आहेर" करणार आहे. सौ. कल्पनाबाई, सौ. भावनाबाई यांना हंगामावर घेईन.

अन् माहेरला या ना त्या कारणाने, निमित्ताने जावयास मिळणार अन् तेही नवऱ्या-बरोबर या विचारान ती फुलते, मनोमन आनंदते. माहेरची तीव्र ओढ आहे ती नवऱ्याला "राम" ला म्हणते—

**कोन्ही जातीन पंढरपूर, आपुन जाऊत माहेरी।**
**भाऊ भासासनी, मन्ही "जतरा" दुहेरी।। (३३)**

अग बाई आनंद, मौज करणे कामी कोन्ही महाराष्ट्राच्या आराध्य देवतेचे निवास असलेल्या पवित्र पंढरपूर नगरी जातात. तेथे त्यांना आत्मशांती मिळते. देवदर्शन होते. आपण मात्र माझ्या माहेरी बैलगाडी करून जाऊ या. त्या ठिकाणी माझे आई, सोनाताई, बाबा, आनंदातात्या व भाऊ कृष्णा, भास्कर, अशोक, भाचे राजू, संजू, कुंदन व इतर यांच्या भेटीगाटी होतील. घराला तेव्हा यात्रेचे स्वरूप येईल. आपण मला "माहेरी" पोहचवावयास याल. ही माझी "दुहेरी" (डबल) यात्रा होईल. माझा आनंद द्विगुणीत होईल. भेटीत आनंदाला पारावार उरणार नाही.

अन् अशी ती माहेरी पोहचते. तिचा भाऊ आनंदतो तिला पाहून तेव्हा ती म्हणते—

**भाऊ कसा म्हने, "ताई" ऊनीना भेटाले।**
**भवजायी कल्पना म्हने, ऊनी ननीन लुटाले।। (३४)**

दादा म्हणतात सौ. गीताबाई आपल्याला भेटावयास आली आहे. बिचारी बऱ्याच दिवसापासून माहेरी आलेली नाही. तेव्हा घरातून भावजय सौ. कल्पना म्हणते अहो! कवी महाराज! ह्या ननंदबाई आपल्याला लुटायला आल्या आहेत. यांना लुगडे, चोळी, त्यांच्या मुलांना कपडे घ्यावे लागणार, पाहुणचार करावा लागेल केवढा खर्च होईल हो या महागाईच्या जमान्यात.

अन् भराभर दिवस निघून जातात. शेतीच्या कामात. दिवाळीला सर्व बहिणी माहेरी एकत्र गोळा होतात. भाऊबीजेचा दिवस ऊगवतो. मधला भाऊ "बापू" "शेतीनिष्ठ" शेतीवर कामाला गेलेला असतो. "कमा" त्याला ओवाळण्यासाठी वाट पाहते. ती भावाला घरीदारी शोधते. तिचा जीव अक्षरशः कासावीस होतो. तेव्हा तिच्या मनाच्या स्थितीचे वर्णन करताना ती म्हणते—

**धरतरी तडफडे, मीरीगना पानी साठे।**
**आज भाऊ-बीज माय, दखु मी भाऊ कोठे।। (३५)**

अग बाई ज्या प्रमाणे धरतरी (धरणी), जमीन मृग नक्षत्रात पडणाऱ्या पावसाच्या पहिल्या सरीची आतुरतेने वाट पाहत तिष्ठत बसलेली असते. आसुसते त्याप्रमाणे मी आज

भाऊबीजेच्या दिवशी भावाची ओवाळणी "औक्षण" करणेसाठी, त्याच्या दर्शनासाठी सारखी "चातका" प्रमाणे वाट पाहत आहे. भाऊ अजूनही आलेला नाही.

भाऊबीज संपते. दिवाळी संपते. अक्षय तृतीया येते, तीही जाते. मध्यंतरी घरातील दारिद्र्यामुळे सौ. मथुरा, सौ. कमल, सौ. विमल त्याच्या यजमानांसह मुंबई नगरीकडे पोटासाठी धाव घेतात. यंदाच्या दिवाळीला त्या येवू शकणार नाही. म्हणून मोठा भाऊ त्यांना भाऊबीजेसाठी दुसऱ्या व्यक्तीचे हातून भाऊबीज भेट म्हणून "केतकी खण" "सोलापूरी-नाटी" व त्यात आत "लाल" कुंकवाची पुडी पाठवितो. त्या मिळालेल्या वस्तुंना पाहून "कमा" म्हणते—

**खननी व घडी, त्यामा कुकुनी बसे पुडी।**
**भाऊ भासानी खुशाली, माई ईचारे घडीघडी।। (३६)**

खणाची घडी (चोळी), व त्यात आतमध्ये अखंड सौभाग्याच लेणं लाल कुंकवाची पुडी ठेवली आहे. भावाने हे भाऊबीजेच लेणं पाठविल आहे. "तू अखंड सौभाग्यवती भव" लाभो दीर्घायू तुझ्या पतिला ! असा संदेश लाल कुंकू देतो. मी बाई खणाकडे त्या त्रिकोणी घडीकडे पाहून त्याला पुन्हा पुन्हा विचारीत आहे. हे त्रिकोणा, आनंदा च्या खुणा ! माझे दादा, बापू, नाना हे भाऊ राजू, संजू, कुंदन हे भाचे व कु. मनिषा, (माई) कु. स्वाती, कु. ज्योती, कु. छायाताई या भाच्या अगदी आनंदात आहेत ना ? हे खणाची घडी, माझी चोळी, सांगना ग ते कसे आहेत ? खणाची पांढरी किनार समोर दिसते तिला वाटते तो हसतो आहे म्हणजे माहेरी सर्व "ऑलवेल" असाव. ती संतोषते.

त्याचवेळी तिथे "पाहुणी" आलेली कृष्णाची मामे बहिण सौ. कलावती सोनवणे म्हणते—

**बहिनले भाऊ, एक देवबा वंशिद्राले।**
**चोईना एक खन, एक रातना ईसावाले।। (३७)**

अहो देवा ! प्रत्येक बहिणीला एक भाऊ, त्यांच्या वडिलांच्या वंशाला असू द्या. दरवर्षी चोळीचा एक खण तो बहिणीला भाऊबीज भेट देत जाईन व जगांतील रंजलेल्या, गांजलेल्या सासुरवासी बहिणीला त्याच्याकडे एक रात्रीची विश्रांती मिळत राहील. दर एक भाऊबीजेला मनांतील "हळका-भळका" त्याच्या जवळ व्यक्त करता येईल.

अन् अशा रीतीने अहिराणी बोलीतील बहिण-भावाच निर्मळ, निर्व्याज, शुद्ध-बुद्ध प्रेम, वर्णन करताना आद्य कवियित्री अहिराणी स्त्री "सोनाई" च सहृदय अंतःकरण पिघळत, हेलावत. वर्णनास तिला शब्द अपुरे पडतात. या संसारी अनेक नाते-गोते असले तरी त्यातील काही पैशाचे मागे फिरतात म्हणे. अन् शेवटी सर्वांचे मुखातून एकाच वेळी उद्गार बाहेर पडतात "आभाळ मोलाच अतुट, रक्ताच नातं आहे बहिण-भावाचं !!"

● ● ●

# लेक

'लेक' म्हणजेच मुलगी. मुलगी मुलाइतकीच आईवडिलांना आवडते. रक्ताच्या नात्यापैकी हे एक. दोन्ही खान्देश (पूर्व आणि पश्चिम), (हल्लीचे जळगांव व धुळे जिल्हा) तसेच नासिक जिल्ह्याचा बराचशा भागांतील लोकांची ग्रामीण भाषा, बोली भाषा (Gaelic Language) अहिराणी, ही त्यांची मायबोली, ही साहित्य रत्नाची खाण, अहिर-अभिर, आदिवासी लोकांची भाषा म्हणून ओळखली जाणारी अहिराणी. मराठी भाषेइतकीच समृद्ध, साजशृंगारांनी ओतप्रोत भरलेली आहे. काळाच्या ओघात तिच्याकडे दुर्लक्ष होत असेल तरी तिच्यातील साहित्य वाखाणण्यासारखे असून, तिच्यातून साहित्याचा अखंड झरा न कळत वहात आहे.

खान्देशचे भूषण अहिराणी तिच्यातील लोकगीते, भावगीते, चटकदार लोककथा, तोंडी परंपरेने आलेल्या सुरस दंतकथा, म्हणी, भाषाशैली व वाक्यरचनेचे वैशिष्ट्यपूर्ण उखाणे, पोवाडे आणि विशेषत: खान्देशातील अडाणी स्त्रियांच्या तोंडून निघणाऱ्या सहज-स्फूर्त बाह्यस्वरूपांनी ओबडधोबड, तालबद्ध, स्वरमाधुर्याने तंतोतंत अर्थनिर्मिती करणाऱ्या सस्कृतीचे ओझरते दर्शन घडविणाऱ्या ओव्या !

आजकालच्या अद्यावत, प्रगत विज्ञानाच्या, चंद्रस्वारीच्या काळात व 'गरीबी हटाव' च्या, समान हक्क अपेक्षित सुधारलेल्या युगात देखील काही बहुसंख्य अभागी मागास (सामाजिकदृष्टया) खेडूत, ग्रामीण, नागरी स्त्रियांना घरातील अठराविश्वे दारिद्र्यामुळे व आजकालच्या दिवसेंदिवस महागाईच्या वाढत्या स्पर्धेच्या असहाय काळात (इच्छा नसताना) दळण्याचे काम घरीच जात्यावर करावे लागते. जाते ओढण्याचे अव्याहत, अविश्रांत अवीट श्रम कमी व्हावेत म्हणून तिच्या मुखातून सहजस्फूर्त, तालबद्ध ओव्या गोड मंजुळ स्वरात गाईल्या जातात. सकाळच्या कातर, धुंद वातावरणात जात्याच्या घर् घर् सुरेल संगीताच्या तालावर (बर्मन दादा व लक्ष्मीकांत प्यारेलालच्यां संगीताची सुरेख व लतातांईच्या गोड गळयाच्या जोडीची नव्या आवाज संगीताची तिला आवश्यकता भासत नाही.) गाईलेल्या कर्णमधूर ओव्या मराठी साहित्य रसिकांच्या मनातील सुप्त भावनांचा वेध घेवून त्यांना जागृत करतात. ग्रामीण स्त्रियांच्या मनातील सहज-स्फूर्त, उत्कट भावनांचा प्रकटभाव, अविष्कार आहे, अमर काव्य आहे यात तिळमात्र शंका नाही.

परीक्षा पास होण्यासाठी, सिनेकलावंत होण्यासाठी, चिकन *** मिळण्यासाठी देव-देवतांना (अनुक्रमे) नवस करणारी तरुण पिढी, इच्छित चौकडी मडक्यात लागावी, आगामी ड्रॉ मध्ये आपल्यालाच लॉटरी तिकीटाचा नंबर लाखावर लागावा म्हणून भारतातील

पस्तीस (?) कोटी देवदेवतांना बोकड, बाटली! (आवडीप्रमाणे) नवस करणारी मध्यम पिढी आपल्याला ठाऊक आहे. परंतु उभ्या आयुष्यात मुलगी झाली नाही म्हणून उतार वयात (अर्थात योग्यच) देवाला नवस करणारी, देवीला आळविणाऱ्या ग्रामीण स्त्रीचे भाव खालील ओवीत प्रकट झालेले आहेत—

**नवस मी करू, करू एकोरा भवानीले ।**
**खपी चालनी हयाती, धरडपने पाव माले ।। (१)**

मी एकवीरा भवानी (आई) ला नवस करते. माझे सारे आयुष्य निघून जात आहे. मला उतारवयात (म्हातारपणी) प्रसन्न हो. (मला एक सुंदर गोरी गोरी मुलगी होवू दे).

तारुण्याचा उंबरठा ओलांडल्यावर वार्धक्याकडे वाटचाली करताना जीवनात उणीव आहे. (त्यांची आयुमर्यादा वाढताना) तिला खंत जाणवते मूलं आहेत पण मुलगी नाही. मुलगी असावी या तिच्या मायेच्या पोटी ती नवसाला प्रवृत्त होते. जणू ती वदते— 'मुलगी होवू दे मला—भवानी आई रोडगा वाहीन तुला'—तिच्या मनाचा पिंड उघडतो सूप्त भावना उद्वेगतात, कुलदेवतेची तिला आठवण होते. अंबा, जगदंबा, सप्तशृंगी, एकवीरा यांच्या परंपरेतील एकवीरा तीला आठवते. देवीला 'नवस' करतांना आदीमाया शक्ती तिला अग्रणी आहे. 'लेडीज फर्स्ट' या आधुनिक, आवडत्या आंगल उक्तीला आमची अहिराणी स्त्री विसरलेली नाही. मागणी करतांना ती आधुनिक 'इंदिरा' विसरलेली नाही. स्त्री समान हक्काच्या भावना अहिराणी स्त्रीला फार पुरातन काळांपासून अभिप्रेत आहेत. अपत्याबद्दलचे आकर्षण, वात्सल्याची सूप्त भावना, कुलदेवतेबद्दलचा नितांत आदर व समाज रुढीचे अभय (Fearlessness) ती या ठिकाणी व्यक्त करते. आपल्या मागणीचा पाठपुरावा एकादशीला निर्जला उपोषण करणाऱ्या मुलगी मागणाऱ्या स्त्रीला आधुनिक हुंडा पद्धतीची भीती मनाला वाटत नाही. [लेवा समाज हुंडा विरोधी समितीची ती चीफ प्रमोटर असावी किंवा तिच्या नवऱ्याजवळ नं. २ चा (काळा) पैसा भरपूर असावा. नियमित पुरवठ्यामुळे सेंट्रल कस्टम आणि एक्साईज अधिकाऱ्यांना तीचे घर माहित नसावे!]

नैतिक अधिष्ठान श्रद्धा यांत अहिराणी स्त्री मागे नाही. जगसम्राट अभिलाषी इंग्रजाचे Balance of power हे तत्त्व तीला माहीत आहे. (ती कलीयुगातल्या चांगल्या पुढाऱ्याच्या मार्गदर्शनाखाली राजकारणाचे धडे घेत असावी). ती पक्षांतर करते, आपण देवीला नवस केला, देवाला राग येईल, तो कोपेल म्हणून त्याच्या सांत्वनासाठी ती त्याला म्हणते—

**देव, सावया सबई ।**
**दारे येऊ दे, जवाई ।। (२)**

हे सावळ्या, उशिरा न्याय करणाऱ्या देवा, माझ्या दारी जवाई येवू दे.

सहश्रम भागीनी ( अर्थ भागीनी नव्हेच ) मुलगी तिला हवी आहे. आमच्या अहिराणी स्त्रीवर पुराणांतील गुणांचा संस्कार अगदी टिच्चून झाला आहे. 'ठोठावा म्हणजे सापडेल' ह्या पासून ती दूर नाही. तिची मागणी धूर्त आहे, देवाला ती शाब्दिक छल करून अडकवते. मुलगी होवू दे असे न मागता देवा दारी जावई येवू दे अशी जोरदार मागणी ती करते. सती सावित्रीच्यावर मागणीची छाप तिच्यावर पडल्याशिवाय राहिलेली नाही. अहिराणी ओव्यात सहजस्फूर्त भाव ओथंबून भरलेले असतांना साहित्य गुणापासुनही ते वंचित नाही. सावया सबई यात सहजगत्या अनुप्रास साधला गेला आहे. रचनेचे स्वरूपात तालबद्धता आढळते. देवाला सावळा म्हणतांना 'कृष्णदेव' तीला अभिप्रेत आहे. तीने देवाला सबई हे विशेषण लावले आहे. देवावर नितांत श्रद्धा आहे, देव उशिरा कां होईना योग्य न्याय देतो ही तीची भावना 'भगवान के घर देर है अंधेर नहीं है' हे हिंदी गीतातील वाक्य आमच्या अहिराणी स्त्रीच्या भावनांचा समन्वय घडवित असल्याचा भास होतो. सावळा या शब्दाच्या पुराव्यावरून क्षणभर मन साक्षी देते 'कृष्ण भगवान' नंद दरबारात (हल्लीचे नंदुरवार) ला मुक्कामी असावेत म्हणून त्यांची इतकी खोल छाप खान्देशी साहित्यावर पडलेली आहे.

ईश्वराची माया अपरंपार आहे, महिमा अगाध आहे. देव तिला पावतो, मुलाच्या पाठी वर तीला फार दिवसांनी (एक) मुलगी होते. ('हम दो हमारे दो' ची परिपूर्ती होते) इतर बायांपेक्षा आगळ्या संसार सुखाचा आस्वाद मिटक्या मारत घेत असताना तिचे शेजारणीवरचे प्रेम उमळते व ती वार्तालाप करते. फार दिवसांनी मनोवांच्छित पूर्ण झाले आहे. आपल्याला लेक झाली आहे हे प्रसिद्ध करताना तिला आनंद वाटतो. (तिच्या काळात दैनिक 'बातमीदार' नाही, गावकरी नाही तिला बॉबी झाली आहे पण स्वतःहून प्रसिद्धीसाठी ती काही सिनेनटी नाही, डिम्पल कपाडिया नाही) इतरांना माहित व्हावे म्हणून ती स्वतःच सांगत सुटते (वर्तमानपत्रांत जाहिरात देण्यासाठी तिच्या-जवळ पैसे नसावेत)—

**काय सांगू व, शेजीबाई ।**
**लेक लाडनी, माले झाई ।। (३)**

हे शेजारीन बाई तुला काय सांगू माझ्या उदरी ( लाडक्या ) मुलीने जन्म घेतला आहे.

शेजार धर्माचे ती पालन करते. फार दिवसांनी मुलगी झाल्याने तिच्याबद्दलच्या प्रेमाचा मुरब्बा झाला आहे. ती आनंदाने शेजारच्या स्त्रीजवळ तीच गोड कौतुक करते. (महिला मंडळे तिच्यावेळी नसावीत). गप्पा रंगतांना शेजारीण म्हणते ही किती बाई ब्याद आहे, पीडा आहे, शाप आहे. हिच्या लग्नाला खूप पैसे लागतील ही तुम्हालां कंगाल करून टाकेल हो! (ठमा काकू!) वादविवादांत व आपला मुद्दा मांडतांना देखील

आमची अहिराणी स्त्री जगाच्या मागे नाही. मी म्हणते तेच खरे व पटवतांना ती म्हणते––

**शेजी व मन्हीबाई, हाई पहिलीव कन्या।**
**घर इनवं जवाई, दारे जमाडीन दुन्या।। (४)**

अग शेजारीण बाई अहो! ही माझी पहिलीच मुलगी (मुलींमध्ये पहिली) आहे. माझ्या घरी जावई येईल (हिच्या लग्नाच्या निमित्ताने थोरामोठ्यांच्या गाठी-भेटी होतील, साधूसंतांचे पाय, भाग्यवंतांचे पाय माझ्या घराला लागतील घर पवित्र होईल) दारी जनसमुदाय गोळा होईल.

मुलीचा कंटाळा तिला नाही. वात्सल्य ओतप्रोत भरले आहे. भविष्यातील वाटचाल, आशावाद तिच्याजवळ आहे. भावी सुखांवर जगण्याचा निर्धार, करारीपणा तिच्या स्वभावात आढळतो.

मुलीचे बारसे थाटात साजरे केलेले आहे. एक स्त्री मुलीला पाहावयास येते. तिच्या हातात एक रुपया (खरी किंमत २८ नवे पैसे) देवून त्या स्त्रीला विचारते बाई आपल्याला मुलं बाळं किती, आपण पाळणा थांबवा. आपला त्रिकोण पूर्ण झाला आहे काय? आपण ऑपरेशन करून घ्या. (बहुधा ही जि. प. मधील कुटुंब नियोजन शाखेतील (?) विख्यात परिचारिका असावी).

मुलाखतीस योग्य उत्तर देतांना आमची अहिराणी 'स्त्री' काव्यमय उत्तर देते––

**नर्सा इचारसं, तुले पोरेसोरे किती।**
**"हिरा" लावनीनां आंबा, लेक सागरनी मेथी।। (५)**

नर्स विचारते तुम्हाला किती मुले आहेत हिरा (मुलगा) लावलेला आंबा आहे आणि मुलगी सागराची मेथी आहे.

'हम दो हमारे दो' हे इतक्या सफाईदारपणे उत्तरताना स्पष्टीकरणाची प्रकटणाची तिची हातोटी आगळी आहे. साहित्य गुणांनी देखील अहिराणी ओजस्वी आहे. तिच्यात रुपक, उपमा, उत्प्रेक्षांची लयलूट आहे. भोवतालचा परिसर तिच्या काव्यात डोकावतो. मुलाला हिऱ्याची व मुलीला मेथीची उपमा सार्थ वाटते. ती एकेरीपणाची रूपके आहेत. 'हिरा' एखादाच चांगला असतो (लाखों मे एक). तसेच त्याला लावणीच्या आंब्याप्रमाणे जोपासलेला आहे. येथे तिच्या मनाचा हळवा भाव प्रगट होतो. मुलगा हिऱ्याप्रमाणे दैदिप्यमान आहे, सर्वश्रेष्ठ आहे व मुलगी सागराच्या मेथीप्रमाणे (दुर्मिळ) एकटी आहे. अहिराणी स्त्री या ठिकाणी निसर्ग व मानव याची सांगड घालते. आदि भौतिक सुखवादात गुरफटतांना निसर्गाशी समरस होते. भोवतालचे वातावरण आपल्या काव्यांत प्रतिबिंबित करतें.

एकटी मुलगी व तिच्या संगोपनात तीला तिच्या बहिनीची आठवण पडते. बऱ्याच दिवसानंतर ती बहिणीला (लहान) भेटावयास गेली असता तिला बहीण म्हणते—

**समुदरनी लाट, लाट ई वसरनी।**
**ताई ले झायी लेक, बहिन इसरनी।। (६)**

समुद्राची लाट आली व ओसरली, ताईला (मोठ्या बहिणीला) मुलगी झाली व (लहान) बहिणीला विसरली.

प्रेमाला या ठिकाणी समुद्राच्या लाटेची उपमा अहिराणी स्त्रीने दिलेली आहे. तीने केलेल्या प्रवासाचा तिच्या काव्यात अविष्कार झालेला आहे (जुहूच्या किनाऱ्यावर बसून समुद्राच्या लाटांची भरती ओहोटी तीने कदाचित पाहिली असावी). मुलीवर आईचे किती प्रेम आहे याची खोली, गाढचता या ठिकाणी व्यक्त करण्यात येवून भोवतालच्या परिस्थितीत वातावरणात बदल झाल्याने कमी होणाऱ्या प्रेमाचे सुंदर विश्लेषण या ठिकाणी केलेले आढळते. आई कामासाठी (नैसर्गिक) बाहेर गेलेली आहे. लहान मुलगी तिच्या वियोगाने जोरजोराने रडायला लागते त्या वेळी मावशी तिला चूप (गुपचूप) करण्यासाठी गीत म्हणते—

**हड् हड् कुतर,-गावभर जाय।**
**लौकशी लईये, मनी लेकनीमाय।। (७)**

हे कुत्र्या ! हड्ऽ (चालता हो) येथून जा (तू) गांवभर जा. (लेकीच्या आईला लौकर शोध व पाठव).

अलिकडच्या चूप करण्याच्या (लाचलुचपत) पद्धती तिला ठावूक नाहीत. कुत्र्याच्या साहचाने व्यक्ती हुडकून काढणाऱ्या पद्धती तीला फार पूर्वीपासून अभिप्रेत आहेत. (वास-देवून गुन्हेगार शोधणाऱ्या कुत्र्यांना शिक्षण देण्याच्या योजनेची कदाचित हीच जनक असावी).

आई लौकरच येईल जोपासनेची तीव्र भावना व संगोपनाचा आदर्श ती येथे व्यक्त करते. भावनेच्या आहारी जावून प्राण्याबरोबर निरोप देते. भावनाचीं तीव्रता व लय यातून व्यक्त होते. हड् हा शब्द दोनदां वापरून त्यावर जोर देवून प्रगल्भता व्यक्त झालेली आहे.

आईला निरोप मिळाला, आई आली, मुलगी सहजा सहजी झोपत नाही ती सारखे आकाशाकडे (चंद्राकडे) बोट दाखविते तिला उद्देशून ती म्हणते—

**लाडकी व लेक, तुना लाड आसा कसा।**
**गगनना चांद, तुले धरी देवू कसा।। (८)**

हे लाडक्या मुली तुझा हा लाड कोणत्या प्रकारचा आहे ? तुला दूरवरच्या आकाशातील चंद्र (अशक्य गोष्ट) कसा धरून देवू (खेळण्यासाठी).

आपल्या मुलीवर चांगले संस्कार व्हावेत, तीच्या रोजच्या खेळातील खेळणी सुद्धा सुसंस्कृत असावीत ही तिची उच्च अभिरुची याठिकाणी व्यक्त होते. तीचे उच्च राहणीमानाचे चित्र मनःचक्षुपुढे साकारते. सुज्ञ मनुष्य विचार-कल्पना-ध्येय-स्वप्ने यांच्या ऊंच भराऱ्या मारतो कधीही वास्तवतेला सोडून भटकत नाही. पृथ्वी व स्वर्ग (विश्व) यांना जोडण्याचा प्रामाणिक संबंध ठेवतो. ध्येयवाद व वास्तववाद यामध्ये सांगड घालतो, समन्वय साधतो, हे तीने दर्शविले आहे.

आपल्या मुलीच्या संगोपनाच्या बाबत ती दक्ष असते. आकाशाकडे पाहताना हळूच मुलीच लक्ष दाराशी बांधलेल्या गोन्ह्याकडे (लहान बैल) जाते. ते आईच्या लक्षात येताच ती तीला हाकारून म्हणते—

**दारसेना नंदी, नंदी मागसं खेयाले।**
**नादानं लेक तुले, शिंगड् मारी व हियाले।। (९)**

दाराशी बैल (बांधलेला) आहे. तो खेळण्यास मागते. हे असमज मुली तो तुला शिंग मारील. तुझ्या हृदयाला (शरीराला) इजा होईल.

भोवतालचा व्यवसाय व परिसर यात डोकावतो. शेतकरी व त्यांची मुले यांना बैलाबद्दल वाटणारा जिव्हाळा व महादेवाच वाहन (नंदी) ही धार्मिक भावना या दोन्ही खेळणे निवडतांना संयुक्त वाटतात. तो मारील असे म्हणतांना तीचा दूरदर्शीपणा व भविष्यातील संकटाची चाहूल जाणवते. (भारतीय संरक्षण खात्यात तिला वरची नोकरी द्यावयास हरकत नाही).

चंद्र धरून देता येत नाही व नंदी खेळायला देता येत नाही, काहीच मिळत नाही म्हणून लेक आरडा ओरडा करते, अकांडतांडव करते, भोकाड पसरविते आई तीला आश्वासन अलिकडच्या मंत्र्याप्रमाणे देते व म्हणते—

**लाडकी व लेक, तुना लाड बजारमां।**
**साखर फुटाना, तुनां आयबाना पदरमा।। (१०)**

हे लाडक्या मुली तुझे लाड बाजारात (गांवचे बाजाराचे दिवशी) बाजार पेठेत पुरविले जातील. तुझे वडील फुटाने पदरात (बांधून) आणतील. खेडे गांवात उघडे-नागडे पदार्थ विक्रीस ठेवले जातात ते आरोग्याला अपायकारक असतात. म्हणून जिलेबी, लाडूचा खाऊ ती मुलीला मागवीत नाही. संभाव्य कॉलऱ्याची साथ टाळण्यासाठी ती साखर-फुटाणे आणले जातील हे भाकित करते (फूड इन्स्पेक्टर व सॅनिटरी इन्स्पेक्टर तिच्या गावी नसावेत).

मुलगी मोठी झालेली आहे तीने समाजात आपला आदर्श ठेवावा म्हणून (तिचे मूळ नांव दुसरे असतांना देखील) वडील तिला वेगळ्या नावाने हाक मारतात. (नावी वसे सर्व काही) म्हणून आई म्हणते—

**माय मन्ही लेक, नांव हिन सीता गीता।**
**सदाकदा हाकामारे, कोड-कौतुक्या हिना पिता ।। (११)**

ही माझी मुलगी हिचे नाव सिता गीता (आहे) हिचा हौसी बाप तिला सदोदित (त्याच नावाने) हाका मारतात.

लाडाने, प्रेमाने अपत्य वत्सलते पोटी, मायेच्या उमाळ्यान बाप मुलीला नेहमी जोडनावे हाक मारतो. अहिराणी भाषेतील ही लकब आहे. विशिष्ट जोर, ताल, लयबद्धता येण्यासाठी नांवे जोडून म्हटली जातात. अर्थ निष्पत्ती नसली तरी तो प्रघात आहे, आघांत आहे.

सीता गीता हाक मारताना मुलीच्या वडिलांना अलिकडच्या जी. पी. सिप्पी यांचा 'सीता और गीता' हिंदी चित्रपट किंवा त्याच्यातील हेमामालीनी अभिप्रेत नाही. (सिनेमाच्या नावावरून मुलीची नावे ठेवण्यास फॅशन पासून) ती अलिप्त आहे. अहिराणी स्त्री ने आपल्या मुलीचे नाव सीता गीता ठेवताना पावित्र्य व आदर्श यांचा समन्वय साधला आहे. मुलगी सीते प्रमाणे (पवित्र) गीते प्रमाणे (भगवत् गीता) आदर्श श्रेष्ठ सदोदित राहावी व जागतिक किर्तिची व्हावी अशी तिची अभिलाषा आहे. अर्थावर जोर देण्यास ती तत्पर आहे.

मुलगी आता तरुण झाली आहे. (ना सोलासे उपर न सतरा से कम) या अवस्थेत तीने चांगले कपडे वापरावे, खुलून दिसावे, चार चौघात उठून दिसावे म्हणून ती मुलीला उपदेशते–

**काई चंद्रसाडी, घडी मोड खाटवरी।**
**बारीक घाल मिरी, लेक आईबानां राजवरी ।। (१२)**

काळ्या चंद्र साडीची घडी खाट (चार पाई, पलंग) वर मोड. (जमिनीवरती मातीची होईल, घाण होईल). बारीक निऱ्या घाल. आई बडिलांच्या राज्यात (काळात हयातीत) हौस (शौक) पूर्ण करून घे.

आपल्या गोऱ्या गोमटचा मुलीला काळ्या रंगाची (मध्यभागी चंद्र व चांदण्या, चंद्रकोर ठेकलेली) करवती किनारीची साडी घेतांना आधुनिक कॉलेज कन्यकांच्या मॅचिंग रुढ कल्पना सुप्त आहे. दृष्ट लागू नये म्हणून काळ्याचा केलेला अवलंब, परंपरा व रुढीला सहमत आहे व वात्सल्य व ममता प्रकट करतो.

वडिलांकडे हौस फेडून घे असे बजावतांना कदाचित जावई सटोऱ्या, दारुड्या, बाहेर-ख्याली निघेल व मुलीची हौस, इच्छा अतृप्त, अश्रान्त राहील. अशी न्युनगंडाची भावनांची दिवास्वप्न तीला पडत असावीत. कर्तव्यपूर्ती व खाटेवर घडीमोड म्हणतांना स्वच्छता व टापटीप तीला अभिप्रेत आहे. (स्वच्छता असे जेथे परमात्मा वसे तेथे) ती शिकलेली नाही. बारीक निऱ्या घाल म्हणतांना तिची सौंदर्य दृष्टी डोकावते. 'एक नूर आदमी दस नूर कपडा'.

आपली मुलगी सतत खुलून दिसावी असे तिला अलीकडे वाटते (यंदा कर्तव्य आहे) दागिन्यांनी विशेष शोभा आणावी म्हणून ती म्हणते—

**लाडकी व लेक, तूं सती मंदोधर।**
**सोनानां चंद्रहार, दारी गुफे पटोकर ।। (१३)**

लाडक्या मुली तू सती मंदोदरी (जीचे मन उदरांत आहे) आहे. (तुझ्यासाठी) सोन्याचा चंद्रहार गुफकरी (विणणारा) आपल्यादारी आला आहे. काव्य गुणांप्रमाणेच अहिराणी भाषा उपमा उत्प्रेक्षा अलंकारानी युक्त आहे. वरील ओळीत अलंकाराचा सडा शिपला आहे. संस्कृत कवीप्रमाणे अहिराणी साहित्यावर चंद्राच्या उपमाचा संस्कार हिरीरीने झालेला आढळतो. (उदा. काळी चंद्रसाडी, चंद्रहार इ.). निसर्ग पुजनाचा छाप त्यावर आहे.

गोरी गोमटी लाडकी लेक काळ्या चंद्रसाडीवर चंद्रहार (चपलाहार नव्हे) घालते व यौवनाच्या धुंदीत 'सोळाव वरीस धोक्याच व सोळाव वरीस······' गीत गाते त्यावेळेस तिच्या रूपाचा महिमा गाताना ती म्हणते—

**लाडकी व लेक, तुन्हा रुपनी आवाई।**
**धळ्या घोडावर, चान सारखा जवाई ।। (१४)**

हे लाडक्या मुली तुझ्या रुपाची ख्याती (प्रसिद्धी) (वर्तमानपत्रांत फोटो न देता) सर्व दूरवर पसरलेली आहे. पांढऱ्या (चपळ) घोड्यावर बसून चंद्रासारखा (शांत सुरेख) जावई येईल.

विवाह जुळविण्यासाठी तिने 'गावकरी' विवाह मंडळात नाव नोंदलेले नाही. तिची मुलगी रूपगर्विता आहे. तिचे सौंदर्याची वार्ता ऐकून पुष्कळ चंद्रासारखे सुंदर (तो पावेतो पहिला महामानव निल आर्मस्ट्रॉंग चंद्रावर जावून तेथील खडकांचे फोटो व माती घेवून आला नव्हता) राजकुमार जावई होण्यासाठी येतील. सुंदर जावई पसंत करीन हा तिचा आशावाद आहे. सार्थ उपमा डोकावतात.

मुलगी देखणी (ब्युटी क्वीन) आहे व गरीबाची आहे. दारिद्रयाची व्यथा म्हणून आपला फायदा साधण्यासाठी एक श्रीमंत वयस्कर विधूर तिला मागणी घालण्यासाठी

येतो तो त्या मुलीच्या वडिलांना मुलगी देण्याच्या मोबदल्यात पैसे देवू करतो तेव्हा ती म्हणते--

**इसनी सोपारी, लेकना बापनी खावू नई।**
**उप्पर पोरगी, दुजर ले देवो नई।। (१५)**

विषाची सुपारी (लाच लुचपत, पैसे) मुलीच्या वडिलांनी खावू नये. विवाहयोग्य (उपवर) मुलगी (कुमारिका) बिजवराला (वयस्क माणसाला) देवू नये. अहिराणीत निरनिराळ्या मानवी स्वभाव पैलूंचे दर्शन घडते. नवऱ्याला लाच लुचपत घेण्यापासून परावृत्तासाठीं ती धमकीच्या स्वरांत बोलते ( जनाब भुत्तो सारखी ). भ्रष्टाचाराची ती जाणीव नवऱ्याला करते स्पष्ट बजावते. [ जय प्रकाश नारायण यांना भ्रष्टाचार निर्मूलन समिती स्थापण्याची कल्पना (प्रेरणा) येथूनच झाली असावी ] भ्रष्टाचार निर्मूलन अध्र्वयूची भूमिका ती करते. वयस्कर माणसाला मुलगी न देण्याबाबत तिच्या समोर सामाजिक परिस्थिती आहे. ( गो. ब. देवल यांच्या 'शारदा' नाटकाचा तिने अभ्यास केलेला दिसतो). लाचलुचपत विरोधी तिचा लढा येथे प्रकट होतो समाजातील अनिष्ट रुढींना तिने फाटा दिला आहे. (ती कर्वे यांची आदर्श गृहिणी शोभते ). पैसे खाणे म्हणजे साक्षात मृत्यूला आव्हान असे ती आर्जवून प्रतिपादन करते.

एक दिवस उजाडतो मुलीला नवरा मिळतो, थाटामाटाने वैदिक पद्धतीने लग्न उरकते (लव्ह मॅरेज तेव्हा होत नसावेत). जावई व व्याहयाचे वर्णन करताना ती म्हणते—

**लाडकी व लेक, तू सेवं दुर्गादेई।**
**'सुऱ्या' सार्का याही, 'सुक' सार्का जवाई।। (१६)**

हे लाडक्या मुली तू दुर्गा देवी सारखी (संकट निवारिणी, भय हारिणी) तेजस्वी, महान व वीरशक्ती आहे. (माझे ) व्याही (मुलाचे वडील) सूर्यासारखे महान तेजस्वी दैदिप्यमान सर्वश्रेष्ठ आहेत व (माझे) जावई, शुकासारखे (शुक्र ताऱ्यासारखे), वैरागी तेजस्वी आहेत. 'शुक' या शब्दांवर श्लेष साधलेला आहे. सूर्याच्या आणि शुक्राच्या उपमा भाषा समृद्धीची ग्वाही देतात. तिचा दृष्टीकोन विशाल आहे. एकता (Unity) तीच्या रोमारोमात भिनली आहे. आकाश, पृथ्वी एक करताना वास्तववादी विशाल दृष्टीकोनाची साक्ष पटते.

एवढं सारं चांगल असल्यावरही तिला एके दिवशी आपली तारुण्याने मुसमुसलेली, नवथर तरूण विवाहित मुलगी चुकून एकांतात अनोळखी पुरुषाशी बोलतांना आढळते. त्यावर ती मुलाला टाकून बोलते. भांडते, अबोल राहाते. तासाभराने अबोल रागावलेल्या मुलीची समजूत घालतांना ती म्हणते—

**मायना बोलाना, तुले राग अुना लेकी।।**
**पराई पुरूषसंगे, बोलो नही अेका अेकी।। (१७)**

आईच्या बोलण्याचा तुला राग आला. परक्या (तरूण) पुरुषाबरोबर (एकांतात) सहसा (होवून) बोलू नये.

स्वतःच्या हाताने आपल्या कॉलेज कन्येचे प्रेमविवाह जुळविणाऱ्या मातांच्या विरोधी हिचा लढा आहे. अहिराणी स्त्री येथे निती मर्यादा व अब्रुचे चिज घराणे, खानदान याचा आदर्श आपल्यापुढे ठेवते. सुशिक्षित स्त्री इतकीच पुढे आहे.

भांडण झाल्यावर मुलगी रात्रभर बोलत नाही. तिला मायेचा गहिवर येतो. मातृप्रेम ऊतू जाते. तीला हायसे वाटते कसे कसे होते--

**शेजी झगडनी, बांधू सऊ महिनान कड ।**
**लेक मन्ही झगडनी, माले रात गई जड ।। (१८)**

शेजारच्या स्त्रीने (जर) झगडा केला (भांडण केले) तर मी (तिच्याशी) सहा महिने अबोल राहते. (शंभर महिने अबोल राहील). परंतु माझ्या मुलीने भांडण केल्यावर (ती अबोल झाल्यावर) मी एक रात्र मोठ्या मुष्कीलीने काढली. नितांत मातृप्रेमाचा गहिवर येथे व्यक्त झाला आहे. नकळत आपलेपणा व परकेपणा विभक्त केला गेला आहे. (मायेच्या पोटी कटू सत्य सांगितले गेले).

व्यवहारात तावून सुलाखून उपदेशाचे डोस पाजून (तंदुरुस्त) निर्भय केलेली, मायेत वाढवलेली तिची ती लाडकी लेक शेवटी तिला ध्यावयास आल्यावर संसारी नांदायला जाते. तीला पाठवितांना आई म्हणते--

**लाडकी तूंव लेक, नांदीसनी काढ नांव ।**
**शिवना शेजार, सगा सोयरान गांव ।। (१९)**

हे लाडक्या लेकी तू चांगली नांद (संसार कर) आई वडिलांचे नाव काढ. (तुला ज्या गावाला दिले आहे), त्या शेजारी नातेवाईकांचे गाव व त्याच अंतरावर आपले गाव आहे.

मुलीचे वागण्याने नातेवाईकात बेअब्रु होईल. 'किर्ती जाय दिगंतरा' व घराण्याला कलंक लागेल असे (चोरी, व्यभिचारीपणा) कोणतेही वर्तन तू करू नकोस असे आई तिला हटकून बजावते. सीता सावित्रीच्या आदर्शाने जगण्याचा गोड उपदेश ती मुलीला करते वाहतुकीची सोय उपलब्ध नसल्याने व लग्न, मृत्यू इत्यादी समयी मुलगी जवळ असावी म्हणून मुली जवळपासच्या खेड्यांत देण्याच्या पद्धतीचा यात प्रत्यंतर येतो. [वेळवर (?) सुटणाऱ्या एस. टी. च्या गाड्या त्यावेळेस नव्हत्या].

लेकीच्या जन्माच्या नवसापासून तिचे लग्न होवून सासरी जाईपावेतो आई बोलत होती. आईच्या उपदेशाला पोंच म्हणून लेक म्हणते--

**लेक सांगी गयी, माय ठेव तू मनमां ।**
**सिता सारका मी, दिन काढसू वनमां ।। (२०)**

मुलगी सांगोन गेली (की) आई तू (हे) पक्के लक्षात असू दे की, कठीण परिस्थितीवर मात करून देखील मी संकटात (हालअपेष्टात) दिवस काढीन. या ठिकाणी अहिराणी स्त्रीची जगण्याची जिद्द दिसून येते. तिचा दांडगा आत्मविश्वास पुराणी श्रद्धा, दिसून येते. आधुनिक युगाच्या सुशिक्षित तरुणीपुढे पावित्र्य, शीलाचा आदर्श ठेवून आमची सीता सासरी गेली होती ती दिवाळीला आली आहे.

वरील अहिराणी ओव्यांमध्ये अहिराणी स्त्री च्या मनाचा नाजुक हळवा भाव आलेला आहे. मर्यादाशिलता, नितीमर्यादा यांचे ओझरते दर्शन वरील ओव्यांत घडते. अशा प्रकारे अनेकविध ओव्यांनी अहिराणी भाषा ओतप्रोत भरलेली आहे. दुथडी भरून वाहत आहे. अजूनही कित्येक भूमिका मराठीच्या चोखंदळ वाचकांपुढे यावयाच्या राहिल्या आहेत.

मराठी साहित्याइतकेच ते रसिक वाचकांचे रंजन करीत आहे.

● ● ●

# जवाई (जावई)

प्रत्येक भाषेची श्रीमंती ही तिच्यातील साहित्यावर अवलंबून असते. समाजातील गरीब-श्रीमंत वादाला भाषा देखील कां अपवाद असावी ? आणि आजकालच्या साहित्या-कडे लक्ष दिल्यावर सहज लक्षात येते की, मराठी भाषा समृद्ध आहे, गर्भश्रीमंत आहे. पण तिच्या पोटभाषा देखील तेवढयाच श्रीमंत आहेत. समतेच्या दृष्टिकोनातून विचार केल्यास 'अहिराणी' ही मराठीच्याच तोडीची भाषा आहे (धुळे, जळगांव, नासिक जिल्हयां-पुरती तरी). साहित्याचा (कथा, काव्य) परामर्श घेता 'अहिराणी' साहित्य ओथंबून दुथडी वाहत आहे. विशेषत: अहिराणी काव्यातील संस्कृतीचे दर्शन घडविणाऱ्या ओव्या.

समाजातील सर्व थरात आजही आदीपासून आजपर्यंतच्या अनेक विषयांवरील, प्रसंगा वरील अनेक ओव्या (सहजस्फूर्त) झाकलं माणिक सारख्या इतस्तत: विखुरल्या आहेत. अहिराणी काव्य इतकं समृद्ध आहे की, त्याची छाप खान्देशातील नवकविंवरही पडल्या-शिवाय राहत नाही. एक सुप्रसिद्ध कवी आपल्या काव्यात लिहितो—

**"जळगांव जिल्ह्यात या; बोली चाले अहिराणी।**
**गोड गोडवा तियेचा, जिंके अमृताची वाणी" ।।**

अशा तऱ्हेने जळगांव जिल्हयात ही अहिराणी भाषा तिच्या गोड गोड गोडव्याने अमृताची पैज जिंकते. ही तीची स्तुती तिच्या अभ्यासाने सार्थ ठरते. दुसरा कवी शब्दांची 'गुंफण' करतो—

**"मन्हा खान्देश मझारं, गोड आयरानी बोली।**
**नाजुक ती हेलाव तां, लाज शिरीषाच्या फुली" ।।**

दोन्ही खान्देश व परिसर मधील कविंवर अहिराणीचा हा प्रभाव तिच्यातला गोडवा, आवाजातील नाजूक हेल, शिरीषाच्या फुलालाही लाजवतो. यात अतिशयोक्ति ती कसली ! एक कवी आपल्या गीतात सांगतो—

**"ओवी मायनी मवाय, झायी घटयाना पालुमां ।**
**गाये खेडामां सोनाई, हासे जोंध्या टोपलीमां" ।।**

अशी कौतुकाने वाखाणलेली ही ओवी आपल्या नाजूक हेलसह प्रत्येक खेडयात घरा-घरातून जात्याच्या सभोवताली विखुरलेली आहे, लुप्त झाली आहे, साठली आहे. आणि खेडयातील माता, भगिनी घरघर जातं फिरवताना सुरेल गोड आवाजात पहाटेच्या कातर-वेळी गाताना, टोपलीतील जोंध्या (जोंधळा) (जो लौकरच दगडाच्या दोन पसरट भाग

फिरत असतांना आत चिरडून, भरडून चक्काचूर होणार आहे) देखील ओव्यांचा नाजूक, साजूक, धुंद, गंध, मायाळू नाद ऐकतांना मंत्रमुग्ध होवून, आपल्या होणाऱ्या मुक्तिचं भान विसरून, अहिराणी ओव्या 'अमर' राखण्यासाठी एखाद्या स्थितप्रज्ञ 'हुतात्म्या' प्रमाणे हसत खेळत वळी जातो......जेथे निर्जीवांची ही कथा तर आपल्यासारख्या सचेतन, सहृदय, चोखंदळ मराठी वाचकांच्या बाबतीत सांगणे नलगे.

अशाच अहिराणीवरील प्रेमाने भारावलेली एकुलती एक मुलगी, म्हातारपणी आलेली (कला) असलेली अडाणी स्त्री (केशरबाई) आपल्या भावमधूर ओवीतून गाते--

**आते सरन दयन, येठे-हायना काचाकुचा।**
**जवाई मी करू, करू जवाई सक्का भाचा ।। (१)**

आता दळण संपले आहे. खाली बोंडे, तुकडे झालेले जोंधळे (चूर) ऊरसुर (गाळ) उरले आहेत. मी जावई करेन व तोही सख्खा भाचा (कृष्ण)च जावई करेन.

सार आयुष्य तिच घरी जात्यावर दळण दळण्यात, दारिद्र्याशी शह देण्यात जात आहे. शेवटचे उतारवयाचे दिवस गरिबीत व्यतित करताना तिला एक भोळी आशा आहे, आकांशा आहे. जगण्याची जिद्द आहे. शेवटी आपल्या भाच्याला जावई करावा या ठिकाणी तिने शेवटची इच्छा व्यक्त केली आहे. आपली मुलगी आपल्याच जवळच्या नात्या-गोत्यात दिली जावी म्हणजे जास्त सुखी राहील, हुंडा कमी लागेल व तिचे सुख पाहून आपण सुखी राहू. ती म्हातारपणी आपल्याला वागवेल. सुखाविषयीची दूरदृष्टि इथे व्यक्त होते. 'आर्थिक' जाण जाणवते. (अलीकडच्या हुंड्याची जीवघेणी, घाणेरडी पद्धत त्यावेळी नसेल कदाचित, परंतु बीजे निश्चित रोवली गेली असावीत) आपसात संबंध करण्याची रूढीची जोपासना, दूरदृष्टि, स्वकीयांचा फायदा, लोभ ह्या दृष्टिकोनास ती विसरत नाही. आपलेपणाची भावना सतत जागृत आहे. तारुण्याची मजा गेली. आता सार संपल आहे. आता मुलगा होण्याची शक्यता नाही हे 'येठे-हायना काचाकुचा' या रुपकाद्वारे स्पष्ट केले आहे. शब्दांवर जोर देवून अर्थ निष्पती करण्यात ती पटाईत आहे.

भविष्याची सुखस्वप्न पहात असतांना तिच्या डोक्यात काही विचार घोंगावतात, घर करतात, अंतर मनाचा ठाव घेतात त्याच वेळेला तिच्या तोंडून शब्द बाहेर पडतात--

**दयन मी करू, दवू जोंधया आधलीभर।**
**तान्ही नादानं माडीसे, घटया वढी वं लौखर ।। (२)**

मी दळण निसवते, आधली (अधोली, अर्धापायली, धान्य मौजण्याचे त्यावेळचे प्रचलित माप) भर दळण मी दळते. माझी लहान (अज्ञान) मुलगी मांडीवर झोपली आहे. ही लौकरच (मोठी झाल्यावर) जाते ओढेल. (आईला दळायला मदत करीन) ती लौकरच मोठी होवून तिने आपल्याला मदत करावी अशी आशा ती उराशी बाळगून आहे.

भविष्यातील दूरदृष्टि, आशा, जाणवतात. आधलीभर दळणे (रोज किती धान्य व किती पिठाच्या भाकरी लागतात हे तिच्या वेळचे शिरगणतीचे साधन) हे तिच्या लहान कुटुंबाची ग्वाही देतात. 'घर लहान सुख महान' तिला ठाव आहे. (युवा नेते संजय गांधी यांच्या चार सुत्रीची तिला जाण आहे). असं हे थोडसं दळण संपायला येत आहे. तिच्या भावना साकारतात, ती म्हणते––

**सरनं दयनं, जोंध्या चौघडा वाजस।**
**दिन्ही कोंबडानी बांग, आते महादेव जागस ।। (३)**

आता दळण संपलेले आहे. (जोंधळे जात्यात कमी असल्याने घरघर ऐवजी खळखळ आवाज करीत आहेत). चौघडे वाजत आहेत. कोंबड्याने बांग (आरव) दिली आहे (नियमित, ठरल्यावेळी, निहित कर्तव्य न चुकता करणारा जगातील आदर्श व एकमेव प्राणी). आता तिचे पती (भानु) (झोपेतून) जागे होतील.

दळणे दळतांना टोपलीतील जोंधळे संपलेले आहेत व शेवटच्या जोंधळ्यांचा जो खळखळ आवाज होतो त्याला देवळातील चौघडे (एक वाद्य) ची उपमा सार्थ वाटते. पूर्वीच्या काळी देवपूजेचे वेळी (सकाळी) देवळात चौघडे वाजवित असत. त्याच्याने देव झोपेतून जागे होत असत अशी त्यावेळची भावना. समाजाचे त्या त्या काळाच्या रूढी, रितीरिवाजाचे यथार्थ दर्शन ती आपल्या काव्यात घडविते. समाजातील रूढी तिच्या मनावर खोल रुजल्या आहेत. 'कोंबड्याची बांग' ने जर्मनीच्या जांघन्स मॉडेलच्या ४ ला लावलेल्या बेलची जागा घेतलेली आहे. बांगपूर्वी (ठरल्या वेळी) तिने दळण संपविलेले आहे. नवऱ्याला महादेवाची (भोळ्या परंतु क्रोधीत स्वभावी माणसाची) उपमा व जोंधळ्याच्या खळखळ वर चौघड्यांच्या आवाजाचा आरोप पट्टीच्या कविताही ही मागे सारल्याशिवाय राहत नाही. "आगांत जागे––नजिक हागे" ची प्रचिती ती आपल्या काव्यात चित्रित करते नवऱ्याला महादेवाची उपमा देतांना ती शंकरभक्त वाटते. सहज शब्दांत अर्थ निर्मितीची तिची हातोटी आगळीच आहे. सोबतच्या दळायला बसलेल्या स्त्रीस (हिरकनच्या आईस) ती म्हणते––

**सरन दयन, सरन म्हनू नई।**
**पोटे वं कच्च्या बच्च्या, मूके मूके दवू नई ।। (४)**

दळण संपल आहे पण संपलेले म्हणू नको. पोटी मुली आल्या आहेत. मुके मुके दळू नकोस (दळतांना गाणे म्हणत जा).

मुके मुके दळण्याची सवय लागली तर ओव्या म्हणण्याची परंपरा नष्ट होईल. अहिराणी-तील अप्रतिम साहित्य काळाच्या ओघात नष्ट होईल व आपल्या मुलींना गीत गाता येणार नाहीत याची भीती तिला वाटते. रुढी परंपरेची जपणूक ती करते. काम हे कधी न संपणार आहे हे तत्वज्ञान उत्साह कमी न होवू देण्याचा दुरदृष्टीपणा जागृत ठेवण्यासाठी

ती बजावते. (अजून प्रिंटिंग प्रेसचा शोध लागावयाचा असेल किंवा महागाईत कागद टंचाईमुळे योग्य संपादक वा प्रकाशक न मिळाल्याने आपले साहित्य पिढी परंपरागत अक्षर टिकावे अशी तिची तळमळीची इच्छा असावी) पुढे आकाशवाणी जळगाववर आपल्या मुलीस गीत गावयास बोलविण्याची गोडस्वप्ने ती उराशी बाळगत असावी कदाचित्.

पुढे पुढे रोजच्या त्याच त्याच कामाचा थोडासा कंटाळा तिला येतो. हवा बदल करण्यासाठी व नातेवाईकांची भेटीची ओढ लागली असल्याने ती आपल्या नणंदेच्या गावाला (खाचण्याला) जाते. तेथे शेजारची स्त्री (धुरपतामाय) तिला विचारते--काग भावजयं बऱ्याच दिवसातून येणं केलं. त्यावर ती म्हणते--

**उबगेल जीवं, वरीसमां येसबाई।**
**मन्हा नंदुई ईठोबा, ननीन व रुखमाई ।। (५)**

(संसाराला) कंटाळलेली मी एका वर्षातून (तुमच्या गावाला) फेरी करते. माझे नंदोई भाऊ विठोबा (काळ्या रंगाचे भोळे भावडे) आहेत व नणंद (वन्स) ही रुखमाई (सुंदरतेची, त्यागाची मूर्ति) आहे.

या ठिकाणी देवदेवतांची रुपके तिच्या काव्यात डोकावतात. 'फार दिवसांनी जावे म्हणजे गोडी असते'. 'अति परीचयात अवज्ञा, सतत गमना दनादरो भवति' ह्या उक्तितील तत्वज्ञान तिच्या रोमारोमात भिनल्याची साक्ष तिच्या काव्यात पटते. महाराष्ट्रातील कुलदैवतांच्या उपमा सार्थ वाटतात.

ती घरात शिरल्यावर एका बाजुला पाळण्यात झोपलेल्या लहान मुलाला पाहून त्यांचे वर्णन करताना म्हणते--

**सोनाना पायना, रुपाना हालकडा।**
**भाचा जपना पायनामां, सोभा देतस कडातोडा ।। (६)**

सोन्याचा पाळणा (आहे). (त्याला) रूपाच्या (चांदीच्या) कड्या आहेत. भाचा (कृष्ण) पाळण्यात झोपलेला आहे. त्याच्या अंगावर कडे, तोडे (सोने-चांदीचे दागिने) शोभतात.

एके काळी भारत ही स्वर्णभूमि होती. तेथे सोन्याचा धूर निघत होता ह्याची साक्ष तिचे काव्य देते. मायेच्या पोटी अतिशयोक्तिचा भाग सोडल्यास ह्या ओव्या त्यावेळच्या अर्थव्यवस्थेची साक्ष देतात. रहाणीमानावरून व्यक्तिची (लहान मोठा) मोजमाप करण्याच्या वृत्तीपासून ती दूर नाही. ऐश्वर्यात तो झोपला आहे. त्याने कडे तोडे (जे आज वस्तु संग्रहालयातच दिसतात) घातले आहेत (आयकर अधिकाऱ्यांना तिने आपले उत्पन्न अगोदरच जाहीर केलेले दिसते) वा 'वचने किम् दरिद्रता' या उक्तिचा संस्कृत महाकविची ती अनुयायी असल्याचा भास होतो.

भाच्याचे रसभरीत वर्णन, स्तुती [आम्ही फक्त स्तुती (खोटी)च करतो स्वार्थ साधण्यासाठी] ऐकून मुलाच्या आईला (सोनुताईस) भविष्याची चाहूल लागून ती उद्गारते--

**तान्हा जपना पायनामां, लोरी गाये चौघडानी ।**
**मामी केसर झोका देस, गोट करस वसे लानी ।। (७)**

(माझा) लहान बाळ पाळण्यात झोपलेला आहे. मामी (त्याला) चौघडयाच्या आवाजावर अंगाई गीत म्हणत आहे. केशर (मामीचे नाव) झोका (हिंदोळा) देत आहे. बाळाला खेळवीत आहे (जणू वशिला लावते आहे), पटविते आहे (पुढे त्या लहान मुलाला तिला जावई करून घ्यावयाचा आहे ना?)

आपलं इप्सित साधून घेण्यासाठी गोड बोलणे, स्तुती करणे, वरवर करणे (चमचेगिरी) ह्याची तिला जाण आहे, माहिती आहे. 'चौघडयाची लोरी' या शब्दानं वातावरण निर्मिती होते. आपल हृदगत् व्यक्त करण्याची किमया तिला अवगत आहे.

अशा तऱ्हेने बराच वेळ भाच्याजवळ उभी राहून ती घरातील दुसऱ्या टप्प्यात येते. त्यावेळी ताक मागावयास (त्यावेळी ताकाची विक्री होत नसे) आलेली एक स्त्री (सौंदरमाय) भावजयच्या थट्टेने म्हणते "कावं दांडगी, मन्हा पोऱ्या कसा से?" केसरकाव्यमय भाषेत उत्तरते--

**आव्यनीन फूलं, सोनाधीन व सवाई ।**
**ननीन ना लेकं भासा म्हनू कां जवाई ।। (८)**

आवयीनं (एक पिवळ्या रंगाच्या फुलांची वनस्पती) चे फूल सोन्याहून सवाई (सव्वा पट श्रेष्ठ आहे) नणंदेच्या मुलाला भाच्याचे नाते लावू का जावयाचे?

अर्थ अभिव्यक्तिचा तीने इथे कळस गाठला आहे. थोडक्या शब्दात विपूल अर्थ निर्मितीचा परिपोष या ठिकाणी आहे. अचेतनावर सचेतनाचा आरोप करण्यात तिचा हातखंडा आहे भोवतालचा निसर्ग तिच्या काव्यात डोकावतो. साम्य, रुपक, भरगच्च ठेचून भरले आहेत. संकेतार्थ सांगण्यात ती सराईत आहे. पटाईत आहे.

सोने आकर्षक वाटत असले तरी महाग असते, दुर्लभ असते. प्रात्यक्षिक अर्थे ते निरुपयोगी असते. आव्हीनीची फूल ही देखील पिवळी (सोन्याच्या रंगाची) असतात. पण ती स्वस्त, सहज साध्य, लभ्य (खेडयाच्या परिसरात ही फूले मुबलक असतात). आव्हीन ही वनस्पती औषधी बहुगुणी असते. तिची फूलं, साल, कांडया, मुळ्या सर्व कामाची असतात. पोटदुखी, सांधेदुखी, चामडे रंगविणे, पिंगाणी बनवणे, असा विविध त्याचा उपयोग होतो. (श्रीमंताचा मुलगा व गरीबाचा मुलगा यांची तुलना करण्यासाठी तिने चोखंदळपणे वापरलेली ही रुपके नसतील नां?) 'जवळचे ते हवे' चा मानसशास्त्रीय मूळ प्रवृत्तीची तिला जाण आहे. (ती मानसशास्त्राची पदवीधर असावी) कदाचित! अहिराणी साहित्यांत व्यवहार ज्ञानाची

पालेमुळे खच्चून भरलेली आहेत. ती नाणावलेल्या पुढाऱ्याची सुविद्य पत्नी असल्याचा भास होतो. (होणाऱ्या) जावयाचे एवढे सौंदर्याचे रसभरीत वर्णन व कौडकौतूक ऐकून शेजारची स्त्री (सखुमाय म्हणते) काग भावजय मग आम्ही वाईट आहोत काय ? 'खाण तशी माती' तिला म्हणायचे असते ती उद्गारते—

**केईना मयामा, एक बाजरानी गरी।**
**नंदूई पित्तयना देव, बायजां इन्दुरनी परी ।। (९)**

केळीच्या मळ्यात एक बाजरीची गरी (व्यवस्थित व विशिष्ट पद्धतीने रचना केलेला ढीग) आहे. (तिच्यामुळे मळ्याच्या मूळ सौंदर्यात भर पडते.) नंदोई भाऊ (आनंदा) पितळेचे देव (सुरेख, रेखीव, सुंदर) आहेत. बायजा (सोनुताई) (नणंदेला वापरलेली आदरार्थी पदवी, टोपण नांव) इंदूरची परी (अतिशय सुंदर, सालस, शिलवान, कष्टाळू स्त्री) आहे. हल्लीचे 'इंदौर' शहर पूर्वीच्या काळी भारताचे नंदनवन 'काश्मीर' म्हणून प्रसिद्ध असावे. म्हणून त्यांचे रुपक सुंदर स्त्रीला वापरण्याची त्या काळी प्रथा असावी. भोवतालचा निसर्ग तिच्या उपमा होतात. समाजातील प्रचलित पद्धतीचे दर्शन ती या ठिकाणी घडविते.

आपल्या सुंदर नणंदेचे गोड स्वभावाचे वर्णन करतांना ती म्हणते—

**माय ननीन न घर, सासु सासरानी गली।**
**देर देरान्या माश्व्या, ननींनं कोपरगायी भेली ।। (१०)**

हे बाई ! माझे नणंदेचे घर ही एक सासू सासरची गल्ली आहे. दिर व जावा या सर्व 'माशा' आहेत व (माझी) नणंद ही कोपरगांवी (गुळाची भेली) आहे. (गुळ असेल तेथे माशी बसेल).

आपली 'नणंद' ही मीठा चावल आहे असे थोडक्यात तिला म्हणावयाचे नसेल नां ? भोवतालच्या परिसरातील उपमा तिच्या काव्यात डोकावतात. कोपरगाव हे उत्तम गुळासाठी पूर्वीपासून प्रसिद्ध आहे. गुळाची भेली धडधाकड धष्टपुष्ट शरीराचे प्रतिक असावे. गोड स्वभावामुळे जावा, सुना, दिर, सासू-सासरे (कौशालमाय व तानुबाप्या) एकत्र रहातात, नणंदेच्या घराला (एकत्र कुटुंब पद्धतीचा आदर्श असल्याने) गल्लीचे रूप आलेले आहे. सर्वांचा (तीन पिढयांचा) एक निभाव तीच्या घरी होतो. आधुनिक सु(?)शिक्षित स्त्रियांनी आमच्या अहिराणी स्त्री कडून संस्कृती आदर्शाचे धडे गिरविणे, शिकायला हरकत असू नये ? आपल्याच्याबद्दल आदर ठिकठिकाणी तिच्या काव्यात डोकावतो.

अशा तऱ्हेने नणंदेच्या घरच्या सर्वच गोष्टी मनापासून आवडल्यावर शेजारची स्त्री (बायामाय) म्हणते. भावजय, तुमची मुलगी कशी आहे ? त्यावर ती उत्तरते—

**लेक मनी कलू, लेक नाजुक शेलाटी।**
**कवईचवई, शाय शिकस मराठी ।। (११)**

अगबाई तुम्हाला काय सांगू, माझी मुलगी (बबी) नाजूक व उंच बांध्याची (बारीक) आहे. ती कोवळ्या चवळीच्या शेंगेप्रमाणे (नाजूक, लूसलूसीत) आहे व अजून मराठी शाळेत शिकते (लहान आहे, लग्नाच्या वयाची नाही).

वय लपविण्यात पटाईत असलेल्या आधुनिक स्त्रीपेक्षा ती वस्ताद आहे. ती मुलीचे वय आकड्यात सांगत नाही. तिच्या आपल्या शेतातील पिकाच्या निसर्गातील उपमा सार्थ, समर्पक व हव्याहव्याशा वाटतात व तोंडाला पाणी सोडतात. मुलगी लहान आहे हे सांगण्याची अप्रत्यक्ष कथन पद्धती अनुकरणीय वाटते. त्यात सूचकता जाणवते (व्रेन अँड मार्टीनच्या आंग्ल व्याकरणातील डायरेक्ट व इन डायरेक्ट चा तिचा गाढ अभ्यास झालेला भासतो).

पुढील वर्षी नणंदेच्या घरी आल्यावर तिला शेजारची स्त्री (शेंपा ताई) विचारते, 'तुमची मुलगी आता बरी दिसत असेल ?' ती समर्पक उत्तरते—

**लेक लेक करू, लेक पह्यानीवं काडी।**
**खावा पेवाभा उपडीगई, आते नेसस ना साडी ।। (१२)**

मुलीच्या बाबतीत काय विचारता, मुलगी कपाशीची काडी (सडपातळ, उंच) आहे. (तिच्या असलेल्या कैऱ्यांच्या भाराने ती लपलप करीत असते). ती अद्याप वयाने लहानच आहे. (चांगला पौष्टिक व चौरस आहार) खाण्यापिण्यामुळे (एकुलती एक असल्याने) तिची शरीरवाढ झाली आहे. तिचे यावर्षी लग्न (पूर्वी लहानपणीच लग्न करण्याची प्रथा होती) केल पाहिजे हे सांगतांना ती शेजारच्या (रामु हू) स्त्रीस विश्लेषण करते--

**लेक मन्ही कलु, लेक उनी ना वयमां ।**
**पह्यला पदर, जेवन जेवनी मयामां ।। (१३)**

बाई माझी मुलगी कला (कलावती) आता वयात आली आहे. तिला पहिले रजोदर्शन झाले असून त्या प्रित्यर्थ झालेले सोहळ्याचे जेवण पण मळ्यात जेवली आहे.

आधुनिक सुशिक्षीतांची प्रथम रजोदर्शन सोहळा थाटामाटात साजरा करण्याची पद्धती; रूढी तिला ज्ञात आहे. मुलगी मोठी झाली आहे याची संपूर्ण खात्री झाल्यावर मुलीची आई विवंचनेत पडते. तिच्याजवळ पैसा नसतो, त्यावर्षी पिक चांगले आलेले नसते.

लग्नाचा विषय चर्चेला आल्यावर नणंद तिला म्हणते—

**व लगीन जमाडा, काय देतीस धरमां ।**
**पोरं सोडी काई नको, सांगी ऱ्हायनू जोरमां ।।(१४)**

तुम्ही फक्त लग्न जमवा. घरात काय देतात. (घरात देण्याघेण्याची हुंड्याची चिंता करू नका) मुलगी (होणारी सून) सोडून दुसरे काहीच (घड्याळ, सायकल, रेडिओ, सोन्याची अंगठी, चेन, सोफा-कम-बेड, मोटार-कार, इ.) देऊ नका. हे मी जोराने सत्य (खरे) सांगत आहे.

या ठिकाणी ती कर्वेच्या (अे. जी.) ची भूमिका पार पाडते. हुंड्याला तिचा जोरदार विरोध आहे.

अशा तऱ्हेने साखरपुडा होते. लग्नाची तिथी ठरते, 'एकुलती एक पोर मामीची, होणार बायको या पठ्ठ्याची' असे रांगडे गोतांचे सूर उमटू लागतात. थाटामाटात लग्न लागते. 'मांडव' करतांना नवरदेवाचा मोठा भाऊ (बावू अप्पा) (गाय) आंदन मागावयास आग्रह धरतो. किरकोळ भांडण होते. त्यावेळी समजावणीचे स्वरात मामी म्हणते--

**जवाईना भाऊ, नका मांगुबा आंदन।**
**सासरा गरीब तुना, नका करूना भांडनं ।। (१५)**

अहो जावयाचे भाऊ तुम्ही आंदन (देणगी) (गाय, आंबा वगैरे) मागू नका. अहो तुमचा सासरा फारच गरीब आहे. (त्याला अजून २० कलमी मध्ये झोपडी बरोबर गाय मिळालेली नाही.) (ज्यान्हा दारे नही खुटा तो, देवथीन मोटा) ते तुम्हास आंदन देऊ शकत नाहीत (तेव्हा कृपा करून) भांडण करू नका.

प्राप्त परिस्थितीशी मिळते जुळते घेऊन वितंडवाद न वाढविण्याची समंजस भूमिका ती या ठिकाणी करते. तिच्या बोलण्यात मार्दवता आहे. दोनदा नकार वापरून विशिष्ट अर्थ निर्मितीची योजना ती करते.

घरी आल्यावर तिला शेजारची स्त्री (हिरकननी माय) विचारते--काग (ताई) माझा जावई कसा आहे. (काळा की गोरा, मुलीसारखाच आहे काय?) यावर ती म्हणते--

**सोनानं सुपड, सीता पाखडे चवई।**
**माय जवाई विठोबा, लेक तुनी वं धवई ।। (१६)**

सोन्याच्या सुपात सीता (आदर्श पवित्र स्त्री) चवळी (एक कडधान्य) पाखडते. हे बाई तुझा जावई विठोबा (रंगाने काळा कृष्णच जसा) आहे. मुलगी तुझी पांढऱ्या रंगाची चंद्रकलाच जणू आहे.

काव्यात प्रतिके वापरण्याची तिला सवय झाली आहे. 'कृष्ण सावळा राधा गोरी' असे असून ही पुढे घटस्फोट होणार नाही हे सूचित करताना तिच्या घरी सोन्याचे सूप (गडगंज संपती, श्रीमंती, वैभव) आहे हे ती सूचित करून जाते.

एवढ्यावरही भाईदासाच्या आईची (सायतोराची) मनशांती होत नाही. ती कुतूहलाने विचारत राहते या मुलीला सासू सासरे आहेत काय ? त्यावर ती स्त्री उच्चार --

**जवाई ना दारे, नंदी बांधेल ठेलारी।**
**सुखे नांदतस, महादेव पार्वती शेजारी ।। (१७)**

जावयाच्या दारी ठेलारी बैलांची जोडी बांधली आहे. (शेतकऱ्याचे ते ऐश्वर्य) ती व ते सुखाने नांदतात. (सासू-सासरे) (सोनताई, आनाताथ्या) हे महादेव-पार्वतीप्रमाणे छाया करून आहेत (सोबत आहेत). सर्व सुखे मुलीच्या पायाशी लोळण घेतात. कृपाछत्र हयात आहेत.

असा हा सुखी जावई सासरी (मुकटीला) आखाजीला 'पितर' होण्यासाठी जातो. आपल्या आवडत्या (१) सासू-सासऱ्याकडे आल्यावर त्याची मामी शेजारच्या स्त्रीला विचारते--कां ग जावई कसा वाटला ? (छान आहे नां ?) तेव्हा शेजारीण म्हणते--

**जवाई से सोनं, लेक नागेन न पान।**
**दोन्ही सले देखी, मन्हं झाय समाधान ।। (१८)**

जावई सोनं (सर्वश्रेष्ठ, निष्कलंक) आहे. मुलगी खावुचे पान (शुद्ध व मांगल्याचे प्रतिक) आहे. [नागिनी सारखी सुंदर पण जहरी (स्वभावाची) आहे.] दोघांना पाहून मला समाधान झालेले आहे. स्वभावाचे वैशिष्टच सांगतांना तिचा स्पष्टवक्तेपणा जाणवतो. उपमा उत्प्रेक्षाची रेलचेल तिच्या काव्यात आढळते.

जावई पाहुणा आला आहे. त्यास काय स्वयंपाक (पाहुणचार) केला अशी चौकशी करणाऱ्या गावातील एका स्त्रीस ती म्हणते --

**सुर्जीना तांदुय, रांधू कीर्तीना जवाईले।**
**एवढा आदरभाव, लेकीकरता देवाले ।। (१९)**

सुर्जीचा तांदूळ (तांदळाची प्रसिद्ध, सुवासिक जात) किर्तीवान जावयासाठी टाकला आहे. (मसाल्याची खमंग खिचडी केली असावी) मुलीकरिता एवढा आदर भाव देवाला (जावयाला) करावा लागतो.

स्थळ वैशिष्टचाचा तिला विसर पडत नाही. सुर्जी एकेकाळी प्रसिद्ध तांदळाचे आगार. जावयाला देवाइतके पवित्र समजण्याची प्रथा (तांदळाचे त्याकाळी मुशाच्या पोत्यातून स्मगलिंग होत नसावे) वरवर करण्याची, खूष करण्याची, हातोटी तिला अवगत आहे (चमचेगिरी नव्हे) खाऊ, पिवू घालून खूष ठेवण्याच्या कलेत कलेची आई कुशल आहे. असे दिसते.

जेवणापूर्वी जावयाला आंघोळीला दिले आहे. त्याचे वर्णन करतांना ती म्हणते ---

**जवाई करस अंगोई, पानी सोनाना गंगाई।**
**न्हाई बवा ऊटनं लाव, झोका देरे तू बंगई ।। (२०)**

जावई आंघोळ करीत आहे. सोन्याच्या गंगाळात पाणी टाकले आहे. न्हावीबुवा (नाऱ्याम्) तुम्ही अंगाला (जावयाच्या) उटणे लावा व बंगई (हिंदोळा) स झोका द्या.

जावयाचा आदरभाव करतांना त्याला सोन्याच्या भांड्यात अंघोळीला पाणी ती देते न्हाव्याला उटणे लावावयाला सांगते (अजूनही 'टाटा' चा लक्स जन्माला यावयाचा आहे). त्यावेळच्या प्रचलित समाजातील 'बंगइ' वर बसून झोका घेत आंघोळ करण्याच्या पद्धतील. तिने सहजगत्या काव्यात गोवले आहे. समाज रूढीचे हुबेहुब चित्रण करण्यात ती पटाईत आहे.

जावयाची आंघोळ झाल्यावर गंध वगैरे लावणे होते. जेवणाला उशीर होत असतो. (सासरा आणि जावई एक बरोबर जेवण करतात). का उशीर होत आहे ? या त्याने विचारलेल्या प्रश्नाला ती दाराच्या पाटी आडून उत्तर देते--(भाचा जावई असूनसुद्धा देखील केवढी मर्यादा आहे, शरम आहे, शिलवर्धन आहेत).

**पंढरपुरमां, औंदा टाकेल हरबरा।**
**'राम' जास राखाले, करस येरझारा ।। (२१)**

पंढरपुरात [ शेताला ती पंढरपूर (पवित्र) समजते. ] यावर्षी (त्यात) हरबरा पेरला आहे. (तोआता पक्व होत आला आहे. त्याला कोणी खावू नये म्हणून) राम (तीचे यजमान) (आदर्श पुरुष) राखण करण्यासाठी जातात. (ये-जा करतात). भोवतालच्या परिसरातील उपमा तिच्या काव्यात डोकावतात. [ पंढरपुरात मिळणारी मानसिक शांतता (मोक्ष मुक्ति) तिला आपल्या शेतावर राबतांना मिळते असेच म्हणायचे नसेल ना तिला ?]

सासरे शेतातून परत आले आहेत. जावयाबरोबर जेवायला बसले आहेत. मुलगी (लाडाकोडाची) आक्का वाढायला लागली आहे. मुलगी (नवपरनीत) प्रेमाचे पोटी आपल्या नवऱ्याला (राजा विक्रमाला) जास्त वाढेल कदाचित व त्यामुळे वितुष्ट येईल, भेदभाव वाढतील म्हणून ती मुलीला कडक शब्दात सांगते, बजावते—

**सासरा जवाई, ह्या देवाराना देव।**
**ह्यासले वाढामां, नको करू दुजाभाव ।। (२२)**

सासरे-जावई (सोबत जेवायला बसलेले) (मामा-भाचा) हे दोन्हीही (तुझ्यासाठी) देव्हाऱ्यातील देव आहेत. तू त्यांना जेवण वाढतांना भेदभाव (फरक) करू नकोस.

हे शेजारची स्त्री (सोयतोरा) ऐकते ती म्हणते काय ताई कशावर बेत आहे आज ? त्यावर ती उत्तरते--

**साखर सोजीनं रायत, अंबापुरीना सोबत।**
**लेकिना कर्ता दिन्ह, जवाई बापूले निवत ।। (२३)**

आंबापुरी (खेड्यातील लोकांचे आवडते जेवण) चे जेवण आहे. त्याच्यासोबत साखर आहे. (तुप आहे) लोणच (सोजीने युक्त असे) मुलीकरिता जावयास आमंत्रण दिले आहे.

आपल्याकडे मुलगी नसती तर जावई कशाला आला असता हे दर्शवायचे आहे तिला. (तिला मुलगा नसेल म्हणून. जावयावर एवढ प्रेम व्यक्त होत असाव).

आणि अशा रितीने आंबापुरीचे भोजन (आवडते, सुग्रास, चविष्ट) पोटावर हात फिरवून खाल्लयावर (पितर) झालेल्या जावयास झोप सुटते. त्याने आराम करावा म्हणून ती यांच एका स्वतंत्र खोलीत आंथरूण टाकावयास लावते—त्यांचे वर्णन करतांना ती म्हणते–

**उशाले उससी, पायताले चौघडी।**
**लेकिनां करतां हौस जवाईनी फेडी ।। (२४)**

(अंथरुण) (बेडींग) टाकले आहे (खाटीवर गादी टाकली आहे) उशाला (नरम) उशी आहे. (उषा नव्हे) (आणि पांघरण्यासाठी) पायाजवळ चौघडी (अतिशय तलम व उबदार वस्त्र) आहे. मुलीच्या सुखासाठी (मी) जावयाची हौस फेडते आहे.

(अद्यात डनलापच्या उशा, सोफा-कम-बेड चो निर्मिती व्हावयाची आहे) आदरातिथ्यात ती आधुनिक स्त्रीपेक्षा मागे नाही.

भर उन्हाळचाचे (ऐन वैशाखाचे, अक्षयतृतीयेच्या नंतरचे) दिवस आहेत. थाटामाटाने आलेला जावई (तो प्रथमच पहिल्या अक्षयतृतीयेला सासऱ्यांच्या गांवी 'पितर' व्हावयास व लग्नानंतर पत्नीस बऱ्याच दिवसाच्या (१) कालखंडानंतर आलेला असतो. (पूर्वीचे काळी ६ महिने आईकडे व ६ महिने सासूकडे राहण्याची पद्धत प्रचलीत होती). 'पॉश' येणारच. (आपण कसे गेला होतात पहिल्या पितराच्या वेळी कृपया लेखकाला त्याच्या पत्त्यावर कळविण्याची तसदी घ्याल कां?) त्याला खूप उकडते. (अद्याप अनियमित पुरवठा फेम म. रा. वि. मंडळाचा जन्म व्हावयाचा आहे.) त्यांचे हाल पाहून सासू म्हणते––

**सोया शिनगार, मन्हा लेकीना पतीना।**
**हुपारा दाटना, पंखा मांगस मौतीना ।। (२५)**

माझ्या मुलीच्या पतीने (आवडत्या जवायाने) सोळा शृंगार (वाचकहो पूर्वी पुरुष देखिल शृंगार करीत असत याचा पुरावा अहिराणी काव्यात या स्त्रीने नमूद केला आहे. केलाच पाहिजे. मेहबुबाला खूष ठेवण्यासाठी। नाही कां?) त्याला उकाडा होत आहे. तो वारा (हवा) घेण्यासाठी मोत्याचा पंखा मागत आहे. तिची योजनाबद्ध सूचकता या काव्यात प्रगट होते. जावयाला (त्याच्या पत्नीला) बोलवायाचे आहे. परंतु सरळ सरळ न बोलाविता तो मोत्याचा (वाळायुक्त) पंखा मागवितो (वारा देणारी मग यईलच).

त्याच्या शयन-गृहांत सर्व आवश्यक, अदययावत व्यवस्था झाल्यावर थोडी उणीव असते ('उणीव तो तुझीच गे, रहावेना तुझिया विना' अशी अवस्था जावयाची होते.) हे तिच्या लक्षात आल्यावर ती उपदेशते --

**आंबानी कयरी, आंबाले घाले वारा।**
**लेकीना करता, हाउ शिनगार सारा ।। (२६)**

(हे) आंब्याचे कयरी (फळीत,स्तनभाराने वाकलेली) तुझ्या आंब्यांला (ज्याचे कृपाछत्राखाली छायेखाली बसल्यावर लेकीला हायसे-हँसे वाटणार आहे, ज्याचा स्वभाव गोड आहे) (त्याला) वारा सुप्रसिद्ध कवी वा. रा. नव्हे हं (हवा) हे. (पंखा कर) मुलीसाठीच हा एवढा (अवर्णनीय) शृंगार (स्पेशल ड्राईंग रुमची सजावट) केलेली आहे.

मुलीचे रसभरोस नवथर तारुण्याचे व जावयाच्या गोड स्वभावाचे वर्णन एकाच फळाची उपमा घेवून स्पष्ट करण्याचे या ठिकाणी तिला साधले आहे. अर्थ प्रकटीकरणाची तिची-घाटणी आगळी आहे.

अशा रितीने तिची मुलगी जावयाला (मोत्याच्या पंख्यासह) वारा घालावयास तिला हव्या हव्याशा शयनगृहात गेली आहे. जावयाने कोणताही आरडाओरडा (अकांडतांडव) केलेले नाही (तुमच्या आमच्या सारखे :) त्यावर ती वर्णन करते --

**माय जवाई जवाई, जवाई समुंदरना मोती।**
**लेक अपरुक बाई, दिन्ही कृष्णदेव हाती ।। (२७)**

बाई ! जावई फार शांत स्वभावाचे आहेत. माझी सुंदर मुलगी ((अक्का) मी भाचा कृष्णदेव (काळ्या वर्णाचा पण राजकारण धुरंधर कुटील नितीचा पुरुष) च्या हाती (संपूर्ण ताब्यात) दिली आहे. तिचा जवाई मोठा पुढारी असावा.

अशा तऱ्हेने खऱ्या अर्थाने संसाराला सुरुवात झाल्यावर दिवसेंदिवस पतीपत्नीचे प्रेम वाढत जाते (आमचा उलटा अनुभव आहे). त्यावर सासरच्या ऐश्वर्यात ती गोड वर्णन करते--

**सासर वं सांगू, सासर सोजीन रायत ।**
**मननी हौस फेडू, समदी हयात ।। (२८)**

शेजारच्या मुलीजवळ गप्पा करतांना ती सासरच रसभरीत (थोड्या अतिशयोक्तीने वर्णन करते. बाई सासरच काय सुखं सांगू-- (माझ) सासर साखर व सोजीयुक्त अस गोड लोणच (मुरब्बा आहे). ते सोजीच्या पिठाने बनलेले (गोड, रुचकर व गुणकारी) जास्त मुरल्यावर अधिक अधिक गोड होणारे आहे. माझ्या मनाची हौस (कधी न पूर्ण होणारी) मी साऱ्या आयुष्यभर पूर्ण करीत रहाणार आहे. (मला कोणत्याही गोष्टीची उणीव नाही (भावाशिवाय).

रोजच्या जेवणाच्या पदार्थाची सार्थ, यथार्थ, उपमा तिने संसाराला दिली आहे. आधुनिक कविला ती मागे सारते.

केव्हा केव्हा या सुखी संसारात तिने गाणे म्हणावे. (स्त्रीचा आवश्यक गुण) जात्यावरच्या ओव्या पहाटेच्या कातरवेळी जात्याच्या घरघर संगीतात गाऊन तिच्या कारभारीस जागवावे, त्याचे रंजन करावे त्यास अंजन द्यावे असे वाटून सोनूआईस तिला म्हणते ---कांग 'सुमन' तू गान का म्हणत नाहीस ग ? त्यावर ती ओवीतून उत्तरते --

**सासू आत्याबाई, सर्व गेवं जूनं जून।**
**गानं कसं अिन म्हाले, दयनं दयाये चक्कीथीन ।। (२९)**

हे आत्याबाई, सासुबाई अहो आता सर्व जून (जून महिना नव्हे) ( जुन्या रूढी रिवाज) लयास जात आहे. आता मला गाण कस म्हणता येईल. ? (आता मी दळत नाही आता सर्व प्रकारचे दळण चक्कीवरून दळले जाते.) "पिसने बैठे तो गाने खुदही आते है" हे तिला पाठ आहे.)

सासू तिची आत्याच आहे. मामांची मुलगी पत्नी म्हणून स्विकारण्याची पद्धत त्यावेळी असावी, पतीच्या आईला आईप्रमाणे वागविण्याची आदर्शता येथे व्यक्त होते. तो तिच्या मनाचा अंपपरभाव आहे.

आणि अशारितीने या सुखी कुटुंबातील सून खूप सुखी आहे. आनंदी आहे. (पण नेहमी भांडण उकरून काढते. बोंबा मारते, कदाचित तिला आता एकत्र कुटुंबात राहवयाचा कंटाळा आला असेल।) तिच्या पोटी एक सोडून दोन पुत्ररत्नांनी जन्म घेतलेला आहे. हे अप्रत्यक्षरित्या प्रगट करतांना, खुबीदाररित्या ती म्हणते --

**सकायनं उन उन पडनं वंडीवर।**
**सासु भागरथा सोनु, नातु रव्हाडे मांडीवर ।। (३०)**

सकाळचे (कोवळं कोवळं) उन घराच्या (पत्रावर) वरंडीवर पडलेले आहे. (दिवस कासराभर वर आला आहे) (ज्याने मुलांना 'मुडदुस' रोग होत नाही) सासू भागरथा (भागीरथी) (गंगेप्रमाणे पवित्र आदर्श) सोनुताई (आपल्या) नातुंना (राजु व संजुला) (फक्त दोनच 'हम दो हमारे दो') मांडीवर घेवून खेळवित आहे.

प्रत्येक स्त्रीला शील गंगेप्रमाणे पवित्र रहावे म्हणून तिला सासरी जाताना 'गंगाभागिरथी' आशिर्वाद देण्याची तत्कालीन प्रथा स्विकार काव्यात डोकावतो.

यजमानांना पहाटे कारखान्यात कामावर पाठविल्यानंतर आदर्श गृहिणी 'कल्पना' आपल्या कामात गर्क झाल्याने मूल संभाळण्याचे काम सासुकडे आले असावे. कामाची (वयोमानाप्रमाणे) वाटणी करण्याची पद्धत आणि 'विना सहकार नही उद्धार' या तत्वाची पाळेमुळे

आमच्या अहिराणी स्त्रीने या पूर्वीची अभ्यासलेली आहेत. कोणत्याही क्षेत्रात ती आजच्या स्त्रीपेक्षा आघाडीवर आहे याची तिच्या काव्यात ठिकठिकाणी साक्ष पटते.

अशा रितीने, वरील अहिराणी ओव्यांमध्ये अहिराणी स्त्रीच्या मनाचा 'जावई' विषयांचा आपपरभाव, नाजूक, हळवा भाव, मामीचे प्रेम, मुलीवरील ममता याच यथासांग दर्शन मराठी वाचकास घडत आहे. निसर्गाच्या परिसरातील उपमा, उत्प्रेक्षा, संगतीला घेवून पुराणातील देवदेवतांच्या रुपकांच लेणा लेवून अहिराणी साहित्य दुथडी भरुन वहात आहे.

अनेक नाती अनेकविधा भूमिका मराठी वाचकांच्या मन:पटलापुढे यावयाच्या राहिल्या आहेत. ममताळू, कनवाळू, माता, कर्तव्यदक्ष, कठोर पिता, सासू, सासरा, अशा अनेक नविन भूमिका जात्याच्या पाळूत निघाल्या आहेत. 'ठोठवा म्हणजे सापडेल' ची भूमिका उत्साही मराठी (अहिराणी) लेखकांनी पत्करल्यास मराठी वाचक अप्रतिम दुर्लभ, साहित्यापासून मिळणाऱ्या एका आगळ्या आनंदाला वंचित होणार नाहीत. अशी गाढ आशा वाटते.

● ● ●

# सासू 'सॉसू' (नवऱ्याची आई)

—सासू अन् सासरवास जगप्रसिद्ध आहे. अशा सासुच्या नात्यांविषयी अहिराणी अग्रेसर आहे. प्रस्तुत प्रकरणांत आपणास सासूच दिसेल. अहिराणीचा संसार समृद्ध आहे, संस्कृत मधील श्लोक, मराठीतील आर्या, उर्दूतील शेर, हिंदीतील दोहे, इतक्या किंबहुना त्याहीपेक्षा कांकणभर जास्त अहिराणी ओव्या रसाळ व मधूर आहेत.

नासिक, धुळे, जळगांव जिल्ह्यांच्या परिसरांत खेड्यापाड्यातून अहिराणी भाषा बोलली जाते, [भाषावार प्रांत रचनेच्या आधारावर (अहिराणी भाषिक प्रदेशाचा) आयुर्विमा महामंडळाने तिन्ही जिल्ह्यांचा मिळून विमा विभाग केला असावा]. तिच्यात अनेक प्रकारचे नानाविध साहित्य निर्माण झालेले आहे. अहिराणी स्त्रियांनी ते रचलेले आहे. ते आजवर अलिखीत आहे. (त्या अशिक्षित, अडाणी असल्याने) परंपरागत वारसा हक्काने ती ज्योत दिव्याला दिवा पेटत पेटवत आजवर समाजात विरोधाच्या वादळाला सांभाळत तेवत ठेवली आहे. आईचा वारसा मुलगी, सासुचा वारसा सून घेऊन ते आजवर जोपासून अमर केले आहे व आजही यंत्रयुगाच्या काळात ते मराठी वाचकांच्या हृदयावर राज्य करीत आहे व करीत राहील यात तिळमात्र शंका नाही.

आजही खेड्यापाड्यातून (पीठाच्या गिरण्या असूनही) (महाराष्ट्र राज्य वीज मंडळाच्या लहरी व अनियमित वीज पुरवठ्या मुळे) असंख्य माता, भगिनींना आपल्या घरीच जात्यावर पहाटे व वेळी अवेळी (आणीबाणीत) दळावे लागते. जाते ओढण्याचे अविश्रांत, श्रम हलके व्हावेत म्हणून त्या सहज स्फूर्तिन आलेल्या ओव्या, गीते गात असतात. असह्य श्रम सुसह्य करण्यासाठी परंपरागत चालीवर गीत (ओव्या) म्हणताना एक अहिराणी स्त्री (केवळबाई) कुसुंबे येथे म्हणते—

**भाऊ करू याही, माय चावया बोलाले।**
**भासो करू हू, बाई, आत्याबाई म्हनाले ।।** (१)

(मी) भावाला व्याही करते. (मी) भावाला गप्पागोष्टी बोलण्या, चालण्यासाठी व्याही करते. (मी) भाचीला सून करते. (हे बाई) ती मला आत्याबाई म्हणत जाईल. (आत्याबाई म्हणण्यासाठी मी तिला सून करते).

'हू' हा शब्द हिन्दीभाषेतून अहिराणीत आला असून—'बहू' या शब्दाचा तो अपभ्रंश आहे. आप्त स्वकीय हाकेच्या अंतरावर असावेत ही तिची कल्पना, मनिषा, आपसातच संबंध घडवून आणण्याची त्यावेळच्या समाजाची रूढी, परंपरेच दर्शन तिच्या काव्यात घडत. [आजही काही अंशी मराठा (कुणबी-पाटील) व इतर बहुजन समाजात मामाची मुलगी

पत्नी म्हणून स्विकारण्याची पद्धत आहे. अगदी अलिकडे हुंड्यापायी ती कमी होत चालली एवढेच !] भाची माहितीतील असते हा तिचा धोरणीपणा, दूरदर्शीपणा काव्यांत डोकावतो.

तिला (भाचीची) सासू व्हावयाचे आहे म्हणून ती आपल्या वडिलांचा सल्ला घेते (पूर्वीचे-काळी 'पगडीवाले' बाबाचे लग्न जमवावयाचे याची साक्ष) वडिलांनी दिलेला सल्ला आपाल्या 'दिराणी' ला सांगतांना ती म्हणते--

**भाऊ करू याही, आईबा म्हनसं नकोबाई ।**
**आतेन्या भवजाया, मान देवाले तयार नई ।। (२)**

(मला) भाऊ (भावास) व्याही (करावयाची इच्छा आहे.) (मी) करू इच्छिते. वडील म्हणतात (मला) नको (व्याही करू नकोस). (कारण) आताच्या भावजया (भावाच्या बायका) (नंनंदेला) मान देत नाहीत. (तुझा योग्य तो आदरभाव, मानपान, होणार नाही).

भावजय शद्ब अनेकवचनी वापरला आहे. त्यावेळी बहुपत्नीत्त्वाची पद्धती त्या समाजात रूढ असावी. 'अतिपरिचयांत अवज्ञा' हे संस्कृत सुभाषित अहिराणी जनमानसात ज्ञात असल्याचा भास होतो. मान अपमानाची त्या समाजाला चाड होती.

भावजया मान द्यावयास (जरी) तयार नसल्या तरी पण मला भाचीच सून करावयाची आहे (वडिलांना समजावून) ह्याच सविस्तर कारण गल्लीतील आयाबायांना पटवून सांगतांना ती म्हणते--

**भासी करू सून, माले भासी सून साजे ।**
**बोले पायनां पैजन, मन्ह तयघर वाजे ।। (३)**

(मी) भाची सून करते. मला भाची सून शोभणार आहे. (ती माझ्या सारखीच सुंदर आहे) (ती तारुण्यानं मुसमुसलेली नवथर लावण्य लतिका) चालतांना तिच्या पायांतील नुपूर बोलतात. (त्यांचा कर्णमधूर नाद ऐकावयास येतो) तिच्या नटत थटत, मुरडत चालतांना माझ्या तळघरातून आवाज येतो (ती ठुमकत ठुमकत चालते). 'तळघर वाजते' ही कल्पना अनुपम्य आहे. 'झनक झनक पायल बाजे' ची प्रेरणा निर्माते व्ही. शांताराम यांना हिच्याच काव्यानं दिली असावी का ? 'उभार यौवन खांब केळीचा रसरसिली भासे, आत्याबाईची झोप उडाली भाचीच्या आसे' अशीच तर ती नसावी ना ?

लग्न ठरतं. मुलगी कुठली आहेग असं विचारणाऱ्या शेजारच्या स्त्रीस उत्तर देतांना ती म्हणते—

**भाऊना वाडामां; लगन नी वं तयारी ।**
**लेक मन्हा नवरदेव, भासी व्हईन नवरी ।। (४)**

भावाच्या वाड्यात लग्नाची तयारी चालली (आहे). माझा मुलगा नवरदेव होणार (आहे) (आणि) (माझी) भाची नवरी (माझी सून) होणार (आहे.)

प्रकटीकरणाची धाटणी वेगळी आहे. तयारीत दिवस निघून जातात. लग्नचा दिवस, वेळ येते लग्न संपते. मुलीची आई रूसून, फुगून कोंपऱ्यात बसते. कन्यादान करावयास येत नाही. ('टाळी' लागल्यावर आपल्या गोऱ्यागोमट्या मुलीचा हात काळ्यासावळ्या मुलाचे हातात पाहून तिने असहकार फुकारला असावा). त्यावेळी एका करवलीचे प्रश्नास उत्तरतांना ती म्हणते—

**भाऊ झाया याही; भवजाई याहीन व्हयेना ।**
**मांडोना व दारे, कन्यादानले येयेना ।। (५)**

भाऊ व्याही झाला आहे. भावजाई (तिचे मन) विहीण होण्यास तयार होत नाही (ती) मांडवात कन्यादान (एक विधी) करावयास (लौकर) येत नाही. (कां कू करीत आहे).

कन्यादानच्या विषयावरून आपसात बायकांची बाचाबाची होते (जात्याच भांडखोर म्हणून प्रसिद्ध असलेल्या च्या नियमास ती अपवाद होवू इच्छित नाही). हातवारे करत कडाक्याच भांडण होत. भावजय टाकून बोलते. भाऊ भानगडीत पडत नाही. ती यशस्वी-माघार घेते. तिने माघार कां घेतली हे गुपित एका वऱ्हाडणीस सांगताना ती म्हणते—

**आंबानी कयरी, आंबाले झायी जड ।**
**भाऊना करता, माल्हे भवजाई लागे गोड ।। (६)**

आंब्याची कैरी आंब्याला जड झाली आहे. (भावजय डोईजड झालेली आहे. प्रत्येक होतात म्हणा!) (अगबाई) (तरीपण) भावासाठी मला भावजय गोड लागते. 'नवरा तिच्या मुठीत ग!' असेच कांहीसे.

एवढे करून (मोठी) भावजय कां गोड लागते याचं कारण ती सांगते—

**वडील भवजाई, मन्ही माय तिन्हा जागे ।**
**आखाजी दिवाईले, मन्ही मुईनी चिंता वागे ।। (७)**

(अग बाई) ही माझी मोठी भावजय, तिच्या ठाई माझ्या आईचे (वातसल्य आहे) वास्तव्य आहे (लहानपणीच आई मेल्याने भावजयने तिला लहानाचे मोठे केले असावे.) (मातृ-प्रेम देवून वाढवल जोपासल असावं) (प्रत्येक वर्षी) अक्षय तृतीया व दिवाळीच्या सणाला (मी माहेरी आल्यावर) माझ्या (साडी) चोळी ची चिंता करते (अगदी नाकं न मुरडता हं!).

लग्न आटोपत. वऱ्हाड घरी जातं. लग्न तिथी आहेत तो पर्यंत मुळाची अडगळ मोडावी म्हणून शेजारच्या स्त्रियांनी लावलेल्या तगाद्यामुळे ती आपल्या नवऱ्यासोबत भावाला निरोप देते—

**मोठ मन्ह घरं, काम धंदाले एकली ।**
**याही रे भाऊ, सून धाडी दे धाकली ।। (८)**

माझं घर मोठ आहे. (घरात) मी काम करावयास एकटी आहे. (हे) व्याही (माझ्या) भाऊ माझ्या लहान सुनेला लौकर पाठवून दे.

सून वयान लहान असली (मुलाच्या कामी येणार नसली) तरी घरातला कामधंदा, शेतीतील काबाडकष्टाची कामे करावयास सवड मिळावी म्हणून ती हौसेने तिला मागवून घेते.

तिचे यजमान त्याच्या सासरवाडीहून सुनेला घेवून येतात. सून बैलगाडीवरून उतरून घरचा ओटा चढते. तेव्हा सासू तिला उपदेश करते—

**नादान सुनबाई, पायना चपला काढ ।**
**आयाबाया वं दखाले, मोठीसना पाया पड ।। (९)**

(हे) (अल्लड) सूनबाई ! (आधी) पायांतील चप्पल काढ. शेजारच्या स्त्रिया तुल. बघावयास आलेल्या आहेत. (त्यातील) (तुझ्यापेक्षा वयानं) मोठ्या स्त्रियांचे तू (वाकून) पाय पड (लीनतेचे धडे ती सुनेला देते).

पुढे ती म्हणते—

**भाची सुनबाई, पड पाया वाकीसन ।**
**नंदा देरले भेट तूं, ले रामन दरसन ।। (१०)**

(हे) भाची सूनबाई, (कां ग !) वाकून पाया पड (पडत जा) (अगोदर) (घरांतील) (तुझ्या) नणंद, (लहान) दीर यांना भेट (मग) (तुझ्या) रामाच (पतीच) दर्शन घे. (ताठरपणा घालविण्यासाठी नम्रतेचा धडा ती सुनेला शिकविते).

पहिल्याच प्रसंगात सुनेवर 'फर्स्ट हॅन्ड इम्प्रेशन' ती मारते. ती सून म्हणून पहिल्यांदाच आली असल्यानं तिला खुष करण्यासाठी म्हणते—

**नवी नवरी तूं भासी मन्ही सुनबाई ।**
**तूपमां बुंदी गाय, तोंड लावाले कुरडाई ।। (११)**

हे सूनबाई तू आज या घरात नवखी आहेस. (खावयास) (स्वयंपाक) बुंदी गाळ (बनव) (बुंदीचे लाडू कर) तोंडी लावावयास (भजे) कुरड्या तळ (पापड तळ).

ती स्वयंपाकात सुग्रण असली पाहिजे. पार्टी देण्याची प्रथा फार पुरातन म्हणायची. अलिकडे फक्त स्वरूप बदलले आहे. (आम्ही वरिष्ठांनी खुष व्हाव म्हणून एखाद्या मोठ्या हॉटेलात 'बिअर' सह मुर्गीची पार्टी देतो ना !)

पंचपक्वान्न, चौरस आहार यथेच्छ (पोटावर हात फिरवून) खाल्ल्यावर वेलदोडा तोंडात चघळतांना सूनबाई म्हणते--

**सासू मन्ही व प्रेमय, सदा मन्हावर माया ।**
**मायना सबद विना, दिन जाये ना वाया ।। (१२)**

माझी सासू (फारच) प्रेमळ आहे. तिची नेहमी माझ्यावर माया आहे. आईच्या (सासुच्या) शब्दांने (मायेचा शब्द दिल्यावर) दिवस व्यर्थ जात नाही. (तिच्या शब्दाने दिवस आनंदात जातो. कामी लागतो. सार्थी लागतो). आई सारखेच ती मला वागविते.

आपल्या सासू-सासऱ्यांचं कौतुक सांगतांना ती म्हणते—

**सासु सतनी रूखमा, सासरा ईठोबा मन्हा ।**
**याद मायनी ना ये बं, आसा सुखे संसार मन्हा ।। (१३)**

(माझी) सासू सत्यवान (पुण्यवान, पवित्र) रुखमाई (आहे) तर (माझे) सासरेबुवा हे विठोबा (पंढरपूरचे) (आहेत). मला आईची आठवण येत नाही. असा माझा सुखाचा संसार आहे. पारंपारिक आराध्य दैवतांची सासू-सासऱ्याला दिलेली उपमा सर्व थैव सार्थ वाटते. ('सासू-सासरे दैवत माझे, असता माझ्या घरी कशाला जावू मी पंढरपूरी' असेच तिला म्हणावयाचे असेल कां?)

नव्या नवरीचे नऊ दिवस संपतात. कोडकौतुक मागे पडते. ती संसारात रममान होते. तिला सावध करण्यासाठी सासू तिला रागावते, बजावते, दुःखाचे चटके तिच्या वाट्याला येतात. सुनेच्या आळशीपणामुळे घरांत अस्ताव्यस्त पडलेल्या वस्तुचे नीट नेटकेपणाबद्दल ती सूनेवर रागावते—

**मोठं तुन्हं घर, सदा पाव्हनाना येवा ।**
**गादीवर दुट्टा, पान सोपारी पडू देवा ।। (१४)**

(हे सूनबाई !) तुझे घर मोठे आहे. (तू मोठ्या घरची सून आहेस) (आपल्याकडे) नेहमी पाहुण्यांचा (पुढाऱ्यांचा नव्हे !) येवा (येणे) असते. (पलंगाच्या) गादीवर दुट्टा (कपासी भरून पांघरावयास केलेले) (चादर) असू द्यावी. पान सुपारीचा डब्बा (पान-पुडा) (ठेवलेला असवा) (त्यात सुपारी, अडकित्ता, लवंग, वेलदोडा, धनादाळ भरून ठेवावी). हे तुला बेंधळीला कसे समजत नाही ग ?

ती नवथर उन्मत्त आहे. सासुच्या शिकविण्याचा तिला मनस्वी राग येतो (आताच्या सुनांसारखाच !) ती सासूबद्दल म्हणते—

**सासू सासू करु, सासू खजिना सोनाना ।**
**आज राग माले उना, तिना उगर बोलाना ।। (१५)**

(मी) आजवर (माझ्या) सासुला विचारांचा मौल्यवान ठेवा समजत होती. आज मला त्यांच्या उर्मट, उद्धट, बोलण्याचा राग आला

घरांतील सासुचे मूल लहानाची मोठी होतात. शेती वाढते. कामाचा व्याप वा तो तेव्हां घरांतील कामधंद्याविषयी ती वर्णन करते—

**जसा जंगलमा कुंदा, तसा सासुना घर धंदा ।**
**कोरी कारी पूरा करो, पसरत जाये बंधा ।। (१६)**

जसा शेतात कुंदा [ अपायकारक (पिकाला) गवत ] असते. (जे एकदा झाल्यावर लौकर नष्ट होत नाही त्याची पाळमूळ खोदून फेकावे लागतात) तसा सासुच्या घरी (न संपणारा) उद्योग (घरकाम) असतो. जीवाचा आटापिटा करुन काम संपवावयाच (पण) मारुतीच्या शेपटीवाणी ते लांबतच जातं. शेतातील कुंदाची उपमा, घरांतील कामास सार्थ वाटते. परिसरांतील निसर्ग तिच्या काव्यात डोकावतो.

घरातील कामधंद्यावरून तणफण, आदळ-आपट सून करते. सासू तिच्यावर खूप रागावते व तिची औलाद (पैदाईश) खानदान काढते. त्यावेळी ती सासुला बजावते—

**सासू आत्याबाई, नका काढू मन्ही अबलाद ।**
**लोखंडना पुढे धीर, धरेना पवलाद ।। (१७)**

(अहो सासूबाई, आत्याबाई माझी पैदाईस काढू नका. (माझ्या खानदानचा विचका करू नका). लोखंडापुढे पोलादचा टिकाव लागणार नाही ! (उपरोधाने म्हणते) (मी आपल्यापेक्षा स्वभावाने जहाल आहे. प्रत्येक गोष्टीत सवाई आहे. आपण मानाने मोठ्या असल्याने मी माघार घेते) मी आपल्याच खानदानची आहे हे समजवतांना लोखंड व पोलाद यांच्या उपमा ती घेते. शब्दांची योजकता अचूक आहे.

पोलाद हे लोखंडाचे प्रतिरूप आहे. पोलादाचे लोखंडापेक्षा भौतिक गुणधर्म भिन्न असले तरी रासायनिक गुणधर्म एकच असतात. तिला शास्त्रचं ज्ञान आहे. (आपण एकाच रक्ताचे आहोत असे ती सूचविते). इथे तिला खरा सासरवास जाणवतो. हिची परिस्थिती पाहून निर्माते व लेखक अण्णासाहेब देऊळगावकर यांना 'सासुरवाशीण' चित्र-पटाची कल्पना सूचली असावी.

हे सारं शेजारची स्त्री ऐकते. ती सासुला म्हणते माझी सून अशी तोंडी लागत नाही. बाई व आपली परंपरागत कला दाखवून कळ लावते. त्यावेळी पुन्हा नव्या जोमाने सासू-सून युद्धाला सूरूवात होते तेव्हा सून म्हणते—

**सासू सून न भांडन, मझार शेजीन लावनं।**
**दारे उभा राम, डावा डोयानी दाबन ।। (१८)**

(हे सासू-सूनेच भांडण आहे (भांडणांत) शेजारच्या स्त्रीनं कळ लावली आहे. दाराशी राम (तिचे पती) उभे आहेत. (मला) (गप्प राहाण्याविषयी) डाव्या डोळ्याने खुणवत आहेत. ती गप्प होते (?)

केवढी सभ्यता आहे. त्या काळी केवळ डोळयाच्या खुणेने बायका चूप राहात असाव्यात. त्यांना नेत्र पल्लवी येत असावी. (सध्या आम्ही डावा डोळा दाबण्याचा प्रयोग एखाद्या फटाकडीवर लाईन मारावयासच करतो.) (अर्थात डोळयाच्या खुणेने कोणीही आजकाल ऐकत नाही हा भाग वेगळा! ती तरूण मंडळींच्या जीवनांतील खंत आहे.)

सासू-सूनेच रोज भांडण जुंपते. घरांत सासरवास वाढत जातो. कटकटी वाढतात. काही वेळा बायको ऐकत नाही. मुलाच्या डोक्याला ताप होतो. 'इकडे आड तिकडे विहीर' अशी त्याची परिस्थिती होते. 'इकडे जन्मदात्री तिकडे पुत्र जन्मदात्री'. तेव्हां तो दुःखावर विरंगुळा म्हणून रोज 'गावठी' दारू (तेव्हां देशी दारूचे दुकान त्याचे गावी नसावे) पिवून तर पडतो. तेव्हा शेजारीण त्याच्या पत्नीला म्हणते कां ग कला तू नवऱ्याला काही सांगत नाही का? (त्याची सवय वाढत चालली), त्यावर ती उत्तरते—

**शेप कुत्रानी वाकडी, ती कां नीटजं, व्हयेना।**
**पेये मुतारा रोजरोज, माले कयक दायेना ।। (१९)**

कुत्र्याची शेपूट वाकडी (असते) ती काही केल्या नीट होत नाही. (मूळ स्वभाव बदलत नाही. तो रोज रोज मूत (मुत्र) (दारू) पितो. (अस करू नका, दारू पिवू नका असे सांगितल्यावर) मला कांठी दाखवितो (मारतो).

परीसरातील उपमा ती देते. दारूला मूत्र समजते. तुच्छ लेखते. या वातावरणा-वरूनच संत एकनाथ महाराजांना "दादला नको ग बाई. मज नवरा नको ग बाई' या भारूडाची कल्पना सूचली असावी. अशा तऱ्हेने नवऱ्याचे संसारात लक्ष लागत नाही. तो गृहस्थाश्रमातून लांब लांब जाण्याचा प्रयत्न करतो तेव्हां ती स्वतःची अडचण सासू जवळ मांडते—

**सासू आत्याबाई, आंडोरले सांगा काई।**
**महिनांन धोये डोकं, संसार मा चित नही ।। (२०)**

(अहो ! ) सासूबाई (तुमच्या) मुलाला काहीतरी ज्ञान सांगा. (अहो ! ) मी (कालच) महिन्याचं डोक धुतल (बाहेर) (विटाळशी) (झाली होते) (अजून मला दिवस गेलेले नाहीत) [ ते (तिचा नवरा) बाहेरख्याली करीत असतील त्यांनी गावाबाहेर (झोपड्या-तील) एखादी बाई 'रखेली' म्हणून ठेवली असेल.] लक्षार्थाने अप्रत्यक्ष बरचसं गुपीत ती वाचकांपुढे उघडे करते. तिची प्रकटीकरणाची कला वाखाणण्याजोगी आहे. तिला असला नवरा नको नकोसा वाटतो. हिच्या परिस्थितीवरूनच निर्माते, व्ही. शांताराम यांना 'असला नवरा नको ग बाई' च कथानक स्फुरलं असावं.

ती विमनस्क मनःस्थितीत असतांना शेजारची स्त्री विचारपूस करते. तिला सार्थ उत्तर देतांना ती म्हणते—

**सिताले वनवास, एडा रामले काय कये ।**
**उन्हमां आग येये, फूल मनमां कोमाये ।। (२१)**

(बाई ! ) सिताला वनवास (आहे.) हे वेड्या रामाला कसे बरे कळणार ? उन्हात आग आलेली आहे. (काळांत तेरावा महिना ! संकटात अधिक मोठ्या संकटाची भर पडली आहे). फूल मनातल्या मनात कोमजते आहे (मी स्वतः मनांतल्या मनांत झुरते आहे. कुढते आहे.) पहिल्यांदाच सासुच्या सासुरवासाने त्रस्त. तशातच नवऱ्याच्या बाहेरख्यालीपणाची भर या परिस्थितीच वर्णन सुंदर रुपक घेवून तीने केले आहे. सीता व रामाची रुपके पत्नी व पती साठी वापरण्याची त्या वेळची पद्धत काव्यात डोकावते. (मोठ्यांचा आदर्श डोळ्यापुढे ठेवण्याचा मूळ उद्देश).

ज्या सासुच्या सासुरवासामुळे ही संकटे आलीत तिचे त्या वेळच्या समाजातील स्थान पाहूनच 'सासू गांजते मला, तिकडेच बोळवि तिला, भवानी आई रोडगा वाहीन तुला' हे भारुड संत एकनाथ महाराजांना लिहिण्याची उपरती झाली असावी.

'इकडे आड तिकडे विहीर' अशा परिस्थितीतील सून ज्या वेळेस ढसा ढसा रडायला लागते त्यावेळेस सासुला वाटते ही मुलासाठी रडत असावी. तेव्हां ती म्हणते—

**पुत्र पुत्र करता हूं, नको डोयाले लावू धारी ।**
**सासु कशी म्हने, धीर, गंभीर लेवं नारी ।। (२२)**

(हे सूनबाई ! ) मुलासाठी डोळ्यात अश्रू येवू देवू नकोस. सासू म्हणते (सुखी संसारासाठी) (तू) थोडा धीर धर (धीर धरी रे धीरा पोटी, फळे रसाळ गोमटी, सबर का फल मीठा होता ।) मन शांत ठेव.

संकटी सासू धावून जाते. तिचे दुःखी कष्टी मनाचे सांत्वन करते. आईच्या प्रेमाने तिला उपदेश करते. धीर देते. काही गोष्टी दैवाधीन आहेत हे नशिबाचे खेळ असतात. भोग भोगावेच लागणार. असे सांगताना ती सुनेला म्हणते—

**दगडना देव, याले शेंदुरना डाग।**
**दैवाना पुढे, ना, चाले वैदना लाग॥ (२३)**

दगडाच्या देवालाही शेंदूरचा डाग (काळीमा) (आहे) (प्रत्यक्ष देव देखिल निष्कलंक नाही) दैवापुढे वैद्याचाही निभाव लागत नाही. 'दैवंम् चैवात पंचमम' हेच खरे मनोवैज्ञानिक विश्लेषण ती करते.

तिच्या सुनेला 'मनोवांछित संतती' हवी आहे तर तिचा मुलगा 'ब्रह्मचर्य हेच जीवन' जगतो आहे. यातूनच पुढे 'स्वाधीन की दैवाधीन?' कादंबरीचा जन्म व्हावयाचा आहे. आणि यथावकाश ती मुलाला खडसावते, टाकून बोलते. त्याच्या इतरपितर तिखट ला पाणी पाजते. भांडण झाल्यावर मुलगा आईशी अबोला धरतो तेव्हा आई म्हणते—

**घरमा नी घरमा, आंडोर मायसे बोलेना।**
**आस्तोरीना पुढे, त्यान्हा ईलाज चालेना॥ (२४)**

घरातल्या घरांत मुलगा आईशी बोलत नाही. पत्नीपुढे त्याचा काही इलाज चालत नाही. (आपलाही तोच अनुभव असेल नाही कां? काय खोटं बोलता राव!).

नळ बंद केल्यावर पाणी हौदातून ओसंडाव तस आईशी अबोला झाल्यावर तो बायकोकडे झुकू लागतो. गोड गोड बोलतो. आईशी अबोला धरलेला मुलगाही आईला आवडतोच. तिच्या रक्तात सूड नाही. क्षमेवर तिचा विश्वास आहे पुढे पतीपत्नीच सूत जमायला लागते. पत्नी शृंगाराच वर्णन करताना म्हणते—

**नजीकथीनं देखू, मन्हा रामनी नवती।**
**नव लाख मोती, मन्हा कुकुना भवती॥ (२५)**

(मी) माझ्या नवऱ्याच तारुण्य जवळून पाहते (त्याचा उपभोग यथेच्छ घेते) नव लाख मोती माझ्या कुंकवा भोवती चमकतात. (नवरा दैदिप्यमान आहे. पूर्ण नर आहे.) (मी नशिबवान आहे माझ्य भाग्याचे तेज पडते.)

'मैं क्यो ना नाचू आज.......' अशी तिची परिस्थिती होते. रात्र रात्र जागून काढल्या जातात. खाटेच्या नव्या दोऱ्या तुटतात. दोघाचं जमल्यावर पुढे काय झाले हे सुज्ञ वाचकास सांगणे नलगे. 'तुमच आमच जमल' अस म्हणताना वयाचा

कौमार्य भंग होतो. अधिर होवू नका ! पुढे काय झालं ते सासुच्याच शब्दांत ऐका—

**कशी चालस दनदन, डोये घागरी लेस दोन ।**
**मह्यना सातवा से चालू, गोया पोट ना सरकीन ।। (२६)**

(तिच्या खाण्या, पिण्यात, वागण्यात पूर्वीच बदल झालेला असतो.)

(अग !) (सूनबाई !) (वेंधळी) अग कशी दणकून (जोरांत) अन तेही डोक्यावर दोन घागरी (तांब्याच्या पाणी भरलेल्या) घेवून चालली आहेस. (तुला) सातवा महिना चालू आहे. (तुझ्या पोटात सात महिन्याचा गर्भ आहे.) पोटातला गर्भ इकडे तिकडे सरकेल. (तू दूपावून जाशील) (बिना गोळचा घेताच गर्भपात होईल). वाचकहो बेवडया गडयानं गाडी ढिबऱ्यावर ठेवली हं. सध्या ती 'अडर नॉन-युज आहे हं !' सासुचो 'दक्षता' या ठिकाणी दिसते.

आपली सासू व सासरे किती काळजी करतात, उपदेशतात याचे वर्णन ती करते—

**सासु बाईनी कायजी, मामाजीनी कयकय ।**
**सुन आते जप बेटा ! आमना वंशी न फय ।। (२७)**

सासुबाई (खूपच) काळजी (घेतात), मामाजी (सासरे) (खूपच) कळकळ (करतात व म्हणतात) (हे) सुनबाई (बेटा) (तू) आमच्या वंशाच्या फळाला (नात किंवा नातूला) नीट जप. सांभाळ कर. त्यांच्या बोलण्यात लिनता आहे, बायकोचं ध्येय चूल व मूल एवढच त्यांना अभिप्रेत आहे.

मुलगा लहान आहे. ती वर दिलेला मंत्र लक्षात ठेवते. सासू जेव्हा तिला दळावयास सांगते तेव्हा ती म्हणते—

**सासु आत्याबाई, कसा घटयावर म्हनू गाना ।**
**लाडका नातू भटा, भटा, से ना, जी, महिनांना ।। (२८)**

(अहो !) सासुबाई, आत्याबाई (अहो !) मी जात्यावर दळायला कसे बसू. गाणे (ओव्या) कशा म्हणू ? (तुमचा) लाडका नातू भटा ('भटाई' देवीच्या नवसाने झाला म्हणून भटू नाव ठेवलं असावं) हा एक महिन्याचा आहे ना ? मुलगा होण्यासाठी देवीला नवस करण्याची पद्धत त्यावेळी समाजात होती. 'टेस्ट टयुब बेबीचा' शोध लागावयाचा राहिला होता अजून.

मुलाचा पाय लहना झाला. मुलगा भाग्यवान ठरला. घरात सुख-शांतीचे राज्य आले. त्याबरोबर समृद्धी आली. त्याचं श्रेय आपल्या आवडत्या सासुला देतांना

ती म्हणते--

**सासु मन्ही सुपातर, मावया मां ली उनी।**
**घर करे कचकच, कोन्या गोटनी नही उनी।। (२९)**

माझी सासू फारच धोरणी, पवित्र, भाग्यवान आहे. (मला) माळव्यात (सुख समृद्धीत) घेवून आली. (माझं) घर गच्च भरलेलं आहे. (मला) कुठल्याही गोष्टीची कमी नाही. (पाँचो उंगलीयाँ घी मे है।).

आपल्या घराला माळवा प्रांताची ती उपमा देते. माळवा प्रांत (हल्लीचे माळवा, मध्यप्रदेश) हे एके काळी सुख-समृद्धीचे आगार म्हणून ओळखले जात होते. तेथील व्यापार पेठ प्रसिद्ध होती. तिचा पती बैलाचा व्यापारी असावा किंवा शेतीसाठी बैलजोडया घेण्यासाठी दरवर्षी मध्यप्रदेशात जात असावा! दोन प्रांतांत दळणवळण होते. तिच्या काव्यांत ज्वलंत इतिहास आहे.

वरील ओवीत सून सासूचे कौतुक करते. सासूही काही, कमी नाही ती मोठे-पणाने भारावून न जाता सर्व श्रेय सुनेला देतांना म्हणते—

**पायनानी दोरी, दोरी सलम सुतई।**
**सदा हालावू हिंदया, सुन भागनी पुतई।। (३०)**

पाळण्याची दोरी, दोरी ही अखंड सूतळी (दोरीचा प्रकार) आहे. मी नेहमी पाळणा हलवित रहाते. (माझी) सून भाग्याची बाहुली (आहे.) (तिला दरवर्षी मूलच होत असावे). तिचे याद वर्षाचे असावे. जास्त मुलांना जन्म देणारी त्यावेळी भाग्यवान समजली जात असावी (तेव्हां महागाईने कहर केला नसेल व 'संतती नियमन' मुळीच नसावं.) मुल सांभाळण्याच्या सहकार्याने तिचे सुनेशी संबंध सुधारतात. सासुची व्यक्तीरेखा खास ठोस तत्त्व सांगून जाते.

मध्यंतरी वय झाल्याने सासरा स्वर्गवाशी होतो. सासू गंगा-भागीरथी होते पोरकी होते. तिच्या उतार वयात मुलगा व सून हेच आधार असतात. वानप्रस्था-श्रमात ती देवाकडे झुकते. 'हरीनाम' भजता भजता ती देवाला विनविते—

**राहू दे देवाजी, सून स्वभाव सोज्वड।**
**नही कपाये कुंकु, राज भोगू दे एवड।। (३१)**

(हे!) देवा माझ्या सुनेचा (बदललेला) स्वभाव असाच (चांगला, प्रेमळ) राहू दे. माझ्या कपाळी कुंकु नाही (मी विधवा झाली आहे). (मला) (मुलाचे सुखी संसाराचे) राज्य उपभोगू दे. सुखाने राहू दे.

अशा तऱ्हेने 'चार दिवस सासुचे व चार दिवस सुनेचे' असतात. (प्रत्येकाचे जीवनात चांगले दिवस येतातच.) (भगवान के घर देर है, अंधेर नहीं है।)

सुनबाई 'सासू' होण्याच्या तयारीत आहे. ती सुनेला सासरवास करणार नाही, आनंद अतिरेकाने नवी सून म्हणेल .....'साँस भी कभी बहू थी।' आणि आजला एवढेच पुरे!

अहिराणी काव्याचा परीक्षणात्मक अभ्यास करावयाचा म्हटल्यास टिकाकाराचे दृष्टीकोनातून अहिराणी काव्यात व्यक्तीमत्व आहे. सासू-सुनेच्या व्यक्तीमत्वातून नवे फुलोरे उठलेले आढळतात. अहिराणी स्त्रीचे साहित्य विश्वमय आहे. तिच्या साहित्यात झुंजार वृत्ती आहे. त्यात मरगळ नाही. चैतन्य आहे. ओवीतील शब्दांना नुसते अर्थ नाहीत तर सामर्थ्य आहे. जीवनाची ओढ आहे. रुढी व परंपरा यामुळे जीवनात ताण आहे. सासुचे प्रबोधन करताना सुनेनेही काही गोष्टींचे भान ठेवले आहे. तिचे काव्य मनोवैज्ञानिक आहे. मानसिक चिंता व खिन्नतेचे वेळी अंतिम कल्याणाचा योग्य सल्ला तिने दिला आहे. सुनेच्या संसारात तिचा सहभाग आहे. संसार करण्यात सून वचनबद्ध आहे. हिंदू धर्मात अनेक गोष्टी पाप-पुण्याशी निगडीत असल्या तरी पती व्यसनी, व्यभिचारी, दुराचारी असूनही त्याच्या इच्छेविरुद्ध न जाता त्याच्या दबाबाखालीच ती वागते. शिक्षणाभावी, संस्काराभावी छळली जाणारी, मार खाणारी स्त्री अहिराणी काव्यात चितारली गेली आहे. आजची मुलगी उद्याची सून व परवाची सासू असते. 'चार दिवस सासुचे व चार दिवस सुनेचे' हेच खरे.

● ● ●

# सईबहिन, दोस्तीन (मैत्रिण)

—जीवनाच्या बगीच्यातील फूल म्हणून वर्णन असलेल्या "मैत्रिण", जी नवऱ्यालाही हवी असते. बायकोलाही नको नसते. जी जीवन फुलविते, फळविते अशा गूढ गोड नात्याशी अहिराणीनेही "दोस्ती" केली आहे. जळगांव, धुळे, नासिकच्या काही भागातील लोकांची अहिराणी बोली ही मायबोली आहे. ती बोली साहित्य रत्नाची खाण आहे. तिच्यातील विविध विषयांवर आधारित ओव्या महाराष्ट्रातल्या कानाकोपऱ्यांत विखुरलेल्या आहेत अहिराणी ओव्यांतील भाऊ, लेक, जावई इत्यादी विषयांची यापूर्वीच्या लोकप्रिय दिवाळी अंकाद्वारा चमचमीत मेजवाणी मराठी वाचकांना देण्यात आली आहे. अहिराणी ओव्या विखुरलेल्या मोत्याप्रमाणे समाजात पसरल्या आहेत. त्या रचल्या गेल्या नसून स्वयंस्फूर्त आहेत व म्हणून भावपूर्ण आहेत. अहिराणी साहित्याची जोपासना करण्याचा वारसा हक्क स्त्रियांनी (माता, भगिनींनी) राखून ठेवला आहे. [सर्व (एकसोडून) अहिराणी भाषिक स्त्रियांना नमस्कार असो.]

विविध विषयांपैकी मैत्री हा विषय देखिल अहिराणी काव्यात रंगविला गेला आहे. मैत्री हे जीवनाच्या वेलीवर आलेले सुंदर फूल असते. गरजेचे वेळी कामी येणारा तो खरा मित्र. "Friend in need is a friend indeed" या इंग्रजी उक्तीचे तोडीचे पण मराठी साहित्यास लाजवणारे भाव व्यक्त करतांना एक अहिराणी स्त्री (केवय अक्का) म्हणते,—

**सईबहिन करू, करू गरजनी एडी ।**
**गरज सरी जाता, ना जी बोले वं थूक तोडी ।। (१)**

(मी) मैत्रिण अशी करीन (जी) माझ्या गरजेसाठी वेडी असेल (होईल), (माझी) गरज संपल्यावर जी मला टाकून बोलणार नाही ; (तुच्छ लेखणार नाही) (सोडून दूर जाणार नाही).

मैत्रिणीला सख्ख्या बहिणीप्रमाणे वागविण्याची, समजण्याच्या रुढीची व त्यावेळच्या परंपरेची "सई बहिन" वापरलेला तिचा शब्द आजही साक्ष देतो. (मैत्रिणीला मैत्रिणीने सख्ख्या बहिणीप्रमाणे वागवावे, माया करावी असा आदर्शवाद आजच्या रक्ताच्या नात्याला न ओळखणाऱ्या काही अमानुष स्त्रीयांपुढे ठेवावयाचा नसेल ना ?). तिच्या काव्यात भविष्याची जाण आहे. सभोवतालच्या येणाऱ्या अनुभवांची गोड शिदोरी तिच्यासोबत आहे. आगामी वाईट परिणामांबद्दल ती दक्ष आहे. चांगल्या गुणांचा तिला ध्यास आहे. चांगल्याच्या शोधात असताना तिच्या रहाणीमानाची जाण येते. समाजातील प्रचलित रुढींचे प्रत्यंतर तिच्या काव्यांत आढळते. मानवी स्वभावाचे हुबेहूब वर्णन तिच्या

काव्यात डोकावते. अनुभवाच्या भूतावर तिने आपले भविष्य निर्भर केले आहे. "द्रव्याचा होता ऱ्हास तुटूनी पडती मैत्रिणींचे पाश" या कटू अनुभवातून चांगल्या मैत्रिणीच्या शोधात असतांना ती तिला हव्या हव्याशा मैत्रिणीबद्दल म्हणते,—

**सईबहिन करू, करू नार ठसीन मनमां ।**
**साखरना शिरा, शिरा केईना पानमां ।। (२)**

(मी) मैत्रिण अशी करीन (जी) स्त्री (तरुणी, ललना) माझ्या मनात भरेल (आवडेल, पसंत येईल). साखरेचा शिरा (तिला) केळीच्या पानात (खावयास) देईन.

वरील ओवीत अहिराणी स्त्रीची सौंदर्यदृष्टी काव्यात डोकावते. सौंदर्याची तिला चाळ आहे. "सुंदरा मनामधे भरली......" या ओळींशी तिचा निकटचा संबंध आहे. मनात ठसलेल्या जीवापार आवडणाऱ्या (सुंदर) मुलीशी (मुलांशी नव्हे हं) मैत्री करण्याचा तिचा मानस ती व्यक्त करते. (तरुण वाचकांनो तुम्हालाही आतून तसेच वाटत असेल नाही का?). मैत्रिणीला (सायजाबाईस) साखरेचा शिरा केळीच्या पानात खावू घालण्याचे आश्वासन (मंत्री प्रमाणे नव्हे!) देते. तिच्या काळात साखर मूबलक मिळत असावी. (तिच्या नवऱ्याला भल्या मोठ्या पिशव्या घेवून रेशनिंग दुकानापुढे शिधा-वाटप पत्रिका घेवून रांगेत ताटकळत बसावे लागत नसेल किंवा काळ्या बाजाराने साखर उघड माथ्याने विकणारे महाभाग व्यापारी तिच्या गावात नसतील.). सरकी खावून घट्ट (आजच्या यांत्रिक युगातील म्हशी दुधाबरोबर पाणीपण देतात म्हणे...) दूध देणाऱ्या म्हशी तिच्याकडे भरपूर असतील. (पाणी वाढवून दूध पाठविण्यासाठी दूध फेडरेशन त्यावेळी जळगावला नसेल) (ऐन दिवाळीच्या वेळी गडप होणारा "डालडा" जन्माला यावयाच्या असेल या धरेवर.) गोड गोड खाऊ-पिवू घालून आदरातिथ्य करण्याचे (प्रेम व्यक्त करण्याचे) तंत्र तिला ज्ञात होते, याची साक्ष तिचे काव्य देते. खावू-पिवू घातल्या-वर आपलं काम उरकून घेण्याची (खोटे व्हाऊचर टाकणे इत्यादी) स्वार्थी प्रवृत्ती तिला ज्ञात नाही. भरपूर केळी पिकणाऱ्या भागात (जळगाव जिल्ह्यात) वस्तीला असल्याचा पुरावा काव्यात मिळतो. भोवतालचा निसर्ग काव्यात साकारला आहे. केळीच्या पानात जेवताना आल्हाददायक वाटते, हे शास्त्र तिला ठावूक आहे (भांडे घासण्याचे श्रम टळावेत हा सुशिक्षित स्त्रीचा युक्तीवाद तिला शिवलाही नसेल त्यावेळी!).

अशा प्रकारे सुंदर मैत्रिणींच्या शोधात असतांना शेजारची स्त्री (भिकुताई) तिला विचारते तुला कशी मैत्रिण हवी ग?...त्यावर एक अहिराणी स्त्री (नलुबाई) म्हणते,—

**सईबहिन करू, करू सीता सारकी बारीक ।**
**जशी तोंडे लागे लागे, उचा झाडनी खारीक ।। (३)**

(मी) मैत्रीण अशी करेन (जी) सीतेसारखी बारीक (असेन), जी (चविला) (वागणुकीत) उंच झाडावर लागलेल्या खारीक (फळा) सारखी (भासेल).

सीता (अर्थात पुराणातली !) सारखी सुंदर, पवित्र, देखणी, रुपवान, गुणवान मैत्रीण तिला हवी आहे.

सीतेची आदर्श मैत्रिणीला दिलेली उपमा आदर्श मैत्रिणीची व्याख्या तयार करून सार्थ वाटते. तिला उपमा, उत्प्रेक्षांची जाण आहे. तिच्या काव्यात रामायणातील गुणांची सावली दिसते. "सीता" हे कुलवान, शिलवान गुणांचे ज्वलंत प्रतिक आहे. प्रतिमा आणि प्रतिमान यांची सांगड घालण्यात तिचा हातखंडा आहे. गुणांबरोबर स्वभावाच यथार्थ दर्शन सार्थरुपक घेवून करताना ती आढळते. बारीक (बारीकराव नव्हे !) म्हणताना "सिंहकटी" (सडपातळ) हा सौंदर्यवान स्त्रियांचे प्रकारातील एक प्रकार तिला अभिप्रेत आहे. सौंदर्य शास्त्राचा तिचा गाढा अभ्यास आहे. खारिक चविला गोड, शरिराला पौष्टिक असते. तशीच मीत भाषिनी, मधुर भाषिनी मैत्रीण मिळावी व जीवन समृद्ध, विशाल व्हावे अशी तिची अपेक्षा असावी. उंचा झाडनी म्हणतांना "दुर्लभ" "लाखांत एक" (देखणी) असे तिला म्हणायचे नसेल ना ? (त्यावेळी जर्मनच्या भांड्याच्या मोडीच्या बदला खारीक देणारे फेरीवाले तिच्या खेड्यात फिरत नसतील कदाचित ! अन्यथा तिने खारकेची उपमा देण्याचा वाढता मोह आवरता घेतला असता.)

अशी ही गोड स्वभावाची मैत्रीण लौकरात लौकर शोधावी अन्यथा तिच्या नावा-रुपाचा गाजावाजा झाल्यावर तिला एखादा धडधाकड रांगडा गडी लग्न करवून घेवून जाईन व लहानपणापासून आपल्यासमोर खेळणाऱ्या, बागडणाऱ्या अशा मैत्रिणीस आपण मुकू असे विचार मनात येवून एक अहिराणी स्त्री (वच्छाबाई) म्हणते—

> उच्च झाड खजूरन, फय लागेत दूरदूर ।
> लई जाणार लई जाई, उभी ऱ्हासु मी दूर ।। (४)

उंच असे खजूर (फळाचे) झाड आहे. त्याला जमिनीपासून दूर (उंच) फळे लागतात. घेवून जाणार घेवून जाईन (व) मी दूर उभी ऱ्हाईन. (काही तरी गमविल्याचे खेदांत).

या ठिकाणी तिच्या काव्यात सूचकता जाणवते. तिला मैत्रिण व तिही चांगली हवी आहे. घाई केली नाही तर ज्या खजूर फळासारख्या दुरापास्त मैत्रिणीच वयं होईल. आपला लहानपणाचा हक्क असूनही एखादा तरुण त्या सुंदर मुलीला लग्न करून घेवून जाईन व आपण हताशपणे दूरवर दुःखीत अंतःकरणाने उभे राहून पहात राहू. निसर्गातील फळा-फुलांच्या उपमा तिच्या काव्यात डोकावतात. (निसर्गाकडे चला असे आव्हान जणू ती मानवाला देत आहे) (त्यावेळी मुलीचे लग्नाचे वय १४ ठरविण्यात आले असावे. म्हणून त्यापूर्वी मैत्रिणी जमा करण्याची तिला घाई लागली असावी.)

मैत्रिणीच्या शरीराचे बहारदार वर्णन ऐकल्यावर शरीर आकाराविषयी कल्पना आल्यानंतर तिच्या रंगाविषयी शंका येवून एक अहिराणी स्त्री विचारते कां ग शेजी तुला कशा रंगाची मैत्रीण हवी आहे ग? त्यावर ती उत्तरते—

**सईबहीनं करू, करू रंग नी व काई।**
**गोकूय आष्टमीले, देव किष्णु रूप लेई ।। (५)**

(मी) मैत्रीण करेन (मी) काळचा रंगाची (मुलगी) मैत्रीण करेन; गोकुळ-अष्टमीस (दिवशी) (जी) (कार्यक्रमात) श्रीकृष्ण बनलेली असेल (श्रीकृष्णाचे पार्ट करेल).

तिला काळचा रंगाबद्दल विशेष आकर्षण आहे. (तुम्हांला नाहीना? अगदी मनापासून सांगा हं?) पुराणातील आदर्शवादी पुरुष राम, श्रीकृष्ण यांचा तिला दांडगा अभ्यास आहे. त्याच्या रंगाची छाप तिच्या काव्यांवर पडली आहे. परंपरागत काळेपणावरचे तिचे प्रेम या ओवीत दुथडी भरून वाहत असल्याचा भास होतो. काळी सावळी मैत्रीण गोकुळ-अष्टमीस श्रीकृष्णाचे पार्ट करेल. यावरून तिच्या काळातही गोकुळ-अष्टमी उत्साहाने साजरा होत असल्याचा भरभक्कम पुरावा मिळतो. तिचे काव्य त्या वेळच्या समाज रूढी, रिती-रिवाजांचा इतिहास आहे. "रंगाने काळी-मोत्याची जाळी" हा वाक्प्रचार तिला अभिप्रेत आहे.

हे सारं ऐकल्यावर दुसरी एक स्त्री तिला म्हणते कां ग बाई तुला गोरी गोरी मैत्रीण करावीसी कां ग वाटत नाही? त्यावर ती उत्तरते—

**सईबहिन करू, नको माय गोरी गोरी।**
**आखडाई मखडाई, आदतनी व गु कोरी।। (६)**

(मी) मैत्रीण करेन (अग बाई) मला गोरी गोरी (गोऱ्या रंगाची स्मार्ट मैत्रीण) नको. (ती) आडेवेढे घेईल, वेडे चाळे करेन, सोळा शृंगार करेन. सवयीने ती (घाणेरडी) सोनखत कोरणारी (घाणेरडचा सहवासात रहाणारी) (असेन).

तिला मैत्रीण करावीसी वाटते, परंतु ती गोरी नको. गोरीबद्दल तिचे मत वाईट आहे. तिला गौर वर्णाचे विशेष आकर्षण नाही. ती साज-शृंगारात वेळ घालविते व बहूअंशी चारित्र्याने डागाळलेली असते, असा तिला भ्रम झाला असावा. गोरी आपल्याला जास्त वेळ सहवास देवू शकणार नाही, अशी भिती तिला वाटून शील भंगाचा लाल कंदील तिला दिसत असावा. (ती स्वतः खूपच काळचा रंगाची असावी). (सुंदर व सुवासिक फुलांना भुंगे लवकर खराब करतात म्हणे!). सुंदर परंतु बदचलन स्त्रीस "गु कोरी" दिलेली उपमा सार्थ वाटते व अहिराणी स्त्रीच्या बुद्धीची मोजपट्टी ठरते यात शंका नाही. (गोऱ्या गोमटचा सुंदर चारित्र्यवान स्त्रियांनी अहिराणी स्त्रीचे दारावर "लाटणे मोर्चा" **कृपया नेवू नये अशी आग्रहाची विनंती.)**

तुला गोरी गोमटी परंतु वाईट स्वभावाची मैत्रीण नको, मग तुला कशा स्वभावाची मैत्रीण हवी ग ? असे विचारल्यावर एक अहिराणी स्त्री (वाणुबाई) उच्चारते—

**सईबहीन करू, करू मन सारखी गंभीर ।**
**जशी तोंडे लागे, दूर देसनी अंजीर ।। (७)**

(मी) मैत्रीण करेन, माझ्यासारखी गंभीर (स्वभावाची) (जी) (चविला) वागणुकीला दूरदेशातल्या अंजीर )फळ) सारखी (भासेल.)

तिला तिच्या सारख्या गंभीर स्वभावाची मैत्रिण हवी आहे. 'समान व्यसनेसु सख्यम्' अंजीर फळाची उपमा गंभीर स्वभावास सार्थ वाटते. बाहेर देशच्या फळाची उपमा ती स्वभावाला देते. तिची दृष्टी विशाल आहे. सुकामेवा किंवा फळे (दूरदेशची) ही त्यावेळी दुर्लभ अर्थात अधून मधून परंतु भरपेट न मिळणाऱ्या वस्तू म्हणून गंभीर स्वभावाची मैत्रीण (तीही स्वतःच्या स्वभावासारखी मिळणे हे देखील तेवढेच दुरापास्त !) असे तर तिला म्हणावयाचे नसेल ना ? काव्यात्मकता खच्चून भरली आहे. शब्दांना लय आहे. नाद आहे. दोस्तीन, जोडीदारीनला सग बहिन, सई बहिण वापरलेला शब्द सक्की बहीणीला जवळचा आहे. यात सूचकता जाणवते, गुणात्मकता आढळते.

अशी ही खारीक सारखी बारीक, काळ्या रंगाची, बारीक नाकाची अंजीर सारख्या गंभीर स्वभावाची पण हसरी (सतत हसत मुख रहाणारी) खारीक, खोबरे, जर्दाळू, बदाम खाणारी तरुण अहिराणी स्त्री (सुमित्राबाई) रंगात येवून म्हणते—

**सईबहीन करू, मन्हा सारखी रंगेली ।**
**माले तोडू लागे जी, भात भात नी चमेली ।। (८)**

(मी) मैत्रीण करेन, माझ्या सारखी रंगेली (खुशमस्करी, आनंदी स्वभावाची) (जी) मला वेगवेगळ्या प्रकारच्या चमेलीची फुले (तोडू लागेल) (गोळा करू लागेल).

आणि या 'सोळावं वरीस धोकान' लागलेल्या मराठमोळ्या (कुणबी पाटलाच्या) सुडौल, उभार यौवन बांध्याच्या रंगेल व रगेल अफलातून तरुणीस तिच्या सारख्याच रंगेल व रगेल स्वभावाची मैत्रीण (रत्नाबाई) हवी आहे. (नवऱ्याला हवी मैत्रीण नव्हे बरं का ?) तिच्या तारुण्य सुलभ भावनाचा उद्रेग 'रंगेली' या शब्दाने व्यक्त होत आहे. यौवनाच्या उंबरठ्यावर स्त्री सुलभ भावनाचा उद्रेग तिच्या काव्यात जाणवतो. निसर्ग तिच्या काव्यात डोकावतो. तिची सौंदर्याभिरुची वरच्या दर्जाची आहे—तिच्या बरोबर सतत फिरणारी, वेगवेगळ्या चमेलीची फुलें तोडू लागणारी (बगीच्यात फिरविणारी), सुखद सहवास देणारी खुशमस्करी मैत्रीण तिला हवी आहे. अनेक मैत्रिणीमध्ये चमेलीच्या फुलांसारखी नाजूक, मोहक, धुंद वासाची, स्वरूपवान भासणारी, वेणीतल्या गजऱ्याप्रमाणे शोभा वाढविणारी 'जीवश्य कंठश्च' मैत्रीण तिला हवी, असे तर तिला म्हणायचे नसेल ना ? तिने आपल्या परसात छोटासा बगीचा लावला असेल. आजही सुंदरतेचे, शीलाचे

व सभ्यतेचे प्रतिक म्हणून नायकिनीला 'ओ मेरी चमेली' संबोधण्याची पद्धत लोकनाटच व हिंदी सिनेमात रूढ आहे. तिचे उपमेय, उपमान अफलातून आहेत.

अशा रितीने स्त्री सौंदर्याने ती वेडावली असता तिला तिच्या शेजारची ब्राम्हण कन्या (कुमुदिनी उर्फ कुमुद) दिसते. त्यावेळी तिच्या मनात विचार तंरगतात—

**सईबहिन करू, करू बामननी पोर।**
**ताब्यांनी घागर, भेटलिईन तापीवर ।। (९)**

मी मैत्रीण करेन, ब्राम्हणाची मुलगी (मैत्रीण) करेन. तांब्याची घागर घेवून ती मला तापी (नदी) वर भेट देईल (मला भेटेल).

त्यावेळचा समाज व चालिरीती यांचे प्रतिक तिच्या काव्यात डोकावते. स्वभावधर्माप्रमाणे रूढी रिती रिवाजाप्रमाणे ब्राम्हण समाज त्यातेळी अधिक पॉश रहात असेल. (गांधीचा तोपर्यंत खून झाला नसेल). वर्णभेद व जातीभेदामुळे तिला खुल्या रस्त्याने ज्ञानार्जनासाठी ब्राम्हणांचे घरी उघडउघड जाण्यावर नियंत्रण असे म्हणून ती तांब्याची घागर घेवून तापी नदीच्या पांथ्यावर भेट दे, असे सूचक वर्णन करते. नदीच्या वाळवंटात एकत्र भेटून समवयस्क मैत्रिणींशी एकांती थांबून गुजगोष्टी करण्याची, तांब्या (शुद्ध व आरोग्यदायक) च्या घागरीतून पाणी आणण्याची पद्धतीचे सांस्कृतिक दर्शन होते. ती तापी काठावरील खेड्यावरची (खाचण्याची) रहाणारी असावी. तिच्या काव्यांत स्वाभाविकता आढळते. निरनिराळ्या काव्य गुणांचा साठा सापडतो. शब्दांना नाद आहे. (तिच्या काळात घरोघरी वॉटर मिटर बसविलेले, ठराविक वेळेवर पाणीपुरवठा करणारे नळ असणारी पाणीपुरवठा योजना अस्तिवात नसावी. पाण्याचे भाव दर मीटर कमी करण्यासाठी नगरपालिका कार्यालयावर मोर्चे नेण्याचा प्रश्नच उद्‌भवला नसेल) ज्ञानार्जन करण्यासाठी तिला ब्राम्हणाच्या मुलीशी मैत्री करणे प्रथम जरूरी वाटले असेल.

ब्राम्हणाची मुलगी आवडती, सुंदर, चपळ, विद्वान असली तरी तिच्या सोबत कायम रहाता येत नाही, खेळता येत नाही (खेळण्याचे वय नसले तरी.....), सतत सोबत करणारी धडधाकट (खात्या घराण्यातली, श्रीमंत) मैत्रीण आपणास हवी असे विचार मनात येवून ती म्हणते—

**सई बहिन करू, करू वान्यानी वं पोर।**
**वान दुकान लावू, लावू मन्हा वटावर ।। (१०)**

(मी) मैत्रीण करेन, वाणीची मुलगी मैत्रीण करेन (निरनिराळ्या वस्तूचे) गुणांचे दुकान लावेन, माझ्या ओट्यावर (ओसरीत) दुकान लावेल.

वाणी समाजातील सुखवस्तू, गुबगुबीत गालाच्या व्यवहार कुशल तथा कंजूस (हरीभाऊ वाण्याच्या) चंपकलेशी तिला मैत्री करावीशी वाटते. तिला व्यवहार ज्ञानात कुशल

होवून अर्थाजन करावयाचे आहे. 'वान' या शब्दावर श्लेष आहे. वान-गुण, वाण. निरनिराळ्या प्रकारच्या वस्तू. ओसरीवर मैत्रिणींना एकत्र करून गुणांचे वाटप, सद्-गुणांची जोपासना करण्याची तिची मनिषा आहे. लोक संघटीत करण्याच्या तथा सर्व वस्तू माफक दरात एकाच ठिकाणी सहजगत्या उपलब्ध करून देण्याच्या योजनेची कल्पना तिच्या मनात घर करून नसेल ना? (वाणी लोकांचा वाणदूकान लावणे हा पूर्वीचाच व्यवसाय आहे याची खात्री पटते.)

खेड्यातील बारा बलुतेदारांच्या मुलींशी मैत्री करून गावातील आंतरिक एकोपा टिकावा असे मनात येवून (तिचा बाप उत्तम पाटील) गावातील पोलीस पाटील, वतनदार पाटील (जिल्हाधिकाऱ्यांनी नेमलेला नव्हे) असावा. तिला अन्य आणिक जातीच्या मैत्रिणीशी मैत्री करावीशी वाटून ती म्हणते—

**सईबहिन, करू, करू फकिरनी गीरजा।**
**कपायना कुकु, हिना राम नी वरजा॥ (११)**

(मी) मैत्रीण करेन, फकिरची गीरजा (बी) मैत्रीण करेन कपाळावरचा कुंकू, जिच्या रामाने (पतीने) मना केला आहे (ती कुंकू लावत नाही.)

तिच्या गावात मुसलमान (फकीर) वस्ती आहे. फकीर औरंगजेब बादशहाने खान्देश-वर स्वारी केली त्यावेळी बाटवलेले (शुद्ध हिंदू) समाजातील तरुण विवाहित गिरजी बी शी तिला मैत्री करावीशी वाटते. फकीर समाजात गेल्याने अक्षय सौभाग्याचं लेणं (कुंकू) विसरलेल्या परंतु हिंदूत्वाची खुण म्हणून आपल नाव गीरजा असणाऱ्या दुसऱ्या जातीच्या बाईशी तिला मैत्री करावीशी वाटते. हिंदू-मुस्लीम ऐक्याची ती कट्टर पुरस्कर्ती असल्याचा भास होतो. ऐक्याचे धडे तिचे काव्य देते. ती संस्कृती जोपासक आहे. हिंदू-मुस्लीम ऐक्याची गुरुकिल्ली तिला स्वातंत्र्यापूर्वी ज्ञात होती याचे तिचे काव्य साक्ष देते. गीरजा हे पार्वतीचे नाव संस्कृतीची देवाणघेवाण दर्शविते. फकीर पूर्वी हिंदू असल्याचा पक्का पुरावा होय. प्रत्येकीचा नवरा रामासारखा आदर्श व्हावा म्हणून प्रत्येकजण आपल्या नवऱ्याला 'राम' म्हणत असावी. (आताही नवऱ्याला ज्याचं नाव 'राम' आहे त्याला "अे राम, येतांना नाटकांची दोन तिकीटे घेवून ये बरं कां रे"! म्हणण्याची पद्धत आहे).

अशी संस्कृती जोपासक, पुराणमतवादी, सनातनी अहिराणी स्त्री युग प्रवर्तक देखील होती याची साक्ष पुढील ओवीतून पटते—एक अहिराणी स्त्री (अप्रुफबाई) म्हणते—

**सईबहीन करू, करू महारनी गया।**
**रोज आंगन झाडता, ऐकू तिना गोड गया॥ (१२)**

(मी) मैत्रीण करेन महारची गया (मैत्रीण करेन) (ती) (माझे) अंगण झाडतांना तिचा गोड गळा (गाणे) मी ऐकेन.

तिला आपल्या (पाटलांच्या) वाड्याचे अंगण झाडतांना गोड गळ्याची देणगी असणाऱ्या सुरेल आवाजात गाणाऱ्या मंगा महाराच्या गया गायकवाड या मुलीशी मैत्री करावीशी वाटते. वरील ओवीत शेवटी 'गया' शब्दाचा उपयोग करून तिने श्लेष साधला आहे. (गया-गेली, गया-तिर्थाचे नाव, मुलीचे नाव, गया-गळा) अंलकाराची रेलचेल तिच्या काव्यात आढळते. शब्दांना लय आहे. नाद आहे. शब्दभाव मधूर आहेत. भावना हळूवार आहेत. आर्यांच्या चातुर्वर्णाशी तिचा निकटचा संबंध आहे. तिचा गाढा अभ्यास आहे. ब्राम्हण, क्षत्रीय, वैश्य, शुद्र हे अनुक्रमे तिने आपल्या काव्यात कटाक्षाने पाळले आहे. ब्राम्हणाच्या नंतर वाणीच्या नंतर महाराच्या मुलीशी मैत्री करावीशी तिला वाटते. (करू इच्छिते) त्यावेळच्या समाजात वर्णपद्धती सुरू होती व त्याला फारच महत्त्व होते, याची साक्ष तिचे काव्य देते. लक्षार्थाने ती 'क्षत्रीय' वर्णातील (गटातली) आहे हे तिने सूचित केले आहे. सूचकता हा तिचा एक काव्य गुणच म्हणावयास हवा. पहाटेच्या कातरवेळी खराट्याच्या सुरेल तालावर गाणारी गया तिला खूपच हवी हवीशी वाटते. (लता मंगेशकरच्या भावगीतांच्या तबकड्या त्यावेळी वाजत नसतील. जळगाव आकाशवाणी यावयाची असेल जन्माला या धरेवर!) अस्पृश्यता हा कलंक त्यावेळीही होता (आजही आहे) याची साक्ष तिचे काव्य देते. तथाकथित समाजात वर्णभेद असूनही, जातीभेद एकी होती, एकता होती. भेद मिटविण्याचा ती यशस्वी प्रयत्न करीत होती. (चौतीस टक्के बॅकलॉग त्वरीत भरण्यात यावा व नव बौद्धांना तथाकथित सवलती मिळाव्या म्हणून कलेक्टर कचेरीवर मोर्चे नसतील जात तिचे वेळी...).

सर्व जातींच्या मुलींशी मैत्रिचे संबंध ठेवून संघटना व समाज अविभाज्य ठेवण्याची तिची कला ती जोपासत असल्याचा भास तिच्या काव्यात होतो. ती राजकारण धुरंदर (छत्री धरणारी व बॅग घेवून पुढे चालणारी नव्हे हं!) असल्याचे प्रतित होते. (जळगाव जिल्हयाला गृह राज्यमंत्री पद पुढे मिळवून देण्यासाठी तर तिचा हा अट्टाहास त्यावेळी नसावा ना?) लोकनाट्य गीते, लावण्यांची जोपासना क्षुद्रांनीच करून परंपरा टिकविली आहे याची साक्ष आजही तिचे काव्य देते. 'महारा घरी गानं, बामना घरी लिव्हनं' हेच खरं!

या सर्व (विविध जातींच्या, गुणांच्या) मैत्रिणी जमविल्यानंतर त्यांच्या गाठीभेटी, चर्चा करण्यासाठी तिला सभागृह पाहिजे आहे. (तिच्या काळात कॉलेजचे 'ऑडीटोरीयम', महिला मंडळाचे सभागृहे, चित्रपटगृहे नसावीत) म्हणून भेटीची जागा सूचित करताना ती म्हणते—

**सईबहिनी भेटू, भेटू बाबुय बनमां ।**
**कट कट सांगू माय, थेट भरनी मनमां ।। (१३)**

(मी) मैत्रिणींना भेटेन (त्यांना) बाभूळ वनात (भेटेन) अगबाई त्यांना (मनातल्या) कटकटी (दु:खे) सांगेन, मनात भरल्या (गुप्त गोष्टी) सांगेन, (तारुण्य सुलभ भावना व्यक्त करेन).

तिच्या मनातील कटकट (दु:ख, गुह्य, गुप्तगोष्टी) शांत अशा बाभूळ वनात [एकांतात (खऱ्या अर्थाने एकांत नव्हेच)] सांगणाचा तिचा भावार्थ वाखाणण्याजोगा आहे. ती मानस शास्त्राची सखोल अभ्यासक आहे. मनात खोलवर रूजून राहीलेली शल्य, राजनितीकट, यौवनसुलभ भावना ती आपल्या आवडत्या जीवलग मैत्रीणीजवळ ओकू पहाते. (पत्रकाराजवळ नव्हे) स्पष्ट करू इच्छिते, 'सुखमे सब साथी दु:खमे न कोय' असे असले तरी तिच्या दु:खात वाटेकरी करणे तिला योग्य वाटते 'बाभूळवन' हा खेडगावाबाहेरील (तापी नदीच्या खोऱ्यातील) परिसर [ज्याचा उपयोग ग्रामीण स्त्रिया 'सकाळ-संध्याकाळ विधी' (अर्थात प्रात:विधीचे) करावयाचे कामी करीत असत, आजही करतांना आढळतात] (ती परंपरा आहे, प्रथा आहे) ही प्रथा काव्यात डोकावते. पूर्वीच्या काळी स्त्रिया संडासला जाण्याच्या निमित्तानेच सहजगत्या सासूच्या/आई-वडीलांच्या कचाटयातून बाहेर पडून एकत्र येवू शकत असाव्यात नाही का ?

कट कट हा शब्द 'कट' यावर जोर देवून (न्हावी करतो ते हिप्पी कट, दिलीप कट मधील कट नव्हे) उपयोगात आणलेला दिसतो. कट-कारस्थान. जे तिच्या मनाविरुद्ध आहे त्या विरुद्ध समाजाला शह देण्याच्या रूढी व रिवाजाविरुद्ध लढा देण्याचा तिचा मानस नसेल ना? 'समाजको बदल डालो', 'जुने जावू द्या मरणालागूनी . . . .' असे क्रांतीकारी विचार मनात येवून समाज बदलविण्याचे गुप्त कट तिचे मनात त्यावेळी घर करून नसतील ना ? युग निर्माण योजना (पुढे तिच्या प्रेरणेने स्थापन झाली असावी काय ?) स्त्रीमुक्ती, स्त्री स्वातंत्र्य, जातियता, यांची बोलके मनसुबे आणि खलबते ती त्यावेळी बाभूळवनात शिजवत नसेल ना? (स्वच्छ पिवळधा फुलांनी, हिरव्या पानांनी सजविलेला नयनरम्य परिसर 'विधी' साठी उपयोगात घेण्याची कल्पना शेपटीच्या आळधा पडून गल्लीत दुरगंधी सोडणारे व वेळीच साफ व स्वच्छ न होणाऱ्या संडास बनविणाऱ्या इंजिनियरलाही लाजेने मान खाली घालावयास लावते) आमची अहिराणी स्त्री जन्मत:च इंजिनियर होती म्हणाना !

अशा प्रकारे सारा कार्यक्रम संपल्यावर वर्षभरात चांगले कार्य करणाऱ्या मैत्रीणींचा गौरव करून बक्षीस देण्याची कल्पना तिच्या मनात आल्यावर एक अहिराणी स्त्री (सुमनबाई) म्हणते—

**सईबहिन बलावू, बलावू मांगला दारमां।**
**पंढरपून्या खन, खन केकत्या घरमां ।। (१४)**

(मी) मैत्रीणीला बोलावीन, मागच्या दाराने (त) बोलावीन पंढरपूरचा खण, केकटी खण घरात आहे) (कंडीत ठेवला आहे).

समाजाची त्या वेळेस स्त्रियांवर फारच बंधने असावीत, स्त्रिया पुरुषांच्या समोर येत नसाव्यात. म्हणून शंकर पाटीलची ती सुमन आपल्या मैत्रिणींना मागच्या दाराने 'भेट' घेण्यासाठी बोलाविते (भेट म्हणजे भेट वस्तू हं ! ).

आम्ही देखील बरीच कामे मागच्या दारानेच करवून घेण्यात आता सराईत एक्सपर्ट झालो आहोत नाही का ? तुम्हाला जमते की नाही ? राजकारणात देखील मागचे दार नेहमीच उघडे असते (अलिकडे) आम्ही अहिराणी स्त्री पासून तर हा धडा घेतला नसेल ना ? तिचे निरीक्षण अचूक आहे. शिंदखेडे येथील पाटील बाबांच्या वाड्याचा मागचा भाग (जेथे त्यावेळी कोणी पुरुषवर्ग पोचत नसेल). त्यावेळच्या तथाकथित महिलांचे कार्यक्रम तेथेच होत असावे. त्यावेळच्या घर बांधणीचे अंधूक चित्र डोळ्यासमोर तरळते. ओसरी, बैठक, माजघर व मागचे दार असे चार भाग असावेत. घरांचे अप्रत्यक्ष वर्णन ऐकून आधुनिक, आजिव 'आर्किटेक्टच्या' कल्पनाशक्तीस वाव मिळावयास हरकत नाही. महाराष्ट्राच्या आवडत्या कुलदैवताची निवास नगरी पंढरी तिच्या काव्यांत डोकावते यात नवल कसले ? स्थळ वैशिष्टयाची तिच्या काव्यावर छाप आहे. काळाचे गणकयंत्र तिचे काव्य आहे. केकटी प्रकाराचा मोठ्या करवती काठाचा, मधे चौकटी असणारा खण एकेकाळी पंढरपुरची स्पेशालिटी होती व आजही आहे. तिचे वडील वारकरी संप्रदायाचे अनुयायी असून दरवर्षी पायी पंढरपुरच्या वारीला अमळनेरच्या श्री. संत सखाराम बाबांबरोबर जात असावेत व मुली व मैत्रिणींकरिता 'वाण' आणत असावेत. मैत्रिणींचे गुणाचे कदर करण्यासाठी प्रलोभन देण्यासाठी (आवडती वस्तू भेट म्हणून देण्यासाठी) मैत्रिणींना मागचे घरात बोलविते. आजकालच्या वादग्रस्त मैत्रिणी देखिल आपल्या आवडत्या सुंदर मैत्रिणींना मागच्या दारांने घरी बोलवितात पण कां ? कशासाठी ? (उत्तर सुज्ञ वाचकाचे स्वाधीन).

अशातऱ्हेने आमच्या अहिराणी स्त्रीने मैत्रिणीला भेट म्हणून, प्रलोभन म्हणून खण, नारळ देवून परत पाठविले आहे (पुन्हा भेटायला येणेसाठी) भेटीत वस्त्र देणे (अन्न, वस्त्र, निवारा यातील दुसरे) ही त्यावेळची प्रथा, रुढीची तिचे काव्य साक्ष देते. मैत्रीचे कौतूक, मित्र भेट देण्याचे तिचे कसब वाखाणण्याजोगे आहे. काळाची पाऊले, तिच्या काव्यावर उमटलेली स्पष्ट दिसतात.

विविध विषयातील अहिराणी ओव्यांपैकी स्त्रीसुलभ भावना, मैत्रीण निवडीचे कसब, सौंदर्याभिरूची, समाजाकडे पाहण्याचा विशाल दृष्टिकोन, महर्षी कर्वेंचे पायावर पाय ठेवणारी नाजूक व हळव्या मनाची अहिराणी 'स्त्री' इत्यादी भावना वरील ओव्यांमध्ये नकळत साकार झाल्या आहेत. अनेकविध भूमिका तुमच्यापुढे ठेवणे बाकी आहे. प्रकरण वाचल्यावर स्त्रीसुलभ सहवास आवडणाऱ्या तुम्हाला देखील सईबहिन (मैत्रीण) (अर्थात अेवन हे) मिळो ऐवढी अपेक्षा करून वाढते प्रकरण इथेच संपवितो . . . . . !

● ● ●

## अहिराणी लोक साहित्य दर्शन : खंड २रा ' नाती-गोती '

### बोलीभाषिक प्रदेशात बोलण्यात येणारे व या पुस्तकात समाविष्ट असलेले काही प्रादेशिक शब्द व त्यांचे अर्थ

अलवार—नाजुक.
आलोखी—आवंड, गोडी.
आवदसा—दैन्यावस्था.
इस—विष.
ईस—वीस.
उगर—रागीट.
उभारी—उत्साह.
कायज—कलेजा.
खस्ता—कठीण प्रसंग.
गमेना—करमेना.
गाय—गाळ, गाळणे.
गुचकी—ऊचकी.
घुटी—लहान बाळाला द्यावयाचे औषध.
चंडाय—चांडाळ.
जिल्हे—जियेला.
जोजार—कामधंदा.
जोंध्या—जोंधळा.
झय—उन्हाची झळ.
डसीन—(मनात) भरेल.
डहन—चिता.
तवर—तोवर, तो पर्यंत.
तिरोनी—त्रिवेणी संगम.
दराक्षन—द्राक्षाचे.
दांडगा—तरूण, दीर.
धाबे—घरांवर.
पिन्हू—प्यालो.
पंढाय—पन्हाळ.
बये—जळते.
मव्हाय—मधाचे पोळं.
मवाय—मृदू.
माय—आई, माळा (फुलांची).
मावना—उसनवार.
मिचुक—शिवाय.
रवाडे—खेळविते.
ललाटी—घाई.
लाग—ईलाज.
वडपना—वळवाचा.
वाया—वाळा, अंतिम इच्छा.
वंगयवानी—काळा, ओंगळ.
शावू—शाळू, शेवाळे.
शेलाटी—बारीक, कोवळी.
सकवार—नाजुक.
साग्रा—छाया, साऊली.
सीप—घोट.
सुलावनी—अ शोभीवंत.
संगरनी—गुणी, दुर्मिळ.
हयाती—आयुष्य.
हिरदे—हृदयात.
हिना—हाल, गैरसोय.
हुपारा—उकाळा.

# अहिराणी लोक साहित्य दर्शन:खंड २ रा

## 'नाती–गोती'

(बोली व परिसराच्या इतिहासासह)

---

## संदर्भ सूची


१. अहिराणी भाषा आणि संस्कृती

—लेखक कै. भा. रं. कुळकर्णी

२. अहिराणीची कुळ कथा

—लेखक डॉ. दा. गो. बोरसे

३. अहिराणी लोक साहित्य दर्शन : खंड १ ला (सण आणि उत्सव)

—लेखक कृष्णा पाटील

४. खान्देश गॅझेटियर (इंग्रजी), सन १८८०

—ब्रिटीश अमदानी

५. महाराष्ट्रीय ज्ञानकोश

—संपादक डॉ. श्री. व्यं. केतकर

६. मराठी विश्वकोश : खंड १

—संपादक तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

७. 'गौराई' : ५८ वे अखिल भारतीय मराठी साहित्य सम्मेलन, जळगाव

'स्मरणिका'—जानेवारी १९८४

—संपादक समिती


---